


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

'तपशील' हे मराठीतील एक महत्त्वाचे नियतकालिक (द्वैमासिक) असून ते सद्यस्थितीत कार्यरत नाही. संस्थेच्या उपरोक्त प्रकल्पातंर्गत 'तपशील' ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करता येणे शक्य असल्याने सदर नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून संस्थेच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यासाठी राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सदर नियतकालिकाचे प्रकाशक व मालक स्मृतिशेष श्री. नाना जोशी ह्यांच्या कन्या श्रीमती शर्मिला जोशी तसेच संपादकमंडळातील सदस्य ह्यांना विनंती करण्यात आली होती.

सदर विनंतीस श्रीमती शर्मिला जोशी तसेच संपादक-मंडळ ह्यांनी मान्यता दिल्यामुळे आणि सदर नियतकालिकाचे अंक उपलब्ध करून दिल्यामुळे 'तपशील' ह्या नियतकालिकाच्या (द्वैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देणे शक्य होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे/ नियतकालिकांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई आणि तपशील संपादक-मंडळ यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे, कलावंतांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्व राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे नसतील.

अनुक्रमणिका




**संपादक**
डॉ. मीना वैशंपायन
डॉ. मंगला सरदेशपांडे
डॉ. आनंद जोशी
श्री. नाना जोशी

**रचना**
हेमचंद्र कराडकर

**अक्षरजुळणी**
अभिजित पंडित

**मुद्रण व्यवस्था**
विजय राणे
विजय एंटरप्रायझेस
कळवा, ठाणे.

**मुखपृष्ठवरील चित्र**
फ्रेंच कवी बोदलेर यांचे
त्यांनी स्वत:च काढलेल्या चित्रावरून

**मालक, मुद्रक, प्रकाशक**
**आणि पत्रव्यवहार**

श्री. नाना जोशी
४ अ, सोमणनगर,
क्रांतीवीर भाई बालमुकुंद मार्ग,
मुंबई – ४०० ०१२

# तपशील

अंक ७ खंड २ १९९७

## अनुक्रमणिका

## संपादकीय

**प्रिय रसिक वाचकहो,**

'तपशील'चा हा सातवा अंक आपल्या हाती उशिरा का होईना देताना आम्हास आनंद होत आहे. या अंकापासून एक नवी लेखमाला चालू करीत आहोत. क्लिओपात्रा या राणीचा वास्तव इतिहास काय आहे आणि कालौघात त्यात काय बदल होत गेले याबद्दल या लेखमालेत आपणास वाचावयास मिळेल. प्रख्यात फ्रेंच कवी चार्लस बोदलेर यांस अधुनिकतेचा जनक मानण्यात येते. त्या संबधी एका नव्या दृष्टिकोनातून त्याच्या विचारांची तपासणी न दिसणारा भटक्या या लेखात आढळेल. कधी कधी महान लेखक अजाणता वा बुद्धीपुरस्सर वाङ्मयचौर्य कसे करतात, इराण व नायजेरिया या देशातील लेखकांना कोठच्या परिस्थितीला सामोरे जावे लागत आहे व प्रख्यात रशियन लेखक, सोल्झेनित्सिन यांची सध्याची हालहवाल याबद्दल नोंदवही या सदरात आपण वाचाल. प्रतिभा टिल्लू यांनी एका अमेरिकन लेखिकेचे निवेदन पेश केले आहे. पाश्चिमात्य कादंबरीचे मानकरी या आणखी एका नव्या लेखमालेत फ्रेंच लेखक राब्ले याचा परिचय आपणास होईल. प्रेमपुजारी डी. एच्. लॉरेन्स याचा पुढचा भाग व असा हा वाचन छंद या लेखमालेतील गीता मेहता यांच्याविषयीचा आणखी एक लेख आपणास या अंकात आढळेल.

आपल्या सूचना असल्यास जरूर कळवा, आम्ही त्यांचे स्वागत मोकळेपणाने करू.

**- संपादक**

**'तपशील'चा तपशील**

* सुट्या अंकाची किंमत रुपये १००/-
* (६ अकांची) वार्षिक वर्गणी रुपये २०१/-
* प्रत्येक अंकाची पृष्ठसंख्या सुमारे १२० ते १२५
* वर्गणी मधल्या अंकापासून स्वीकारली जाणार नाही. थोडक्यात दुसऱ्या अंकाला वर्गणी पाठवली तरी पहिल्या अंकापासूनच अंक देण्यात येतील.

अनुक्रमणिका

# साहित्य – कल्पित – वास्तव

## क्लिओपात्रा

–डॉ. मीना वैशंपायन

**आरंभी**

क्लिओपात्रा या व्यक्तीविषयी जितका विचार करावा तितके कुतूहल वाढत जाते मनातील विस्मय शिगेला पोचतो. सातवी क्लिओपात्रा इजिप्तची सम्राज्ञी होती, ज्यूलियस सीझरची रखेली होती; ॲन्थनीची साथीदार होती, रोमची शत्रू होती. कल्पिताच्या पलीकडे जाणारे तिचे व्यक्तित्व तिच्या शत्रूंनी विरूप केले. तिच्याविषयी उलटसुलट अफवा त्यांनी पसरवल्य:. त्यांनी तिला परधार्जिणी, परकीयांची रखेल, दुष्ट, कारस्थानी म्हटले. तिच्या प्रजेच्या दृष्टीने मात्र ती देवता होती. मुक्तिदायिनी होती, विश्वमाता होती. तिच्या मृत्यूनंतर गेल्या दोन हजार वर्षात तिच्याबद्दल सारखे काही ना काही लिहिले गेले. कलाक्षेत्राच्या विविध माध्यमांतून तिचा शोध घेतला गेला. आपापल्या कुवतीनुसार, आपापल्या पूर्वग्रहांनुसार, समजुतींनुसार तिच्या व्यक्तित्वाचे आकलन समाजाने केले.

क्लिओपात्राची ही विविध रूपे समाजातील विचार प्रवाहांची प्रतिबिंबे होती. या पुस्तकातून तिच्या प्रतिबिंबांच्या आधारे समाजाचेच आकलन करण्याचा प्रयत्न केला आहे. राजकीय, सामाजिक, वांशिक, लैंगिक अशा संघर्षाचे प्रतीक ठरलेली ही क्लिओपात्रा एका वेगळ्या नीतितत्त्वाचे, इच्छा आकांक्षांचे, विकृतीचेदेखील भान आणून देते. याशिवाय एखाद्या गोष्टीचा योजनाबद्ध प्रचार आणि प्रभावी कथन सामान्यजनांवर किती व कसा परिणाम घडवते याचेही यामध्ये चित्रण केले आहे. ग्रीक राज्यकर्त्यांमधील एक कर्तबगार सम्राज्ञी क्लिओपात्रा ही फक्त प्रणयकथांची नायिकाच ठरते. हे असे का? असा प्रश्न मनात उठतो. त्याचे उत्तर देता देता लेखिका ल्यूसी ह्यूजेस-हॅलेट आपल्याला आठवण करून देते की "कोणतेही कथाकथन हे निर्हेतुकपणे केलेले, निष्पाप निवेदन नसते."

या क्लिओपात्राची ही ज्याला त्याला भावलेली असंख्य रूपे ! झुंबराच्या लोलकातून प्रकाश परावर्तित व्हावा तसे तिच्या या सर्व चित्रणांमधून त्या त्या वेळचा समाज, समाजमन आपल्यापुढे प्रकाशत असते. त्या क्लिओपात्रा नावाच्या झुंबराविषयी .......

**घटनाक्रम**

इ. स. पू. १०० – सीझरचा जन्म



अनुक्रमणिका

| | | | |
|---|---|---|---|
| इ. स. पू. | ८३ | – | मार्क अँन्थनीचा जन्म |
| ,, | ६९ | – | क्लिओपात्राचा जन्म |
| ,, | ६६ | – | ऑक्टेव्हियाचा जन्म |
| ,, | ६३ | – | ऑक्टेव्हिअस (सीझर ऑगस्टस) याचा जन्म |
| ,, | ५९ | – | टॉलेमी ऑलिटस – क्लिओपात्राचा पिता – याला इजिप्तचा राजा म्हणून रोमकडून मान्यता. |
| ,, | ५८ | – | सायप्रसचा राजा – टॉलेमी – क्लिओपात्राचा काका याने विष प्राशन केले. क्लिओपात्राच्या वडिलांना राज्यातून हाकलले गेले आणि तिची वहीण बेरेनिस ही इजिप्तची राणी झाली. |
| ,, | ५५ | – | क्लिओपात्राच्या वडिलांना राज्यप्राप्ती. बेरेनिसचा वध. घोडदळाचा सेनापती म्हणून अँन्थनीचे अलेक्झांड्रियात आगमन. |
| ,, | ५२ | – | ऑलेटिस टॉलेमी यांचा मृत्यू. आपल्या नऊ वर्षीय भावाबरोबर संयुक्तपणे क्लिओपात्राला राज्य सिंहासन मिळते. |
| ,, | ४९ | – | क्लिओपात्राला हाकलून देऊन तिचा भाऊ एकटा राज्य करू लागतो. |
| ,, | ४८ | – | दरबारी लोकांची – मंत्रिमंडळाची तिच्या भावाच्या सत्तेला मान्यता. तिने सैन्य गोळा केले आणि फार्सलसची लढाई, पॉम्पे इजिप्तला आला, आणि मारला गेला. रोमन सत्ताधीश सीझर याचे अलेक्झांड्रिया येथे आगमन. युद्धात क्लिओपात्राचा भाऊ मृत्यू पावतो. |
| ,, | ४७ | – | सातवी क्लिओपात्रा इजिप्तची राणी होते. भावाशी विवाहासाठी वचनबद्ध. सीझरपासून तिला टॉलेमियस सीझेरियन हा मुलगा होतो. |
| ,, | ४६-४४ | – | आपल्या मुलाबरोबर व भावाबरोबर ती रोमला सीझरसमवेत राहते. |
| ,, | ४५ | – | सीझर स्पेनला जातो. |
| ,, | ४४ | – | सीझरचा वध. क्लिओपात्रा अलेक्झांड्रिया येथे परतते. |



अनुक्रमणिका

| | | | |
|---|---|---|---|
| इ. स. पू. | ४३ | – | क्लिओपात्राला कॅशियसकडून धमकी. अॅन्थनी ऑक्टेव्हिअस व लेपिडस यांच्याशी समझोता. |
| ,, | ४२ | – | फिलीपी येथे युद्ध. सीझरच्या मारेकऱ्यांचा वध. |
| ,, | ४१ | – | क्लिओपात्रा व अॅन्थनी यांची टार्सस येथे भेट. अॅन्थनी तो हिवाळा अलेक्झांड्रियात घालवतो. |
| ,, | ४० | – | अॅन्थनीला इटलीतून आमंत्रण. त्याची बायको फल्विया हिचा मृत्यू. ऑक्टेव्हियाशी त्याचा विवाह. ब्रुन्डीशियमचा तह. |
| ,, | ३६ | – | अॅन्थनी व क्लिओपात्रा यांचे पुनर्मीलन. पर्शियन मोहीम. |
| ,, | ३५ | – | अॅन्थनीचा पराभव. माघार घेतेवेळी पुन: क्लिओपात्राची भेट. तिच्याबरोबर तो अलेक्झांड्रियाला जातो. |
| ,, | ३४ | – | अॅन्थनीचा आर्मेनिया येथे जय. अलेक्झांड्रिया येथे विजय सोहळा. देणगी समारंभ. |
| ,, | ३३ | – | अॅन्थनी व ऑक्टेव्हियस यांच्यात संघर्ष. |
| ,, | ३२ | – | अॅन्थनी क्लिओपात्रा इफेसस येथे व नंतर अथेन्स येथे परततात. अॅन्थनी व ऑक्टेव्हिया यांचा घटस्फोट. क्लिओपात्राविरुद्ध युद्धाची रोमकडून घोषणा. |
| ,, | ३१ | – | अॅक्टियमची लढाई. |
| ,, | ३० | – | क्लिओपात्रा व अॅन्थनी यांची आत्महत्या. सिझेरियन याचा वध. |
| इ. स. | १४ | – | सम्राट ऑक्टेव्हिअस ऑगस्टस याचा मृत्यू. |

टीप –

* १ – हेलेनिस्टिक – अभिजात काळातील (Classic times)
इ. स. पूर्व पहिल्या शतकातील लोक. यांनी ग्रीक भाषा आणि संस्कृती यांचा स्वीकार केला होता.
यामध्ये विशेषत: डायस्पोराचे ज्यू होते.

* २ – मॅसिडोनियन – Macedonion
मॅसिडोनिया हे ग्रीसच्या उत्तरेकडील राज्य. तेथील रहिवासी म्हणजे मॅसिडोनियन.



अनुक्रमणिका

**दंतकथा – वास्तव**

कोणे एके काळी एक इजिप्शियन राणी होती. तिचे नाव होते क्लिओपात्रा ! ती श्रीमंत होती. दुष्ट होती. अनीतिमान होती आणि अप्रतिम सुंदर, लावण्यवती होती.

अगदी कोवळ्या वयातच तिने टॉलेमी या आपल्या भावाविरुद्ध यादवी युद्ध पुकारल हाच टॉलेमी तिचा नवराही होता. (बहुतेक पौर्वात्य सत्ताधीशांप्रमाणे क्लिओपात्रा जेवढी दुर्गुणी होती, तेवढीच मोहक होती, भुरळ पाडणारी होती. पावित्र्य, शुद्धता या संकल्पनेविरुद्ध तिने जेवढे गुन्हे केले त्या सर्वांमध्ये व्यभिचार म्हणजे केवळ एक छोटासा गुन्हा होता.) युद्धामध्ये तिचा पक्ष अगदी दयनीय स्थितीला पोचलेला असतानाच ज्यूलियस सीझरने अलेक्झांड्रियात येऊन राजमहालात मुक्काम ठोकला.

टॉलेमी राजाच्या निष्ठावंत रक्षकांनी राजमहालाच्या साऱ्या प्रवेशद्वारांवर कडेकोट बंदोबस्त ठेवला होता, पण तरीही कोणताही अटकाव होऊ न देता क्लिओपात्रा सीझरपर्यंत पोचण्यात आणि त्याला आपल्या बाजूला वळवण्यात यशस्वी झाली. अतिशय धीटपणे, निर्लज्ज अशा धूर्तपणाने तिने अपोलोडोरस नावाच्या एका व्यापाऱ्याला फितवले. त्याच्या मदतीने स्वत:ला एका मोठ्या गालिच्यात गुंडाळून घेऊन तिने राजमहालात प्रवेश मिळवला. गालिच्याची गुंडाळी सुरक्षितपणे सीझरच्या महालापर्यंत पोचली आणि त्याच्या पायाशी उलगडली गेली. त्यासरशी क्लिओपात्रा उडी मारून त्याच्यासमोर उभी राहिली. ते दृश्य जितके अनेपक्षित, विस्मयकारक होते तितकेच नयनमनोहर, विलोभनीय होते. सीझर त्या दृश्यावर लुब्ध झाला आणि 'पॉम्पे द ग्रेट'च्या मुलाला– कॅनियस पॉम्पेला जिने याआधीच भुरळ घातली होती,त्या क्लिओपात्राला सीझरला आपले अंकित करून घेण्यास जराही वेळ लागला नाही. तिच्या मोहकतेने नादावलेला, तिच्या प्रणयोत्सुक विभ्रमांनी खुळावलेला सीझर अलेक्झांड्रियामध्ये बराच काळ रेंगाळला. त्याचे हे वर्तन राजनीतिला सोडून असेच होते. त्याने त्या यादवी युद्धात अर्थातच तिच्या वतीने हस्तक्षेप केला.

याप्रमाणे जगातील अत्यंत सावध आणि शहाण्या समजल्या जाणाऱ्या पुरुषांपैकी एकजण आपल्या कर्तव्यापासून, सद्सद्विवेकबुद्धीपासून ढळला आणि त्याला कारण होती ती कारस्थानी युवती !

बंदरावर होणाऱ्या छोट्याशा चकमकीनंतर युद्धसमाप्ती झाली. राज्यात सगळीकडे पुन: एकदा शांतता प्रस्थापित झाली आणि क्लिओपात्रा व सीझर प्रणयरंगात बुडून गेले. अत्यंत किमती पौर्वात्य, इजिप्शियन लाकडापासून बनवलेल्या, रत्नजडित, भव्य, आरामदायी बोटीतून ती दोघे नाईल नदीत पर्यटनासाठी जात. दिवसा क्लिओपात्रा आपल्या प्राचीन भूमीच्या समृद्धीचे दर्शन सीझरला घडवत असे. रात्रीच्या वेळी ती दोघे बोटीच्या उघड्या डेकवर पहुडलेली असत. वर असे चमचमत्या ताऱ्यांनी प्रकाशणारे नभांगण आणि पायांशी



अनुक्रमणिका

असत आदवशीर, चपळ कृष्णवर्णीय गुलाम– दुर्मिळ असे उत्तमोत्तम खाद्यपदार्थ हाती धरून उभे असणारे !

परंतु हे सुखद क्षण लवकरच संपले. काही तातडीच्या राजकीय कामासाठी सीझरला रोमला परतावे लागले. आपल्याला खिळवून ठेवणाऱ्या त्या जादुगारिणीचा, आपल्या प्रियतमेचा निरोप त्याने मोठ्या जड अंत:करणाने घेतला.

नंतरच्या सहा वर्षात क्लिओपात्राने विशेष असे काहीच केले नाही.

मधल्या काळात जग बदलले. सीझरची हत्या झाली. त्याचे मारेकरीही पराभूत झाले आणि तिघांनी स्वत:ला रोमन साम्राज्याचे 'संयुक्त राज्यकर्ते' म्हणून घोषित केले. त्या तिघांपैकी लेपिडस हा मूर्ख आणि स्वतंत्र व्यक्तित्व नसलेला माणूस होता. ज्यूलियस सीझरचा दत्तक मुलगा ऑक्टेव्हियस हा थंड डोक्याचा, कावेबाज, कपटी राजकारणी होता, तो निष्ठुर, महत्त्वाकांक्षी होता आणि मानवी स्वभावातील मोहक उणिवा, मोहस्थाने यांच्यापासून अलिप्त होता.

तिसरा राज्यकर्ता ॲन्थनी रोमन साम्राज्याच्या पूर्वभागावर राज्य करी. तो रुबाबदार, देखणा पण त्याचीही काही वैगुण्ये होतीच. त्याच्यावर ऐऱ्यागैऱ्या माणसांचाही प्रभाव पडत असे आणि पापपुण्याचा फारसा विधिनिषेध न बाळगणाऱ्या लोकांचे ऐकल्याने तो चुकीच्या मार्गाकडे सहजपणे वळत असे. त्याच्या मित्रमैत्रिणींमध्ये नट्या, कलावंतिणी वगैरेसारख्या तत्कालीन समाजातील अप्रतिष्ठित लोकांचाच अधिक भरणा होता. शिवाय मद्य हा त्याचा आणखी एक दुबळेपणा होता. हे त्याचे दोष म्हणजे फार मोठी चिंताजनक बाब नव्हती. खरे म्हणजे त्याच्याजवळ धूर्तपणा नसल्याने या सर्व गोष्टी चव्हाट्यावर येत एवढेच! पण एरवी तो अत्यंत प्रज्ञावान असा लष्करी अधिकारी होता. तो शूर, उदार, लढवय्या आणि आवेशी होता. त्याच्या सैनिकांचे त्याच्यावर प्रेम होते. याशिवाय त्याचा आणखी एक विशेष असा होता की, स्त्रियांवर त्याची चटकन छाप पडत असे.

पूर्वेचे साम्राज्य हाती आल्यावर त्याने पाहिली गोष्ट कोणती केली असेल तर क्लिओपात्राला भेटीचे निमंत्रण धाडणे. या भेटीसाठी त्याने जागा मुक्रर केली होती. ती दक्षिण टर्कीमध्ये टार्ससजवळ असणाऱ्या सिडनस नदीजवळची ! अँथनीचा दूत डेलियस त्याचे निमंत्रण घेऊन जेव्हा क्लिओपात्राकडे पोचला तेव्हाच त्याच्या लक्षात आले की आत्मघातकी अशा या लावण्यमोहापासून ॲन्थनी दूर राहू शकणार नाही. तो तिच्या प्रेमता पडेल. ती आता नवथर युवती राहिली नसून पूर्ण स्त्री झाली होती.

सीझरला अंकित करणाऱ्या तिच्या सौंदर्याला आता अनुभवाची जोड मिळाल्याने त्या सौंदयाला एक वेगळीच खुमारी प्राप्त झाली होती. 'ओरिएंटल' राणी म्हणून असणारा तिचा रुबाब तिच्या सौंदर्याला अधिक झळाळी देत होता. निमंत्रण आल्यावर तिची थोडी चलबिचल

झाली. ॲन्थनीच्या हेतूबद्दल तिला जरा शंका आली पण डेलियसने तिला सुचवले की, आजवर तिने सर्वांना जसे जिंकले आहे त्याचप्रमाणे याही सम्राटाला ती सहज वश करू शकेल. (आजवर अनेकांना सहज जिंकणाऱ्या क्लिओपात्राला ॲन्थनीला वश करणे काही जड जाणार नाही) त्याच्या या सूचनेमुळे ती थोडी नि:शंक झाली आणि सिडनस नदीकडे तिने आपली नौका हाकारली. अर्थातच तिने सारा प्रवास मोठ्या रुबाबात केला.

सीझर भेटायला जातेवेळी जशी सुंदर नौका तिने वापरली होती त्याहीपेक्षा अधिक विलासी अशी नौका तिने आता निवडली. त्या नौकेच्या सर्व सांधेजोडांसाठी सोने आणि रूपे वापरले होते. तिची शिडे रेशमी आणि जांभळ्या रंगाची होती. त्या नौकेच्या कठड्यांवरून फेकल्या जाणाऱ्या उत्तमोत्तम सुगंधलहरी आणि दर्जेदार संगीतलहरी पाण्यांच्या लहरींशी स्पर्धा करीत होत्या. ज्यांची अर्धी उघडी शरीरे दागदागिन्यांनी, रत्नांनी मढवलेली आहेत अशा अनेक अर्धनग्न सौंदर्यवती व पुरुष यांची त्या नौकेवर नेमणूक केली होती. पण तरीही आपल्या मालकिणीच्या– क्लिओपात्राच्या– सौंदर्याशी तुलना करणे त्यातील कुणालाच शक्य नव्हते. ती जेव्हा टार्ससला पोचली तेव्हा भरबाजारात तिची मूर्खासारखी वाट पाहात असणाऱ्या ॲन्थनीला एकटाच टाकून सारा गाव तिला पाहण्यासाठी नदीकाठावर जमला.

त्या रात्री तिने ॲन्थनीला एक मेजवानी दिली. त्या मेजवानीचा थाटही ॲन्थनीला अपूर्व वाटावा असाच होता. जेवणासाठी सोन्याच्या जाडजूड थाळ्या होत्या. शामियान्यातील साऱ्या रुजाम्यांवर गुलाबांच्या पाकळ्यांच्या पायघड्या घातल्या होत्या. मंद तेवणाऱ्या असंख्य दीपदानांनी सारी रात्र उजळवून टाकली होती. डोळे दिपवणाऱ्या या थाटामाटातही क्लिओपात्राचे उत्फुल्ल, प्रमाथी सौंदर्य साऱ्या परिसरावर मात करीत होते. त्या धूर्त राणीच्या अटकळीप्रमाणे, योजनेप्रमाणेच ॲन्थनी तिच्या जाळ्यात सापडला. तिच्यासाठी वेडा झाला.

तो एक विवाहित गृहस्थ होता आणि त्याला सार्वजनिक कर्तव्ये, बंधनेदेखील होती. पण क्लिओपात्राबद्दल वाटू लागलेल्या अनावर ओढीपुढे आपल्या पूर्वीच्या सर्व बंधनांचा आणि जबाबदाऱ्यांचा त्याला विसर पडला. तिची भुरळ पडून तो तिच्यामागोमाग अलेक्झांड्रियाला गेला. आपल्याबरोबर अविवेकी, बेबंद, उधळे आयुष्य जगायला तिने त्याला मोहात पाडले.

क्लिओपात्राच्या दरबारातील जीवनक्रम म्हणजे अखंड चालणारे वैषयिक चक्र होते इजिप्शियन राजघराणे तर मात्रागमनी होतेच पण त्यांच्या दरबारातही नपुंसक, लैंगिकदृष्ट्या विकृत अशा लोकांचाच भरणा होता. अलेक्झांड्रियामधील लोकांच्या अध:पतनाला कोणताही नीतिनियम रोखू शकत नव्हता. त्यांचा धर्म 'आदिम' होता. क्रूर देवतांना क्रूर विधींनी ते प्रसन्न करण्याचा प्रयत्न करीत; अतिरिक्त मद्यपान करीत. रात्ररात्रभर धिंगाणा घालीत. आपली सारी संपत्ती अनैतिक उधळपट्टीत वाया घालवीत. निर्जीव अश कलात्मक देखाव्यांची, शिल्पांची, कलाकृतींची निर्मिती करण्यात ते कुशल असतीलही पण त्यांची संस्कृती तेवढ्यापुरतीच

होती आणि हुशारी लोकांना फसवण्यातच होती. स्थिर, विवेकी सरकारच्या स्थापनेकडे, सरकारी कर्तव्यांकडे त्यांचे लक्षच नव्हते: कुटुंबाच्या स्थैर्याबद्दल, कौटुंबिक कर्तव्यांबाबत ते काही विचारच करीत नव्हते.

अशाप्रकारच्या स्वैराचारी, अस्थिर दरबाराची राणी म्हणून क्लिओपात्रा अगदी योग्य होती. ती गर्विष्ठ होती. आपली प्रजा भुकेली असतानाही ती गाढवांच्या दुधाने स्नान करीत असे. ती विकृतही होती. तिच्या मनोरंजनासाठी कैद्यांची आणि गुलामांची निर्दयपणे छळणूक करण्यात येई. ती छचोर होती. अनेक क्षुल्लक, मूर्ख, वायफळ गोष्टी करण्यात किंवा मासेमारी करण्यात ती आपला दिवस घालवीत असे. तिच्याजवळ अमाप संपत्ती होती पण त्या संपत्तीची बेफिकीर बेधडक उधळपट्टी करणे हा तिचा छंद होता. एक थंड रक्ताची, विषयाधीन अशी ही क्लिओपात्रा तिने ॲन्थनीवर कधीच प्रेम केले नाही. फक्त स्वत:ची वासना शमवण्यासाठी आणि आपली राजकीय महत्त्वाकांक्षा पुरी करण्यासाठी त्याचा उपयोग तिने केला.

अखंड मद्यप्राशन, बाहेरख्यालीपणा आणि क्लिओपात्राच्या सहवासाचे, शय्यासुखाचे व्यसन यामुळे ॲन्थनीचा बाहेरच्या जगाशी संपर्क तुटला. राणीची कामातुरता आणि कामक्रीडेतले तिचे कौशल्य एकमेकांना पूरकच होते. ॲन्थनीच्या सुखविषयक साऱ्या कल्पनांना ती ज्या तऱ्हेने प्रतिसाद देत असे तसा प्रतिसाद बिचाऱ्या रोमन युवती कल्पनेतही देऊ शकल्या नसत्या. या सर्वांचा व्हायचा तोच परिणाम झाला. साम्राज्यामधील आपला स्वत:चा वाटा त्याला गमवावा लागला.

अचानक एकदम हा सगळा गुंता तुटला. ॲन्थनीची बायको फाल्विया मत्सराने फणफणत होती. आपल्या नवऱ्याला घरी परत आणण्याची युक्ती शोधता– शोधता तिला एक कल्पना सुचली आणि तिने ऑक्टोव्हिअसविरुद्ध युद्ध पुकारले. तिचा होरा बरोबर ठरला. ॲन्थनी इटलीला आला पण तोपर्यंत खूपच उशीर झाला होता. अल्पावधीतच फाल्विया हृदयविकाराने मृत्यू पावली. इकडे ही चिडचिडी झालेली, वाया गेलेली राणी क्लिओपात्रा आपला राग आपल्या नादान दरबाऱ्यांवर काढू लागली. ही प्रतिकूल परिस्थिती सहन करण्याचे बळ तिच्यात नव्हते आणि त्यामुळे रोमविरुद्ध वेगवेगळे सूडाचे डाव आखण्यात ती गुंतली. स्वत:चे मन रमवण्यासाठी ती एकामागोमाग एक नवीन शय्यासोबती शोधू लागली. पण कुणालाच तिच्या मनाचा कब्जा घेता आला नाही; प्रत्येकजण एका रात्रीपुरता तिच्या वासनेचा लक्ष्य बने आणि दुसऱ्या दिवशी सकाळी त्याला मृत्यूदंड होई.

क्लिओपात्रापासून दूर गेल्यावर मात्र ॲन्थनीची भ्रष्ट बुद्ध थोडी ठिकाणावर आली. हा शूर सेनापती, कृतिशील लढवय्या पुन: एकदा जोमाने उभा राहिला. त्याने ऑक्टेव्हिअसबरोबर समझोता केला आणि त्याच्याच बहिणीशी ऑक्टेव्हियाशी लग्न केले.



अनुक्रमणिका

पुन: एकदा सन्मार्गाकडे वळल्याचे भरघोस बक्षीस त्याला या रूपाने मिळाले, कारण ऑक्टेव्हिया ही एक आदर्श पत्नी होती. अत्यंत निर्दोष पतिव्रता ! ती नि:स्वार्थी, निष्ठावान, धैर्यवान, शूर, नम्र, प्रेमळ होती. क्लिओपात्रापेक्षा ती वयाने लहान होती. तिचे वागणे आदबशीर, खानदानी होते. (क्लिओपात्राप्रमाणे तिच्याजवळ) पुरुषांना चाळवणारे, प्रमाथी, मादक सौंदर्य नव्हते त्यामुळे बघताक्षणी ती कुणाला भुरळ घालू शकत नसे. पण ज्याची अभिरुची उच्च असेल त्याच्या हे लक्षात येई की त्या दोघींमध्ये ऑक्टेव्हिया क्लिओपात्रापेक्षा अधिक सुंदर होती.

पण ॲन्थनी क्लिओपात्राला विसरला नाही. काही काळापुरताच तो पत्नीच्या आकर्षणात गुंतला आणि लगेच आपल्या या सर्वगुणसंपन्न पत्नीला एकटी टाकून, जगाच्या एकतृतीयांश प्रदेशावर राज्य करणारा सम्राट ॲन्थनी अलेक्झांड्रियाला परतला. त्याच्या वासनेने त्याच्या पौरुषयोग्य महत्त्वाकांक्षेवर, कर्तव्यावर विजय मिळवला होता. रोमच्या शत्रूंविरुद्ध लढण्याऐवजी भ्रष्ट, परकीयांच्या निर्जीव कळपात तो गुंतला होता.

आपल्या बहिणीवर होणाऱ्या या अन्यायाचा बदला घेण्यासाठी ऑक्टेव्हिअसने ॲन्थनी व क्लिओपात्रा यांच्याविरुद्ध युद्ध पुकारले. त्यांची सैन्ये,'पेलॉपॉनिझ' या बेटासारख्या असणाऱ्या भूप्रदेशात 'ॲक्टियम' इथे एकमेकांना भिडली.

या लढाईत ऑक्टेव्हिअसचा जय होणे स्वाभाविक होते. त्याच्याजवळ भरपूर सैन्य आणि भरपूर शस्त्रसामुग्री होती. पण महत्त्वाचे म्हणजे त्याच्या सैन्यात आणि नौदलात आज्ञाधारक, शिस्तबद्ध, यंत्रवत कौशल्य असणाऱ्या जिगरी रोमन लोकांचा भरणा होता. हे रोमन सैन्य साऱ्या जगातले प्रथम दर्जाचे लढवय्या सैन्य होते. याउलट एकेकाळी सेनाधुरंधर असणाऱ्या ॲन्थनीकडे मात्र बाजारबुणगे, बेभरवशाचे असे परकीय सैनिक होते. त्यापेक्षा वाईट म्हणजे स्त्रीमर्यादांची जाणीव नसणाऱ्या क्लिओपात्राने त्याच्याबरोबर प्रत्यक्ष रणभूमीवर जाण्याचा आग्रह धरला होता.

स्वत:च्या लहरी आणि चंचल स्वभावाप्रमाणे तिने ॲन्थनीला जमिनीवर न लढता समुद्रावर लढण्याचा सल्ला दिला. खरे म्हणजे रणभूमीवरचे युद्ध त्याला फायदेशीर होते. पण मग स्वत:च्या इजिप्शियन नौदलाची ऐट तिला कशी दाखवता आली असती? प्रेमपागल झालेल्या ॲन्थनीने तिचे म्हणणे मान्य केले. तो फार चुकीचा निर्णय होता. दोघेजण आपापल्या नौकांवर चढली. त्याकाळाची सागरयुद्धे सामान्यत: खलाशांनी भरलेल्या नौकांकारच खेळली जात. ॲन्थनी आणि क्लिओपात्रा यांनी स्वत: नौकारोहण करणे हा बचावाचा पवित्रा होता. अतिशय लोभी अशा क्लिओपात्राने आपली सारी संपत्तीदेखील बरोबर घेतली होती. त्याआधी संपत्तीच्या हव्यासापायी तिने प्राचीन मंदिरांमधील सोनेनाणे लुटलेच होते.

काही काळापर्यंत लढाईत विजयाचे पारडे कुठे झुकेल हे सांगता येत नव्हते. अ‍ॅन्थनी जातीने सैन्याबरोबर होता. अचानक क्लिओपात्राच्या नाविकदलाच्या (आरमाराच्या) जांभळी शिडे पसरलेल्या नौका रणभूमीच्या बाजूला झालेल्या दिसू लागल्या. क्लिओपात्राने कितीही आव आणला तरी रणभूमीवर पाय रोवून उभे राहण्याचे धैर्य तिच्यापाशी नव्हते. त्यामुळे आपली माणसे, नौका, तिच्यासाठी सर्वस्व त्याग करून आलेला तिचा प्रियकर या सर्वांना सोडून ती अलेक्झांड्रियाकडे पळाली. आपल्या संपत्तीच्या जोरावर ऑक्टेव्हिअसबरोबर आपण सौदा करू शकू असे तिला वाटत होते.

अ‍ॅन्थनीने तिला जाताना पाहिले आणि अगतिकपणे तोही तिच्या पाठोपाठ गेला. तिच्याबरोबर आपल्या संबंधांमुळे आपण कोणत्या पातळीवर येऊन पोहचलो आहोत याची त्याला निष्फळ जाणीव झाली. एकेकाळच्या त्या धुरंधर सेनापतीने स्वत:च अशी दुर्दशा करून घेतली होती. आपल्यासाठी लढणाऱ्या आपल्या सैन्याला तसेच सोडून एखाद्या भेकडाप्रमाणे (बायल्याप्रमाणे) त्याने रणांगणातून पळ काढला. त्याचे सैन्य चकित झाले. आपला नेता अशा प्रकारे पळ काढेल यावर त्यांचाच विश्वास बसेना. तो परतेल अशा आशेवर एका आठवड्यापर्यंत त्यांनी टिकाव धरला. अ‍ॅन्थनी संपूर्णपणे अपमानित, पराभूत, लज्जित झाला होता.

ही कमनशिबी जोडी अलेक्झांड्रियाला सुखरूप परतली आणि पुन: त्यांनी सैन्याची जुळवाजुळव करायला सुरुवात केली. पण आता त्यांना मदत करायला कुणीच तयार नव्हते. पूर्वीचे मित्र सोडून गेले. त्यांना पदोपदी अपशकुनच होऊ लागले. या सगळ्या गोष्टींनी बेचैन होऊन क्लिओपात्राने अ‍ॅन्थनीला आपल्याबरोबर एका 'क्लब'मध्ये सामील होण्यास भाग पाडले. त्याचे नाव होते – 'मृत्यूसमयी देखील अविभक्त राहणाऱ्यांचा आदेश.' आता त्यांच्या भोगवादाला अधिकच उधाण आले. विलासांना सीमाच राहिली नाही. त्यावेळी क्लिओपात्रा कैद्यांवर वेगवेगळ्या प्रकारचे विषप्रयोग करीत होती. विषप्राशनानंतर होणारी त्यांची तडफड ती अगदी अविचलपणे पाहात असे. आपली सारी संपत्ती सुरक्षित ठेवण्यासाठी तिने एका स्मारकाची इमारतही घेतली.

ऑक्टेव्हिअसने इजिप्तवर स्वारी करून अलेक्झांड्रियाजवळ तळ ठोकला. क्लिओपात्राने त्याच्याशी गुप्त वाटाघाटी करून स्वत:च्या सुरक्षिततेच्या बदल्यात अ‍ॅन्थनीला त्याच्या ताब्यात देण्याची तयारी दर्शवली. अ‍ॅन्थनीला तिने केलेल्या विश्वासघाताचा सुगावा लागला. पण आपले जाळे परत त्याच्यावर फेकून तिने त्याच्यावरची आपली मोहिनी कायमच राखली.

अ‍ॅन्थनीने आता निकराचा हल्ला करायचा ठरवला आणि त्याप्रमाणे ऑक्टेव्हिअसच्या सैन्यावर त्याने चांगला विजय मिळवला. तो खुशीत परतला पण त्याला व क्लिओपात्रालाही कल्पना होती की हा विजय फसवा आहे. क्षणभंगुर आहे. त्या रात्री आपल्या सर्व सरदारांना



अनुक्रमणिका

त्याने मोठ्या थाटामाटात मेजवानी दिली पण त्याच्यावरच्या प्रेमाने आणि त्याच्या कमनशिबाच्या दर्शनाने ते सारे शोकाकुल झाले होते. मध्यरात्री वेशीवरच्या पहारेकऱ्यांना विचित्र संगीतस्वर ऐकू आले आणि आपल्या शहराचे दैवी अधिष्ठान संपत असल्याची जाणीव त्यांना झाली.

दुसऱ्या दिवशी सकाळी इजिप्शियन नौका रोमन सैन्यावर हल्ला करण्यासाठी म्हणून बाहेर पडल्या पण त्यांच्या बेईमानी राणीच्या आदेशाप्रमाणे एकामागोमाग एक सर्व जहाजे रोमन सैन्याला शरण गेली. हे पाहून ॲन्थनीच्या सैन्याचाही धीर खचला आणि सैनिक इतस्तत: पळू लागले. इरास आणि चार्मियन या आपल्या दोन दासींसह क्लिओपात्रा त्या स्मारकाच्या इमारतीत राहिली. तिने ॲन्थनीला आपल्या आत्महत्येची खोटी बातमी कळवली. त्याचा त्यावर विश्वास बसला. आपण तिला नीट ओळखलेच नाही याची खंत त्याला वाटली आणि लज्जित होऊन त्याने स्वत:ला भोसकून घेतले पण त्याला लगेच मृत्यू आला नाही. तेवढ्यात दुसऱ्या एका दूताने क्लिओपात्रा जिवंत असल्याची बातमी आणली. तिने त्याला 'त्या' इमारती बोलावले होते. तो आल्यावरही त्या स्वार्थी स्त्रीने त्याच्यासाठी इमारतीची दारे खुली केली नाहीत तर एका उंच खिडकीतून दोर सोडून तिने त्याला वर घेतले. आत आल्यावर तिच्या बाहुपाशात त्याचा मृत्यू झाला.

ऑक्टेव्हिअसने आणखी काही दूत पाठवले. आणि सरतेशेवटी तिच्याशी बोलणा करायला तो स्वत:च आला. तिच्याशी बोलताना त्याची नजर सारखी खाली होती. तिच्याविषयीच्या आदराने नव्हे तर तिच्या सौंदर्याचा प्रभाव आपल्यावर पडून आपले मन चळू नये म्हणून ! तिला रोमला परत नेण्याचा त्याने निश्चयच केला होता. आपल्या विजयाची खूण म्हणून त्या क्लिओपात्राला साखळदंडात जखडून रोमच्या रस्त्यावरून तिची वरात काढण्याचा त्याचा बेत होता. आणि त्यामुळे उतावळेपणाने तिने आत्महत्या करू नये अशी त्याची इच्छा होती.

क्लिओपात्राचे दुर्गुण मान्य करूनही हे मान्य करायला हवे की, तिच्याजवळ आगळा रुबाब होता. ऑक्टेव्हिअसच्या एका सरदाराला – डोलाबेलला तिने आपल्या प्रेमात पाडले होते. (तिच्यावर ओढवलेल्या संकटमालिकांमध्ये देखील दुसऱ्याला वश करून घेण्याचे तिचे सामर्थ्य अबाधितच होते.) डोलाबेलाने तिला ऑक्टेव्हिअस सीझरच्या हेतूंची कल्पना दिली होती. आपला असा पाणउतारा करून घेणे तिला सहन होणारे नव्हतेच. तिने एका विश्वासू, म्हाताऱ्या खेडूताला आपल्यासाठी अंजीर घेऊन येण्याची आज्ञा केली. रखवालदारांना त्याचा संशय आला नाही. त्यांनी त्या खेडूताला आत सोडले. अंजिरांनी भरलेल्या त्याच्या टोपलीत एक जहरी साप होता. क्लिओपात्राने केलेल्या सापांबद्दलच्या अभ्यासावरून तिने त्या विशिष्ट सापाची निवड केली होती. तो सर्पदंश तिला झटपट आणि यातनारहित मृत्यू देणार होता.

आजवर तिच्या आयुष्यात तिचे स्वत:चे असे काहीच नव्हते. मात्र आता ते आयुष्य सोडून जाताना तिला त्या आपल्या अशा आयुष्याची जाणीव झाली. तिने ऑक्टेव्हिअससाठी एक चिठ्ठी ठेवली. आपणाला ॲन्थनीजवळ पुरण्यात यावे अशी इच्छा तिने त्यात व्यक्त केली होती. नंतर तिने इरास आणि चार्मियन यांना आपला साजशृंगार करण्यास सांगितले. अत्यंत वैभवशाली कपडे व उत्तमोत्तम दागिने घालून ती सजली: आपला मुकुट तिने डोक्यावर ठेवला. सुवर्णसिंहासनावर बसून तिने अत्यंत शांतपणे तो जहरी साप आपल्या हातावर बाहुभूषणासारखा गुंडाळला, आपल्या उन्नत वक्षस्थळावर त्याला विसावू दिले. इरास आणि चार्मियन यांची स्वामीनिष्ठा इतकी प्रखर होती की त्यांनीही आपल्या स्वामिनीचेच अनुकरण केले. ऑक्टेव्हिअसला ती चिठ्ठी मिळाल्याबरोबर तो धावतच त्या स्मारकाकडे आला. पण फार उशीर झाला होता. ती सम्राज्ञी मृत्यू पावली होती. इरास मृत्युपंथाला लागली होती. आणि चार्मियनच्या जीवात थोडीशी धुगधुगी होती. ऑक्टेव्हिअसने कठोरपणे तिला विचारले, "हे योग्य झाले का?" ती उत्तरली, "होय. अगदी योग्य ! तिच्या राजघराण्याला साजेसा असाच त्या सम्राज्ञीचा मृत्यू झाला."

**कल्पितकथा**

क्लिओपात्राबद्दलची दंतकथा ही अशी आहे. त्या गोष्टीची सुरुवातच चुकीच्या गोष्टींनी होते. क्लिओपात्रा इजिप्शियन नव्हती. ती ग्रीक होती. तिच्या मृत्यूसमयीची परिस्थिती ऑक्टेव्हियसबद्दल शंका घेण्यासारखी आहे. तिच्या आत्महत्येला मूक संमती देऊन त्याने या भयंकर, प्रभावी शत्रूपासून स्वत:ची सुटका करून घेतली असावी असे म्हणण्यास जागा आहे.

गेली दोन हजार वर्षे ही गोष्ट पुन:पुन: सांगितली जात आहे. कालौघात तिची गोष्ट आणि सत्य यात हळूहळू धूसरतेचा पडदा आपोआप येत गेला. प्रत्यक्ष ती जिवंत असताना-देखील तिच्याबद्दलचे निरनिराळे शोध लोक लावत होतेच. तिने स्वत:बद्दलचा केलेला प्रचार आणि तिच्या शत्रूंनी तिच्याबद्दल पिकवलेल्या कंड्या यामुळे ती नेहमीच टीकेचा आणि उलटसुलट विधानांचा विषय झाली. रोमनांच्या मनात ती एक असंस्कृत, अनीतिमान स्त्री होती. तिने त्यांचे अनेक भलेभले सरदार नादी लावून कुमार्गाकडे वळवले होते असे त्यांना वाटे. तिच्या इजिप्शियन प्रजेला मात्र ती देवीसमान किंवा विश्वमातेसमान भासे. पूर्वमध्य भागातील हेलेनिस्टिक[१] लोकांना ती एखादी प्रेषित किंवा स्वातंत्र्यदायिनी वाटे. तिनेच आपल्याला राजकीय शोषणापासून मुक्त केले आणि सुवर्णयुगाची चव चाखू दिली असा त्यांचा विश्वास होता. पण या सर्व प्रतिमा अतिशय कौशल्याने, मुद्दाम निर्मिलेल्या, खतपाणी घालून वाढवलेल्या आहेत.



अनुक्रमणिका

ऑक्टेव्हिअस आणि त्याचे सहकारी हे जनमताचा कौल फिरवण्यात अत्यंत धोरणी होते आणि क्लिओपात्रा स्वत: अत्यंत जाहिरातबाज, दिखाऊगिरी करणारी होती. स्वत:च्या आयुष्यातील महत्त्वाच्या, आणीबाणीच्या घटनांचा देखील उपयोग लोकांना आपल्याकडे वळवण्यासाठी आपल्याला सहानुभूती मिळवून घेण्यासाठी कसा करता येईल याचे तिला पक्के भान होते. तिची आत्महत्या ही देखील अशा प्रकारची 'स्टंटबाजी' होती.

गेल्या अनेक शतकात इतिहासतज्ज्ञांनी तिच्या कथेचा जास्तीत जास्त वास्तवपूर्ण धांडोळा घेतला. वेगवेगळ्या इतिहाससाधनांच्या मदतीने, संशोधनपूर्वक काही निखळ सत्य लोकांसमोर ठेवली. ती अशी —

सातवी क्लिओपात्रा इ. स. पूर्व ६९ मध्ये जन्मली. १२व्या टॉलेमीचे हे तिसरे अपत्य ! इजिप्तच्या या राजाचे टोपणनाव ऑलेटस (बासरीवादक) असे होते. पहिल्या टॉलेमीची क्लिओपात्रा वंशज होती. पहिला टॉलेमी मॅसिडोनियन[२] सेनापती होता. इ. स. पूर्व ३२३ मध्ये सम्राट अलेक्झांडरचा मृत्यू झाल्यावर टॉलेमी इजिप्तचा राजा झाला. क्लिओपात्राच्या आईची नक्की माहिती सांगता येत नाही. पण टॉलेमी वंशाने 'फॅरो' लोकांची विवाहपद्धती स्वीकारली होती. त्यानुसार बहिणभावांची लग्ने होत. त्यावरून तिची आईही ग्रीक वंशातीलच असावी असे अनुमान काढता येते.

तिच्या जन्माच्यावेळी इजिप्त हे समृद्ध पण राजकीयदृष्ट्या अस्थिर असे राज्य होते. एकेकाळी उत्तरेकडे एशिया मायनरपासून पूर्वेस सीरियापर्यंत पसरलेल्या टॉलेमी साम्राज्याचे आता फक्त अवशेष शिल्लक होते. आणि ते साम्राज्य आता फक्त इजिप्तपुरते मर्यादित झाले होते. रोमच्या वाढत्या सत्तेने टॉलेमींचा बराच भूप्रदेश गिळंकृत केला होता. असेही सांगितले जाई की पूर्वीच्या एका टॉलेमीने आर्थिक दुरवस्था आणि सैनिकी मदतीची गरज यांच्या कचाट्यात सापडून आपले सर्व साम्राज्य मृत्यूपत्राद्वारे जनतार्पण केले होते. परकीय आक्रमणाचा धोका इजिप्तला सततच होता आणि स्वसंरक्षणाचे त्याचे प्रयत्न फार अपुरे होते.

भांडखोर रोमन लोकांना आव्हान देण्याऐवजी ऑलेटस टॉलेमीने त्यांना मदत केली. यापुढे इजिप्त हे काही स्वतंत्र, मोठे राष्ट्र बनू शकणार नाही असेच त्याला वाटे. इतिहास आपल्याला असेच सांगतो की अनेक दुय्यम, दर्जाच्या राष्ट्रांनी अशीच दुसऱ्या कोणत्यातरी महासत्तेची मदत घेतलेली आहे. त्याची प्रतिमा त्यामुळे शवल झाली. तो दुर्बळ ठरला. पण एकट्या क्लिओपात्राला मात्र त्याचे धोरण अतिशय धूर्तपणाचे आहे हे उमजले. आपण रोमन मदतीवरच आपले राजकीय धोरण आखायला हवे हे तिच्या लक्षात आले.

इ. स. पूर्व ५९ मध्ये अंतर्गत राजकीय अस्थैर्य आणि रोमची वाढती सत्तालालसा यामुळे घाबरून ऑलेटिसने ज्यूलियस सीझर आणि पॉम्पे यांना विनंती करून जाहीर करावयास



अनुक्रमणिका

लावले की,'इजिप्त आणि रोमन यांच्यात मित्रत्वाचे संबंध असतील. टॉलेमी हा रोमचा मित्रच आहे.' मात्र या जाहीर घोषणेची पुरेपूर किंमत सीझर व पॉम्पे यांनी वसूल केली. यासाठी संपूर्ण इजिप्तच्या वार्षिक महसुलीएवढी रक्कम त्यांना द्यावी लागली. आधीच विपन्नावस्थेत असणाऱ्या आपल्या प्रजेकडून ६००० टॅलेन्ट एवढी रक्कम उभी करणे अशक्य आहे हे टॉलेमीने ओळखले. आणि त्यामुळे एका रोमन सावकाराकडून त्याने तेवढे कर्ज घेतले.

पण हा व्यवहार त्या टॉलेमीला आणि त्याच्या प्रजेलाही नुकसानीचा ठरला. टॉलेमीने जाहीर करवलेल्या विरुदांचा प्रभाव जनतेवर पडला नाही. त्यांची अंतर्गत बंडाळी चालूच राहिली. दोन वर्षानंतर टॉलेमी पुन: सैनिकी मदत मागण्यासाठी रोमला गेला. त्यावेळी १२ वर्षाच्या क्लिओपात्राला त्याने आपल्यावरोबर नेले असावे. त्याच्या गैरहजेरीत त्याची मुलगी सहावी क्लिओपात्रा– ट्रायफिना– हिने त्याची गादी बळकावली. रोम पॉम्पेच्या एका मदतनीसाला– गॅबिनियसला राजी करून त्याने मदत मिळवली– पण त्यासाठी त्याला १०००० टॅलेन्ट द्यावे लागले. (टॅलेन्ट – चलनी नाणे)

सहावी क्लिओपात्रा– ट्रायफिना– हिचे राज्य अल्पजीवी ठरले. गॅबिनियस इजिप्तला येईपर्यंत ती मृत्यू पावली. बहुधा तिच्या वडिलांच्या समर्थकांनी तिला मारली असावी. तिच्या मृत्यूनंतर ऑलेटिसची दुसरी मुलगी बेरेनिस हिने गादीवर ताबा मिळवला. गॅबिनियसने मार्क अ‍ॅन्टनी या तरुण लष्करी अधिकाऱ्याच्या मदतीने टॉलेमीला पुन: गादीवर बसवले. टॉलेमीने गादीवर येताच बेरेनिसला फाशी दिली. इ. स. पूर्व ५१मध्ये तो मृत्यू पावला. त्याच्या मृत्यूपत्राप्रमाणे क्लिओपात्रा आणि तिचा भाऊ तेरावा टॉलेमी हे राज्याचे संयुक्त वारस ठरले. ही नवी राणी केवळ अठरा वर्षांची तर नवा राजा दहा वर्षाचा होता. क्लिओपात्राचे वर्णन तिच्याकाळच्या लोकांनी जे, जसे केले ते आज आपल्याला उपलब्ध नाही. पण तिच्या मृत्यूनंतर २०० वर्षांनी ग्रीक चरित्रकार प्लुटार्क याने तिचे चरित्र लिहिले.

आपल्या चरित्रलेखनासाठी त्याला आधार होता तो काही लोकांनी लिहिलेल्या तिच्याबद्दलच्या आठवणींचा ! शिवाय इतिहासलेखन म्हणूनही काही जणांनी क्लिओपात्रा व इजिप्त, रोमसंबंधी लिहिले होते. या इतिहासाचाही त्याने उपयोग करून घेतला.

आज प्लुटार्कचे चरित्र उपलब्ध असले तरी त्याने उपयोगात आणलेली चरित्रसाधने मात्र उपलब्ध नाहीत. त्या चरित्रानुसार क्लिओपात्राचे रूप फार अप्रतिम होते असे नव्हे, पण तिचा नादमधुर आवाज, तिचा आगळा रूबाब आणि एकूणच तिच्या व्यक्तिमत्त्वाचा प्रभाव हा मात्र जबरदस्त होता. त्यामुळे तिची संगत सर्वांना हवीहवीशी वाटे. तिच्या आज्ञेवरून तयार केली गेलेली आणि त्यामुळे तिची अधिक प्रशंसा करणारी नाणी पाहिली असता अतिशय प्रभावी चेहरा, त्यावरील हाडांचे उंचवटे, बाकदार नाक, पुढे असणारी हनुवटी या गोष्टी लक्षात येतात. प्रभावी चेहरा, व्यक्तिमत्त्व असूनही त्याकाळीही ती कुणाला सौंदर्यखनी



अनुक्रमणिका

वाटण्याएवढी सुंदर नव्हती. आजच्या घडीलाही तिचे सौंदर्य हल्लीच्या सौंदर्यकल्पनेत बसण्यासारखे नाही. तिच्याबद्दलच्या दंतकथांमध्ये वशीकरण करणारी, भुरळ पाडणारी स्त्री अशी जो तिची प्रतिमा आहे, त्यापेक्षा या नाण्यांवरील प्रतिमा फार निराळी आहे. आपल्या स्वत:च्या आयुष्याला तिने ज्याप्रकारे वळण दिले त्यावरून तिच्या स्वभावाची कल्पना बांधता येते.

तिच्या कारकीर्दीची पहिली दोन वर्षे त्रासदायक होती. त्यावर्षी नाईल नदीला पुरेसे पाणी नसल्याने पीकही कमीच आले. अन्नधान्याचा तुटवडा निर्माण झाला आणि खेड्यांमधले कामगार कर भरणे अशक्य झाल्याने गाव सोडून गेले. आंतरराष्ट्रीय हालचालींही समस्या निर्माण करणाऱ्याच ठरल्या. पार्थियन्सच्या विरुद्ध लढण्यासाठी सिरीयाच्या रोमन गव्हर्नरला मदत करण्याचे क्लिओपात्राने कबूल केले. पण तिच्या सैनिकांनी बंड करून जाण्याचे नाकारले. तेव्हापासून क्लिओपात्राला रोमनांची साथीदार असे समजण्यात येऊ लागले. मात्र तिच्या देशप्रेमी सैनिकांमध्ये ती याच कारणामुळे काहीशी अप्रिय ठरली.

पोथिनस हा त्या छोट्या राजाची देखभाल करणारा व त्यामुळे दरबारात वजन असणारा प्रतिहारी होता. त्याला सर्वच रोमन गोष्टींचा तिटकारा होता. त्यामुळे इ. स. पूर्व ४९च्या सप्टेंबरात क्लिओपात्रा अलेक्झांड्रियाहून गेल्याबरोबर त्याने छोट्या टॉलेमीच्याच नावाने सर्व व्यवहार करायला सुरुवात केली.

इकडे रोममध्ये पॉम्पे आणि ज्युलियस सीझर यांच्यात भांडण झाले होते. यादवी युद्ध सुरू झाले होते. पॉम्पे द ग्रेटचा मुलगा कॅनियस वडिलांच्या वतीने मदत मागण्यासाठी अलेक्झांड्रियाला आला. पोथिनसच्या आधिपत्याखालील इजिप्शियन सरकारने त्याला जहाजे, मनुष्यबळ आणि अन्नधान्य यांची मदत देऊ केली. पण यावेळी क्लिओपात्रा आणि पॉम्पे यांची भेट झाली असणे अशक्य वाटते. प्लुटार्क आणि नंतरचे अनेक लेखक वर्णन करतात त्याप्रमाणे तिने त्याला एकट्याला भेटून भुरळ घातली असावी. हा तर्क योग्य वाटत नाही. त्यानंतर वर्षभरातच सीझरने पॉम्पेचा मध्यग्रीसमध्ये फार्सलस येथे पराभव केला. आपले संरक्षण होईल, स्वागत होईल अशा आशेने पॉम्पे इजिप्तला गेला खरा पण पराभूत राजाचा साथीदार होण्याची पोथिनसची इच्छा नव्हती. कॉर्नेलिया या आपल्या पत्नीसह पॉम्पे जेव्हा इजिप्तचा किनाऱ्यावर उतरला तेव्हा त्याच्या अपेक्षेप्रमाणे त्याचे स्वागत झाले नाही. एका छोट्याशा होडीतून किनाऱ्यावर जाण्यासाठी त्याला सुचवले गेले. त्याने थोडीशी नाखुषीनेच या गोष्टीला परवानगी दिली. प्रत्यक्ष होडीवर कॉर्नेलियाच्या डोळ्यांदेखत तिच्या पतीचा शिरच्छेद केला गेला.

चार दिवसांनंतर सीझर इजिप्तला आल्यावर पॉम्पेचे शिर त्याला दाखवण्यात आले. पण त्याच्या शत्रूला मारल्याबद्दल कौतुक करण्याऐवजी अशा विश्वासघातकीपणाने एका रोमन

राजाचा शिरच्छेद केल्याबद्दल सीझर पोथिनसवर भयंकर संतापला. सीझरला संपत्ती हवी होती. 'ऑलेटिस टॉलेमीचे पूर्वीचे ६००० टॅलेन्ट एवढे कर्ज सव्याज परत करा' असा धोशा त्याने लावला. यावरून लक्षात येते की क्लिओपात्राच्या सौंदर्याने घायाळ होऊन तो अलेक्झांड्रियात राहिला नव्हता तर धनप्राप्ती व्हावी, पैसे वसुली व्हावी म्हणून त्याने तिथे मुक्काम ठोकला.

रोमन सेनाधिकाऱ्याच्या वेषात आलेल्या सीझरला पाहून हा आपल्यावर सत्ता गाजवील या कल्पनेने इजिप्शियन जनतेने दंगल केली. आपले पैसे सोडून परत जाणेही त्याला प्रतिकूल हवामानामुळे अशक्य होते. त्यामुळे तिथेच राहून आलेल्या परिस्थितीला तोंड द्यावे अशा विचाराने त्याने राजवाड्यात मुक्काम ठोकला.

१३वा टॉलेमी राजा आणि पोथिनस त्याला येऊन मिळाले. काही काळाने पोथिनसच्य सुरक्षारक्षकांना दाद न देता राणी क्लिओपात्राही तिथे येऊन पोचली. तिचे येणे पोथिनसला अर्थातच आवडले नव्हते. सीझर आणि क्लिओपात्रा एकमेकांकडे आकर्षित झाली. या प्रेमरज्जूंच्या बंधनाने, दुसरा पर्याय नसल्याने व पोथिनसच्या शत्रुत्वाने त्रासून सीझरने क्लिओपात्राच्या बाजूने लढायचे ठरवले. त्याने जाहीर केले की,"आपल्या वडिलांच्या मृत्यूपत्राप्रमाणे टॉलेमी व क्लिओपात्रा यांनी रीतसर लग्न करून संयुक्तरित्या राज्यकारभार करवा."

टॉलेमी आणि पोथिनस यांनी त्याला वरवर मान्यता दर्शवली; पण इ. स. पूर्व ४८च्या शेवटास अचिलसने- बहुधा पोथिनसच्या सल्ल्याने- इजिप्शियन सेनेच्या मदतीने अलेक्झांड्रियावर हल्ला केला आणि महालाभोवती पहारा बसवला. नंतर दोन महिनेपर्यंत शहरात चकमकी झडत राहिल्या पण निर्णायक युद्ध झाले नाही. सीझर, पोथिनस, क्लिओपात्रा, १३वा टॉलेमी आणि राजकुटुंबातील इतर सदस्य राजवाड्यात नजरकैदेतच होते.

क्लिओपात्राची धाकटी बहीण अर्सिना हिने अचिलसच्या सेनेला मिळण्याचे ठरवले आणि स्वत:ला राणी म्हणून घोषित केले तेव्हा ही कोंडी फुटली. पोथिनस आणि अर्सिना यांची हातमिळवणी झाल्याचे सीझरच्या लक्षात आले. याचा फायदा घेऊन पोथिनसचा शिरच्छेद त्याने करवला आणि १३व्या टॉलेमीला राजवाड्याबाहेर जाऊ दिले. त्यामुळे सैन्याची निष्ठा दुभंगेल अशी त्याला आशा असावी. नंतर सीझरने आपले सैन्य गोळा करून इजिप्शियन सैन्याचा पराभव केला. १३ व्या टॉलेमीला नाइलमध्ये बुडून मृत्यू आला. त्याच्या अंगावरील सुवर्णजडित सैनिकी वेषाच्या वजनाने तो बुडाला असावा.

सीझरला मार्ग मोकळा होता. इजिप्तचे राज्य आपल्या राज्याला जोडण्याचा मोह सीझरने टाळला. इतिहासतज्ज्ञ स्युटोनियस याच्या म्हणण्याप्रमाणे एकतर क्लिओपात्राबद्दलच्या निष्ठेने



अनुक्रमणिका

त्याने तसे केले नसावे. दुसरे कारण असे की, इजिप्तचा कोणीही रोमन गव्हर्नर एवढा श्रीमंत आणि सत्ताधीश झाला असता की रोममधील केंद्राला तो कायमची डोकेदुखी झाली असती असा विचार करून त्याने १२ वर्षांच्या १४व्या टॉलेमीशी क्लिओपात्राचे लग्न लावून दिले आणि त्या दोघांना संयुक्त सत्ताधीश म्हणून जाहीर केले. या १४व्या टॉलेमीला पोथिनससारखा कोणी समर्थ पालक नव्हता. त्यामुळे तेव्हापासून क्लिओपात्रा एकटी समर्थपणे राज्यशकट हाकू लागली. तिला मदत व्हावी म्हणून आणि आपल्याला झालेल्या त्रासाची आठवण राहावी म्हणूनही सीझरने आपले बरेच घोडदळ व पायदळ अलेक्झांड्रियात ठेवले.

सीझर आणि क्लिओपात्रा बहुधा एकत्रितपणे नाईलच्या सफरीवर गेली असतील पण त्या सफरीच्या कालावधीबाबत मात्र अनिश्चिती आहे. काही अभ्यासकांच्या मते मारेओटिस सरोवराकाठच्या लढाईनंतर १५- २० दिवसांतच सीझर इजिप्त सोडून गेला असावा. तस असेल तर त्यांची सफर एक-दोन दिवसांचीच असावी. सीझर इजिप्त सोडून गेला त्यावेळी क्लिओपात्रा गर्भवती होती.

पुढचे संपूर्ण वर्ष सीझर परदेशी दौऱ्यांमध्ये गुंतला होता. इ. स. पू. ४६च्या थंडीपूर्वी जेव्हा तो रोमला परतला तेव्हा त्याने विजयोत्सव साजरा केला. या उत्सवासाठी चार युद्धांमधले जय हे निमित्त होते; आणि त्या सर्वात महत्त्वाचा होता अलेक्झांड्रियन युद्धातील विजय. या उत्सवाच्या केंद्रभागी होती क्लिओपात्राची बहीण अर्सिना ! सर्व युद्धकैद्यांच्या वरातीत तिला अग्रस्थान होते. पण साखळदंडांनी जखडलेल्या त्या कोवळ्या मुलीची ती कैद असणारी मूर्ती लोकांना पसंत पडली नाही; त्यांना त्या दृश्याने धक्का बसला.

एखाद्या राजकन्येला अशा निर्दयपणे वागवले जात असल्याबद्दल त्यांनी नापसंती व्यक्तवली. त्यामुळे बहुधा, विजयोत्सवानंतर इतर कैद्यांना फाशी दिले तरी तिला मात्र फाशी झाली नाही. तिला Ephesus – इफेसस येथील आर्टेमिसच्या देवळात आश्रयार्थ ठेवले गेले.

या सर्व प्रसंगाला क्लिओपात्रा साक्षीदार असावी. कारण या प्रसंगानंतर लगेचच ती रोममध्ये हजर असल्याचा पुरावा सापडतो. आपला भाऊ व पती असणारा छोटा टॉलेमी आणि आपले नवजात बाळ यांना घेऊन ती तिथे आली होती. तिने आपल्या मुलाचे नाव टॉलेमी सीझर असे ठेवले. नावावरूनच त्याच्या उज्ज्वल वारशाचा पत्ता लागावा अशी तिची इच्छा मात्र असफल ठरली. सीझरने जाहीरपणे त्या मुलाचे पितृत्व स्वीकारले नाही. त्यामुळे आजपर्यंत त्या मुलाचा खरा पिता कोण याविषयी निश्चित पुरावा उपलब्ध नाही. नक्की माहीत आहे ते एवढेच की, सीझरची पाहुणी म्हणून ती एक वर्षभर रोममध्ये राहिली. इ. स. पूर्व ४४ मध्ये सीझरची हत्या झाल्यावर ती परत गेली.

सीझरचा वध मार्चमध्ये झाला आणि लगेचच जुलैत ती अलेक्झांड्रियात परतली.



अनुक्रमणिका

सप्टेंबरमध्ये १४वा टॉलेमी मृत्यू पावला. तिने त्याचा वध करवला अशी बोलवा होती. त्यासंबंधी पक्का पुरवा नसला तरी तिच्या बाबतीतला हा संशय शेवटपर्यंत दूर झाला नाही. आपल्या या वैधव्याचे तिने राजकीय भांडवल मात्र केले. तिने आपल्या तान्ह्या मुलाला टॉलेमी १५वा म्हणून बढती दिली आणि त्याला राज्याचा भागीदार बनवले. अप्रत्यक्षपणे स्वत:च्या सत्तेचा मार्ग तिने मोकळा करून घेतला. हा मुलगा खरोखरी सत्ताग्रहण करण्याची वेळ फारच दूर होती. शिवाय ज्यूलियस सीझरचा वारस असणारा हा सिझेरिया तिचा आदर्श जोडीदार ठरला असता व त्या दोघा मायलेकांनी साऱ्या भूमध्य समुद्रावर राज्य केले असते.

पंचविशीच्या आसपास असणाऱ्या क्लिओपात्राने पुढची तीन वर्षे आपल्या राज्याकडे लक्ष दिले. ते काम जिकीरीचे होते. पुन: अवर्षणाचा धोका होता. पण तरीही खुद्द अलेक्झांड्रियात व आजूबाजूच्या प्रदेशात शांतता राखण्यात ती यशस्वी झाली.

परराष्ट्रातील घटना तिच्या दृष्टीने याहून अधिक धोकादायक होत्या. ज्यूलियस सीझरची रोममध्ये हत्या झाली, आणि त्यानंतर लोकांच्या निष्ठा बदलू लागल्याने काही काळ गोंधळच झाला. सीझरचे मारेकरी होते ब्रूटस आणि कॅशियस ! लोक आता आपल्या बाजूने उभे राहणार नाहीत हे त्यांच्या तेव्हाच लक्षात आले. त्याबरोबर मार्चच्या मध्यावरच त्यांनी इटलीमधून प्रस्थान ठेवले. आर्थिक साह्य आणि जनतेचा पाठिंबा मिळवण्यासाठी त्यांनी राज्याच्या पूर्वभागात जायचे ठरवले. रोममंध्ये ऑक्टेव्हिअसने गादीवर आपला हक्क प्रस्थापित करण्याचा प्रयत्न सुरू केला होता.

ऑक्टेव्हिअस हा सीझरचा, १९ वर्षांचा दत्तकपुत्र होता. (तो सीझरचा भाचाही होता.) सीझरच्या हत्येच्या वेळी ॲन्थनी परराष्ट्रमंत्री होता आणि त्यावेळच्या घटनेनुसार त्याच्याकडे सर्वाधिकार होते. ॲन्थनी आणि ऑक्टेव्हिअस यांच्यातील सत्तास्पर्धेमुळे राज्यात यादवी युद्ध होण्याची वेळ येऊन ठेपली होती. म्युटीना येथे झालेले युद्ध निर्णायक ठरले नाही आणि त्यामुळे त्यांनी संधी करण्याचे ठरवून 'लेपिडस'बरोबर हात मिळवणी केली. लेपिडस त्यावेळी घोडदळ प्रमुख होता. राज्यकारभारासाठी तिघांमधील 'आघाडी सरकार' त्यांनी स्थापिले. त्यामुळे एकच गोष्ट झाली. निदान सीझरचे मित्र एकत्रित झाले आणि त्यांनी त्याच्या मारेकऱ्यांविरुद्ध संयुक्त आघाडी उघडली असे लोकांना जाणवले.

पूर्वमध्य समुद्रावरील एका श्रीमंत राज्याची क्लिओपात्रा ही राणी असल्याने या दोन्ही पक्षांनी तिच्याकडे मदतीची याचना केली. पुन: इतिहासाचीच पुनरावृत्ती झाली. इजिप्तची भविष्यकालीन सुरक्षितता रोमच्या अंतर्गत कलहावर, त्या कलहाच्या जय– पराजयावर अवलंबून राहिली. पुढचे संपूर्ण वर्ष क्लिओपात्राने या दोन्ही पक्षांना झुलवत ठेवले– प्रसंगी, दुटप्पी वागून, कधी चालढकल करून ! आपल्या राज्यातील अवर्षणाचे कारण तिने कॅशियसला सांगितले आणि आरमार किंवा मनुष्यबळ पाठवण्याबाबतची आपली असमर्थता प्रकट केली.

त्याला असे सांगून स्वत: एक जहाजांचा तांडा तयार करून ती अॅन्थनी आणि ऑक्टेव्हिअस यांना भेटायला निघाली खरी, पण त्यावेळी झालेल्या वादळाने ती आजरी पडली. जहाजांचा तांडा अलेक्झांड्रियाला परत फिरला. तिच्या वागणुकीमुळे असे वाटत होते की त्यांना भेटण्याची तिची इच्छाच नसावी. त्यांना भेटायला जायचे जाहीर करून अर्ध्या वाटेवर जाऊन तिने एवढे तर सूचित केले की आपला पाठिंबा या संयुक्त आघाडीलाच आहे. पण कोणत्याही एका पक्षाला आपली निष्ठा देण्याआधी त्यांच्यातील युद्धाचा निर्णय काय होतो, याची वाट पाहणे तिला शहाणपणाचे वाटले असावे.

इ. स. पूर्व ४२ मध्ये फिलिपी येथे झालेल्या लढाईत ही संयुक्त आघाडी विजयी झाली. ब्रूटस आणि कॅशियस यांनी आत्महत्या केली. त्यामुळे संयुक्त आघाडीची सत्ता रोमभर अनिर्बंध पसरली. पॉम्पेचा एक मुलगा सेकटस पॉम्पे हा मात्र सिसिलीवर राज्य करीत होता. तो त्यांच्या राज्यात सामील झाला नाही. ऑक्टेव्हिअस आणि अॅन्थनी यांना लेपिडसच्या निष्ठेविषयी शंका आल्याने त्यांनी त्याला बाजूला सारले आणि राज्याचे दोन भाग केले. ऑक्टेव्हिअसने पश्चिम युरोप तर अॅन्थनीने पूर्व युरोप आपल्या ताब्यात घेतला.

यावेळी अॅन्थनी चाळिशीत होता. फाल्विया नावाच्या बुद्धिमान, महत्त्वाकांक्षी स्त्रीबरोबर त्याचे तिसरे लग्न झाले होते. आपल्या युद्धनेतृत्वाबद्दल तो प्रसिद्ध होता; पण सीझरच्या हत्येनंतर एक कुशल, चतुर राजकारणी म्हणून आपली प्रतिमा जनमानसात रुजवण्यात तो यशस्वी झाला. अस्थिर परिस्थिती हाताळण्यातील आपले कौशल्य त्याने सिद्ध केले त्याचबरोबर लोकांना आपण हुकुमशहा आहोत असे तर वाटू नये पण त्यांनी आपल्या म्हणण्यानुसारच वागावे अशा पद्धतीने तो वागत होता. आता त्याने पार्थियन साम्राज्यावर हल्ला करायचे ठरवले. (आताच्या इराण व इराकमधील हे साम्राज्य). ज्यूलियस सीझरने हत्येआधी काही दिवस या मोहिमेची आखणी केली होती. अॅन्थनीने तीच मोहीम हाती घेऊन आपण सीझरचा वारसाच पुढे चालवीत आहोत असा आव आणला आणि 'रोमनांमधील जेता' ही आपली भूमिका पक्की केली. अशा मोहिमांना मोठ्या प्रमाणावर अर्थसाह्य लागते, आपल्या पूर्वसूरींप्रमाणेच अॅन्थनीनेही इजिप्तचा संपत्तीचा लाभ घ्यायचा असे ठरवले.

अॅन्थनी गॅबिनियसबरोबर प्रथम इजिप्त्ला आला तेव्हा विशीतील क्लिओपात्रा त्याला प्रथमच भेटली असावी. खरे म्हणजे सीझरची पाहुणी म्हणून रोममध्ये तिने जेव्हा दीर्घ वास्तव्य केले होते तेव्हा सीझरच्या या खास दोस्ताची आणि जवळच्या सहकाऱ्याची तिची भेट नक्कीच झाली असावी. तरीही अॅन्थनीने तार्सस येथे तिला भेटायला बोलावले. तेव्हा तिला संशय घ्यायला भरपूर वाव होता. त्याचे निमंत्रणही मैत्रीचे नव्हते. कॅशियसला छुपी मदत केल्याचा आरोप तिच्यावर करून त्याबद्दलचे स्पष्टीकरण त्याने त्या पत्रात मागितले होते. अॅन्थनीची मैत्री आपल्याला सहजासहजी मिळणार नाही. त्यासाठी किंमत मोजावी



अनुक्रमणिका

लागेल हे ती जाणून होती. आपल्या सैन्यासाठी त्याला पैशांची गरज होती आणि संपूर्ण पूर्वेच्या भागात इजिप्तशिवाय कोणतेच राष्ट्र अशी मदत करू शकणार नाही याचीही तिला कल्पना होती.

तार्सस इथे त्या दोघांची भेट झाल्यावर ते एकमेकांच्या प्रेमातच पडले. तरीही त्यांनी एक कठीण असा सौदा केला. क्लिओपात्राने ॲन्थनीच्या पार्थियन मोहिमेची सर्व आर्थिक जबाबदारी उचलायची आणि त्या बदल्यात त्याने तिच्या सर्व शत्रूंचा बीमोड करायचा असा सौदा झाला. आपल्या इतर शत्रूंप्रमाणेच अर्सिना या आपल्या बहिणीलाही ठार मारण्याचा आग्रह क्लिओपात्राने धरला. एफिसस येथे तिची बहीण अजूनही शुश्रुषालयात होती आणि तिने बेमुर्वतखोरपणे स्वत:ला इजिप्तची राणी म्हणून घोषित केले होते. क्लिओपात्रा आणि ॲन्थनी यांच्या या गाजलेल्या प्रणयभेटीत दोघांनी एकमेकांना दिलेली ही प्रेमभेट होती. क्लिओपात्राचा शेवटचा वंशज (वारस) मारला जाणार होता.

वसंतऋतूचा आरंभ झाल्याशिवाय कोणतीच मोहीम सुरू करता येत नव्हती. त्यामुळे ॲन्थनी तिच्याबरोबर अलेक्झांड्रियाला गेला. हिवाळा तिथेच घालवण्याचा त्याचा मनोदय होता. आपल्या प्रणयी विभ्रमांनी त्याला मोहित करण्यात तिने कोणतीच कसूर केली नाही हे नक्की ! लैंगिक सुखाची ओढ ॲन्थनीला अधिक होती. आपल्या कामातुरतेबद्दल तो प्रसिद्ध होताच शिवाय रोमनांच्या सहवासापेक्षा त्याला ग्रीकांचा– हेलेनिक जगाचा– सहवास अधिक प्रिय होता. त्यामुळे आपल्या या नव्या प्रेयसी, सहकारिणीबरोबर तो चांगलाच रमला. काही महिन्यांनंतर मात्र त्याला जावे लागले. त्याची पत्नी फाल्विया आणि भाऊ ल्यूशियस यांनी ऑक्टेव्हिअसविरुद्ध इटलीत बंड केले होते. त्यांचा पराभव झाला होता. आणि फाल्विया ग्रीसला पळून गेली होती. त्याला ही बातमी कळल्याबरोबर तो ताबडतोब अलेक्झांड्रिया येथून निघाला. त्याची व क्लिओपात्राची भेट आता जवळजवळ साडेतीन वर्षे होणार नव्हती.

फाल्विया आणि ॲन्थनी यांची भेट अथेन्समध्ये झाली. ती तेव्हा आजारीच होती. त्यांची भेट काही फारशी सुखदायक झाली नसावी. त्या भेटीनंतर लौकरच ती मृत्यू पावली. ॲन्थनी आणि ऑक्टेव्हिअस यांच्यात बराच तणाव होता. पण इ. स. पूर्व ४०च्या ऑक्टोबरमध्ये आपले मतभेद विसरण्याचे ठरवून ते ब्रुन्डीशियम येथे भेटले. त्यावेळी झालेल्या तहानुसार साम्राज्याची विभागणी आधीसारखीच ठेवण्यात आली. या तहावर शिक्कामोर्तब करण्यासाठी ॲन्थनीने ऑक्टेव्हिअसची बहीण ऑक्टेव्हिया हिच्याशी विवाह केला. या विवाहासाठी जणू काही पूर्वनियोजित रीतीने ती त्यावेळी विधवा झालेली होतीच. क्लिओपात्राने ॲन्थनीच्या जुळ्या मुलांना जन्म दिल्यापासून काही आठवड्यांच्या आतच हा विवाहसमारंभ पार पडला. आपल्या जुळ्या मुलांची नावे तिने अशी ठेवली– अलेक्झांडर हेलिओस आणि क्लिओपात्रा सिलेन.

मुलांच्या जन्मानंतरची तीन वर्षे क्लिओपात्रा इजिप्तमध्येच राहिली. आपल्या राज्याची आर्थिक घडी बसवण्यात, राज्यकारभार सुरळीतपणे चालवण्यात ती अगदी गर्क होती. क्लिओपात्रा स्वैराचारी, व्यभिचारिणी, प्रेमकथांची नायिका म्हणून ओळखली जाते खरी पण वस्तुत: तिच्या प्रौढ आयुष्यापैकी अर्ध्याहून अधिक आयुष्य तिने 'ब्रह्मचर्य' पाळले होते. अलेक्झांड्रियात इ. स. पूर्व ४७ चा हिवाळा तिने सीझरबरोबर व्यतीत केला पण नंतर तीन वर्षे ती जरी रोममध्ये होती तरी त्यांचे लैंगिक संबंध तेव्हा चालू होते असे मानण्याएवढा पुरावा उपलब्ध नाही. (तशा अर्थाच्या अफवाही ऐकू येत नाहीत) ॲन्थनीबरोबर ती जवळजवळ सहा वर्षे राहिली पण त्यातला बराचसा काळ तो मोहिमांवरच होता. आपल्या १४ व १६ वर्षे वयाच्या भावांबरोबर तिचे जे विवाह झाले ते वैवाहिक सुखाची पूर्तता करणारे ठरले असावेत असे म्हणणे धाडसाचेच ठरेल.

ऑगस्टस सीझरच्या काळातील कवींनी तिला स्त्रीला अयोग्य अशा कामातुरतेबद्दल दोषी ठरवले होते पुढील काळातील लेखकांनीही हाच धागा उचलून लेखन केले. पण पुराव्यांची छाननी केली असता वस्तुस्थिती अशी दिसते की, खऱ्या अर्थाने शारीरिक सुख देणारे दोनच सहचर तिला मिळाले, आणि त्या दोघांचीही निवड राजकीय धूर्त डावपेचांचा एक भाग म्हणूनच केली गेली होती. क्लिओपात्राला अनेक कल्पितकथांची नायिका बनवली गेली होती पण तत्कालीन समाजातील नीतिमत्तेचा, वर्तनाचा विचार करता ती एक संयमशील प्रेयसी होती असेच म्हणावे लागते.

तिचे सारे सामर्थ्य इतर गोष्टींमध्येच उपयोगात येत होते. ती अतिशय कुशल, चतुर समर्थ राजकारणी स्त्री होती. अत्यंत ठामपणे वाटाघाटी करणारी, काटकसरी प्रशासक म्हणून तिचा लौकिक होता. इजिप्तच्या प्रजेला ग्रीक टॉलेमी राजे काही फारसे आवडत नसत. त्यामुळे एखाद्या जुनाट रोगाने वारंवार डोके वर काढावे तशी टॉलेमीच्या राजवटीत इजिप्तमध्ये यादवी होत असे. शिवाय क्लिओपात्रा यादवी युद्धकाळातच गादीवर आली होती. तरीही सर्व उपलब्ध पुरावे याची ग्वाही देतात की, तिच्या राजवटीत देशाच्या अंतर्गत राज्यकारभार सुरळीत होता व राज्यात एकूण शांतता होती. प्लुटार्क या इतिहासतज्ज्ञाच्या मते टॉलेमी वंशजांपैकी क्लिओपात्रा ही एकमेव राणी होती की जिला इजिप्शियन बोली भाषा बोलता येत होती.

त्यावेळी ग्रीक ही दरबारी भाषा होती. त्यामुळे तिचे हे कौशल्य प्रजेला आनंददायी ठरत असे. प्राचीन इजिप्शियन धार्मिक परंपरांचेदेखील ती काही प्रमाणात पालन करी. प्रजेबद्दलच्या तिच्या कळकळीची तिच्या प्रजेला जाणीव होती आणि ती प्रजा तिच्याशी एकनिष्ठदेखील होती. तिच्या वडिलांनी घेतलेली मोठमोठी कर्जे चुकवूनदेखील तिने आर्थिक तोल सांभाळण्याचा प्रयत्न केला.

सीझरने आपल्या युद्धांसाठी या इजिप्शियन कामधेनूला पूर्णतः शोषण्याचा प्रयत्न करूनही तिने खरोखरी अत्यंत कुशलपणे अर्थव्यवहार सांभाळला. तिच्या राजवटीच्या शेवटच्या काळात इजिप्त देश इतका समृद्ध झाला होता की अँन्थनीच्या सैन्याला आर्थिक साह्य करणे जसे तिला शक्य झाले होते असेच रोमच्या तोडीस तोड बलवान असे आपले आरमार सज्ज करणे तिला शक्य झाले होते. युद्धाच्या या साऱ्या खर्चामुळे तत्कालीन इजिप्तच्या अर्थव्यवहार फारसा परिणाम झाल्याचे जाणवत नव्हते. तिच्या मृत्यूनंतर ऑक्टेव्हिअस रोमला परतला तेव्हा त्याच्याबरोबर तिची अमाप संपत्ती होती. त्यामुळे शहरातील किमती भडकल्या आणि व्याजाचा दर १२% वरून ४% वर आला.

या साऱ्या समृद्धीमागचे रहस्य तपशीलवार माहीत नाही. तत्कालीन इतिहासकारांना त्यात काही गम्य वाटले नसावे. नबातियन अरबांकडून तिने जे खनिज तेलासंबंधीचे अधिकार मिळवले होते ते तिला फायदेशीर ठरले. या तेलखाणी या समुद्राच्या दक्षिणेस होत्या. याशिवाय जेरिकोजवळची खजूर आणि फरची झाडे असणारी जमीन तिने अँन्थनीकडून मिळवली होती. ही जमीन तिने 'लीज'वर 'जूडा'च्या राजा हेरॉड याला दिली होती. त्यामुळे कोणत्याही प्रकारचा भांडवली खर्च न करता आणि जराही मनुष्यबळ न वापरता तिला त्यापासून भरपूर पैसे मिळत होते. पहिल्या शतकातील जोसेफस या ज्यू इतिहासकाराने क्लिओपात्राच्या या सर्व व्यवहारांची नोंद ठेवली आहे.

जोसेफस हा एकच इतिहासकार असा होता की ज्याने रोमन दृष्टिकोनातून तिच्या कारकीर्दीकडे पाहिले नाही. त्याने केलेल्या नोंदीवरून क्लिओपात्रा या राणीचे इतर पैलू लक्षात येतात आणि केवळ प्रणय किंवा शारीरिक सुखाला महत्त्व न देता खजुराच्या बाजारभावाकडे लक्ष ठेवणारी, डांबर– खडी यासारख्या उत्पादनांकडे लक्ष देणारी राणी आपल्यापुढे उभी राहते.

याकाळात अँन्थनी ऑक्टेव्हियाबरोबर रोम आणि अथेन्समध्ये राहत होता आणि वरकरणी तरी तो क्लिओपात्राच्या विरहाने व्याकुळ झालेला नाही असे वाटत होते. ऑक्टेव्हिअसशी काही त्याचे संबंध मैत्रीचे नव्हते पण दोघांमधला ताण ऑक्टेव्हियाच्या मध्यस्थीने बराच कमी झाला होता. पर्थियन मोहीम मागे पडली असली तरी त्याने ती पूर्णपणे सोडून दिली नव्हती. पूर्वेकडील प्रदेशातील छोट्या राजांशी तह करीत, त्यांना जिंकून घेत अँन्थनी आपले आसन बळकट करीत होता. त्यावेळी त्याचा सेनापती वेन्टीडियस याने पर्थियन मोहिमेचा प्राथमिक भाग म्हणून लढाईस आरंभ करून 'सीरिया' आणि 'आशिया मायनर' या प्रदेशातून पर्थियन्सना बाहेर हाकलले.

इ. स. पूर्व ३७च्या शरदऋतूत अँन्थनी आणि ऑक्टेव्हिया यांनी इटली सोडले. ऑक्टेव्हिया गर्भवती होती. (तिला अँन्थनीपासून एक मुलगी झालेली होतीच) इटलीहून

निघून कोर्फ्यू इथे पोचल्यावर ती आजारी पडली. तिने रोमला परत जावे असे ॲन्थनीने सुचवले. पर्थियाच्या मोहिमेची अंतिम तयारी करण्याच्या उद्देशानेच तो आता पूर्वेकडे आला होता. ही मोहीम वसंतऋतूत हाती घेण्याचा त्याचा मानस होता. या मोहिमेत तिला त्रास झाला असता या विचाराने आणि ती बरोबर नसणे त्याला सोयीचे असल्याने ऑक्टेव्हियाने रोमला जावे अशी सूचना त्याने केली. तिने ती मानली. ॲन्थनी सीरियाकडे वळला आणि क्लिओपात्राने तिथे येऊन त्याला भेटावे असा निरोप त्याने तिच्याकडे पाठवला.

हे सारे अपेक्षितच होते. एवढ्या मोठ्या महत्त्वाकांक्षी मोहिमेसाठी त्याला इजिप्तचा आधार आवश्यकच होता. त्याला पैशांचीही गरज होती. त्यामुळे जरी ऑक्टेव्हियाशी लग्न झालेले असले, तिच्या भावाशी मैत्रीचा करार झालेला असला तरीही क्लिओपात्राला भेटणे त्याला आवश्यक होते. ऑक्टेव्हिअसने दिलेली वचने नेहमीच मोडली होती. ॲन्थनीबद्दलचा स्वत:चा मनातील अनादर त्याने स्पष्टपणे, वारंवार दाखवला होता. ऑक्टेव्हिअसबरोबर भागीदारी करणे म्हणजे नेहमीच दुय्यम स्थानावर राहाणे असे ॲन्थनीला वाटू लागल ज्यावेळी ऑक्टेव्हिअसशी सलोखा करण्याची गरज होती तेव्हा ॲन्थनीने विचार न करता गर्भवती क्लिओपात्राला सोडून दिले होते.

आता त्याच्याशी भागीदारी करणे फायदेशीर नाही हे लक्षात आल्यावर त्याने तडकाफडकी गर्भवती ऑक्टेव्हियाला असंच रोमला पाठवून दिले. क्लिओपात्रा आली. तिला आणि आपल्या दोन्ही मुलांना भेटल्यावर त्याला अर्थातच आनंद झाला. कारण ती मुले त्याला प्रथमच भेटत होती. ॲन्थनी आणि क्लिओपात्रा यांच्या पुनर्भेटीचे कारण परंपरेने वेगळे सांगितले जाते. परंपरेनुसार असे समजण्यात येते की, कामांध होऊन, तिची आसक्ती अनावर झाल्याने क्लिओपात्राला ॲन्थनीने बोलावले. पण हे कारण ओढूनताणून आणल्यासारखे वाटते. त्याला तिची जर एवढी अनावर ओढ असती तर एवढी वर्षे तो असा राजकीय संधीची वाट पाहात थांबला नसता.

आणखी एका मुद्दा लक्षात घेणे आवश्यक आहे. त्यांच्या या पुनर्भेटीच्या वेळी क्लिओपात्राचे वर्तन हे अत्यंत संयमी होते. तसेच राजकीय सावधपणाचे होते. तिने मोठी खेळी खेळली. तिने ॲन्थनीजवळून आपला मोठा भूप्रदेश परत मागितला. (जो भाग आता लेबॅनॉन, सीरिया, जॉर्डन आणि दक्षिण तुर्कस्थान यांच्या नावाने ओळखला जातो तो सर्व प्रदेश तिने परत मागितला) परंपरा सांगते की क्लिओपात्रावरचे प्रेम तिच्याविषयीची आसक्ती यामुळे ॲन्थनीने हा सारा समृद्ध प्रदेश तिला परत दिला.

पण वस्तुत: रोम साम्राज्याच्या पूर्वेकडच्या भागात राज्य करीत असताना अशा प्रकारची देवाणघेवाण करण्याचे धोरण ॲन्थनीने नेहमीच अवलंबिले होते. यापूर्वी राजा हेरॉडला Judeea (जूडिआ)च्या राज्यावर आपल्या मदतीने बसवताना त्याने हेच धोरण अंगिकारले

होते. यावेळी ज्या सम्राटाला त्याने आपला भूप्रदेश दिला होता ती योगायोगाने क्लिओपात्रा होती एवढेच ! शिवाय हा भूप्रदेश त्याने काही फुकाफुकी दिला नव्हता. भूमध्य समुद्रात ॲन्थनीसाठी एक आरमार तयार करण्याचे आणि त्याच्या सैन्याला रसद पुरवण्याचे काम त्या बदल्यात ती करणार होती.

यानुसार त्यांचे राजकीय संबंध जसे सलोख्याचे झाले तसेच त्यांचे प्रेमसंबंधही पुनरुज्जीवित झाले. पुन: एकवार ॲन्टियाक येथे त्यांनी हिवाळा एकत्रितपणे घालवला. पुन: एकदा वसंतऋतू आल्यावर ॲन्थनीने आपले लक्ष कारभाराकडे वळवले. याहीवेळी गर्भवती क्लिओपात्राला सोडून तो निघाला. इ. स. पूर्व ३६च्या मे मध्ये पर्थियासाठी त्याने प्रस्थान ठेवले. या मोहिमेमुळेच खरे म्हणजे ॲन्थनीचा समावेश श्रेष्ठ अशा रोमन योद्धयांमध्ये केला जातो. परंतु दुर्दैवाने ही मोहीम अपयशी ठरली. शत्रूला वेढा घालण्यासाठी घेतलेली सामग्री अवजड ठरली; आणि त्यामुळे ती मागे सोडून द्यावी लागली. मित्र म्हणविणाऱ्या एकाने त्याच्याशी द्रोह केला. एका अचानक हल्ल्यात त्याचे बरेच सैनिक मारले गेले. त्याला मागे फिरावे लागले. परतीच्या वाटेवर हिवाळा सुरू झाल्याने त्या कडाक्याच्या थंडीने अधिकच बळी घेतले. तो कसावसा सीरिया येथे परतला तेव्हा त्याचे दोन पंचमांश सैनिक मृत्यू पावले होते.

ॲन्थनीने आल्याबरोबर क्लिओपात्राला निरोप पाठवला. पण ती लगेचच आली नाही. तिच्या विलंबाची कारणे भिन्नभिन्न असू शकतील. एकतर नुकताच तिने एका मुलाला जन्म दिला होता– त्याचे नाव होते टॉलेमी फिलाडेल्फस. त्यामुळे तिची तब्येत नाजूक होती. दुसरे म्हणजे ॲन्थनी पैशांची मागणी करेल आणि तो पैसा उभा करण्यासाठी वेळ लागेल याची जाणीव असल्याने तिने वेळकाढूपणा केला असावा. कदाचित असेही कारण असेल की नुकताच ज्याने दारुण पराभव पत्करला आहे, नामुष्की स्वीकारून जो परत फिरला आहे अशा ॲन्थनीशी उघडपणे मैत्री ठेवणे तिला नकोसे वाटले असेल. पण इ. स. पूर्व ३५च्या जानेवारीत ती आली. येताना सैन्यासाठी गरम कपडे, पैसे सारे घेऊन आली. एक– दोन महिन्यातच ॲन्थनीला अशी बातमी समजली की, रोमहून ऑक्टेव्हियादेखील सैन्यासाठी पैसे, कपडे व जादा सैन्य घेऊन निघाली आहे.

यापूर्वी एकदा क्लिओपात्राची गरज संपली असताना ॲन्थनीने तिला वाऱ्यावर सोडून दिली होती. आतादेखील तिची उपयुक्तता संपल्याने तिला परत पाठवणे त्याला काही फारसे कठीण नव्हते. पण या खेपेला त्याने तसे केले नाही. उलट त्याने ऑक्टेव्हियाला निरोप पाठवला की, तिने रोमला परत जावे. यावेळी तो इजिप्तच्या राणीचा साथीदार होता.

त्याचे क्लिओपात्रावर निरतिशय प्रेम होते हे नि:संशय ! ती खरोखरी एक समर्थ सहकारी आणि सुसंस्कृत साथीदार होती. प्राचीन राजघराण्याचे वैभव तिच्याजवळ होते आणि



अनुक्रमणिका

ती चांगली धनसंपन्न होती. याशिवाय त्याच्यापासून तिला तीन मुले होती. त्या तिघांपैकी दोन मुलगे होते. उलट ऑक्टेव्हियाला दोन्ही मुलीच होत्या. एखाद्या रोमन अधिकाऱ्याच्या दृष्टीने या सर्व गोष्टी महत्त्वाच्या होत्याच. दोघींमधून क्लिओपात्राची निवड करताना त्याने आपली रसिक सौंदर्यदृष्टी तर जागृत ठेवलीच होती पण शिवाय आपल्या भविष्यकालीन कारकीर्दीचाही विचार केला होता.

पर्थियन्सच्या विरुद्ध लढाई करीत असताना, रोमन सैनिकांचा, पूर्वेकडील भागासाठी असणारा सेनापती अशी ॲन्थनीची भूमिका होती. रोमचा अधिकृत अधिकारी या नात्याने, रोमच्या साम्राज्यासाठी तो लढत होता. पण ऑक्टेव्हियाला परत पाठवल्यानंतर त्याची परिस्थिती थोडीशी निराळी, द्विधा झाली. त्यानंतरची सहा वर्षे, ॲन्थनी आणि क्लिओपात्रा यांचा मृत्यू होईपर्यंत, ॲन्थनी हा आता आपला शत्रू आहे असे रोमनांना पटवून देण्यासाठी ऑक्टेव्हिअसने आपल्या जीवाचे रान केले. आपल्या शत्रूच्या हातातले निर्जीव बाहुले असणारा ॲन्थनी अलेक्झांड्रियामध्ये आपली राजधानी स्थापण्याचा प्रयत्न करीत आहे, आणि क्लिओपात्राच्या मदतीने रोमचे राज्य चालवण्याचा त्याचा प्रयत्न आपली पराधीनता अधिकाधिक वाढवीत आहे हे सारे रोमन जनतेला पटवून देणे ऑक्टेव्हिअसला कष्टाचेच होत होते. पण त्याच्या म्हणण्यात तथ्य होते हे दाखवणारा पुरावा उपलब्ध आहे.

इ. स. पूर्व ३५च्या वसंतऋतूत ॲन्थनी व क्लिओपात्रा अलेक्झांड्रियाला परतली. केवळ प्रणयरंग लुटण्यासाठी ती परतली नव्हती तर हाती घेतलेल्या मोहिमेसाठी पैसे जमवण्याची गरज त्यावेळी होती. पण पर्थियावर पुन: आक्रमण करणे त्या वर्षी तरी ॲन्थनीला जमले नाही. क्लिओपात्राची ओढ हे कारण मात्र त्यामागे नव्हते तर इतर काही गोष्टींकडे लक्ष देणे त्याला आवश्यक झाले होते. पॉम्पेचा धाकटा मुलगा सेक्स्टस पॉम्पेयस हा आपल्या सिसिलियन तळावरून येणाऱ्याजाणाऱ्या जहाजांवर छुपे हल्ले करीत होता. या चाचेगिरीला आळा घालायला हवा होता. शिवाय तो पर्थियन्सबरोबर गुप्त बोलणी करीत होता आणि एशिया मायनरमधील एक शहर त्याने आपल्या कब्जात घेतले होते. पण इ. स. पूर्व ३४च्या वसंतऋतूत ॲन्थनीने पूर्वेकडे आक्रमण केले. अर्मेनियाचा पाडाव केला आणि तेथील राजा अर्टाविस्डस याला कैद करून इजिप्तला आणले.

अर्मेनियाचे सारे कैदी– त्यांच्या राजासकट– साखळदंडाने बांधून अलेक्झांड्रियाच्या रस्त्यांतून मिरवत नेले गेले. त्यांच्या मागोमाग ॲन्थनी एका दिमाखदार रथातून जात होता व पूर्वेवर राज्य करणाऱ्या देवतेसारखे– डायोनिसससारखे त्याच्या अंगावर कपडे होते. ऑक्टेव्हिअसने या साऱ्या संचलनाला 'विजययात्रा' असे नाव दिले आणि म्हटले की, खरे म्हणजे हे सारे संचलन रोममध्येच व्हायला हवे होते. ते ॲन्थनीने अलेक्झांड्रियात घडवून आणले, याचाच अर्थ तो आता खरा रोमन राहिला नाही. त्यानंतर स्वत: ॲन्थनीनेच एका

प्रसंगीच्या आपल्या चमत्कारिक वर्तनाने साऱ्या रोमला स्वत:विषयी सावध केले. त्या प्रसंगाचे वर्णन केले जाते– 'अलेक्झांड्रियाच्या देणग्या'.

एका वैभवशाली समारंभात त्याने क्लिओपात्राला 'सम्राज्ञी' म्हणून घोषित केले आणि सिझेरियनला तिचा अधिकृत संयुक्त सत्ताधारी सम्राट म्हणून घोषित केले. त्याची स्वत:ची तिच्यापासून झालेली जुळी मुले– ६ वर्षांची– आणि दोन वर्षांचा टॉलेमी फिलाडेफ्लस यांना त्याने राजे व राणी म्हणून घोषित केले. या किशोरवयीन प्रत्येक राजाला त्याने मोठी संपत्ती व राज्य देऊ केले. अर्थातच ही राज्ये देणे हे केवळ काल्पनिक होते. त्याने दिलेल्या सर्व राज्यांवर आधीचे राज्यकर्ते होतेच. उदा. एशिया मायनरवर जे राजे राज्य करीत होते ते ॲन्थनीचे सार्वभौमत्व मानत होते आणि ते राज्य त्याने टॉलेमीला देऊन टाकले. आणि पर्थियासारखी राज्ये, जी अजून जिंकायचीच होती, ती त्याने अलेक्झांडर हेलियोला देऊन टाकली. म्हणजे हलवायाच्या घरावर तुळशीपत्र ठेवून त्याने दानशूरतेचा आव आणला.

पण हे सारे केवळ 'बोलाचा भात' अशा स्वरूपाचे दान असले तरी त्याला वेगळे महत्त्व होते. एशिया मायनरच्या राजांनी ॲन्थनीचे सार्वभौमत्व मान्य करणे याचा अर्थ त्यांच्या दृष्टीने त्यांनी एकट्या ॲन्थनीला सम्राट म्हणून मान्यता देणे असा नव्हता. त्या सर्वांच्या दृष्टीने ते रोमचे मांडलिक बनत होते. ज्यावेळी ॲन्थनीने त्यांची राज्ये टॉलेमी फिलाडेल्फसला दिली याचा अर्थ होता, ॲन्थनीने त्यांची राज्ये रोमन साम्राज्याशी जोडून न घेता इजिप्तच्या टॉलेमी राज्याशी जोडली होती. अलेक्झांडरला पर्थियाचा राजा म्हणून जाहीर करीत असताना, आतापर्यंत चाललेल्या वादावर, पडदा टाकून त्याने हेच जाहीर केल आतापर्यंत तो जे काही करीत होता ते रोमच्या वतीने नव्हते, ते फक्त क्लिओपात्रासाठी होते.

या सर्वाचे समर्थन करणे एकवेळ शक्य झाले असते. पण यानंतर ॲन्थनीने अशी एक घोषणा केली की ज्यामुळे नकळत ऑक्टेव्हिअसला आव्हानच मिळाले. सिझेरियनला 'सम्राट' पद देऊनच ॲन्थनी थांबला नाही तर तो ज्युलियस सीझरचा कायदेशीर वारस आहे असेही त्याने घोषित केले. यावेळी सिझेरियन फक्त १३ वर्षांचा होता. पण हे करीत असताना ॲन्थनीला पूर्णपणे जाणीव होती की वस्तुस्थिती अशी नाही. कारण क्लिओपात्राची भेट होण्याआधी कितीतरी दिवस सीझरचा कलपर्नियाशी विवाह झाला होता आणि सीझरच्या मृत्यूपर्यंत हे विवाहबंधन कायम होते. शिवाय रोमन किंवा टॉलेमिक कायद्याने 'द्विभार्या' नियम कधीच मान्य केला नव्हता. (दुसऱ्या विवाहाला कधीच मान्यता दिली नव्हती) पण ॲन्थनीला या तपशीलाची फिकीर नव्हती. त्याचा हेतू फार उदात्त होता. त्याला सिझेरियनच्या वतीने रोमवर हक्क स्थापित करायचा होता आणि सीझरचा कायदेशीर वारस ऑक्टेव्हिअस नाही हेच सिद्ध करायचे होते.

या देणग्यांच्या समारंभाने एक गोष्ट सूर्यप्रकाशाएवढी स्पष्ट झाली. ॲन्थनी आणि

क्लिओपात्रा यांच्या महत्त्वाकांक्षेची उडी किती मोठ्या पल्ल्याची आहे तेच यामुळे दिसून आले. रोम आणि पश्चिमेकडचा भाग यावर सीझेरियन राज्य करील आणि पूर्वेकडे क्लिओपात्रा तिच्या मुलांच्या मदतीने टॉलेमिक साम्राज्याचा मोठा भाग आपल्या आधिपत्याखाली ठेवेल. आणि ह्या सर्वांचे मोठ्या दानशूरतेने दान देणारा ॲन्थनी या सर्वांवर आपले स्वामित्व अबाधित ठेवेल. शेक्सपियरच्या नाटकातील क्लिओपात्रा म्हणूनच तिच्या मृत प्रियकरासाठी शोक करताना गतवैभव आठवत म्हणते –

त्याच्या राज्यात – तो असताना मुकुट, सिंहासने आपण होऊन चालत येत. राज्ये आणि साम्राज्ये म्हणजे जणू काही त्याच्या खिशातली खुळखुळती नाणी पडावीत अशी तो देत जात असे. या देणगी समारंभावेळी हा सारा चमत्कार वास्तव रूप धारण करणाराच आहे असे वाटत होते. फक्त एक छोटीशी बाब होती – ती सारी राज्ये आणि साम्राज्ये देऊन टाकण्यासाठी ॲन्थनीची कधीच नव्हती.

यानंतर ॲन्थनी आणि ऑक्टेव्हिअस यांचे संबंध अधिकाधिक ताणले जाऊ लागले. या समारंभानंतर सुमारे वर्षभराने– इ. स. पूर्व ३३च्या हेमंतऋतूत– ॲन्थनी आणि क्लिओपात्रा इफेससला गेले आणि आपले आरमार व सैन्य तिथे गोळा करण्यास त्यांनी आरंभ केला. इ. स. पूर्व ३२च्या वसंतऋतूत आपल्या दोनतीनशे आमदारांसह किनीय डॉमिशियस अहेनॉबार्बस आणि जायस सॉशियस यांनी रोम सोडले आणि ते ॲन्थनीला येऊन मिळाले. त्यांच्या या निष्ठादर्शनामुळे एक गोष्ट स्पष्ट झाली की ॲन्थनीला रोममध्ये अजूनही मोठा पाठिंबा होता; पण त्याचबरोबर हेही स्पष्ट झाले होते की या सर्वांना रोम सोडावे लागले याचा अर्थ त्यांना तिथे राहणे इतरांनी अशक्य केले होते. त्याच वसंतऋतूत ॲन्थनीने ऑक्टेव्हियाशी घटस्फोट घेतला.

इफेससमध्ये चकमकी उडत होत्याच. अहेनॉबार्बस आणि इतर रोमनांनी क्लिओपात्राच्या तिथे असण्यालाच आक्षेप घेतला. ऑक्टेव्हिअसविरुद्ध ॲन्थनीला मदत करायला त्यांची तयारी होती पण देणगी समारंभाआड दडलेल्या ॲन्थनीच्या महत्त्वाकांक्षेला खतपाणा घालण्याची त्यांची तयारी नव्हती. पण क्लिओपात्राने घरी परत जाण्यासाठी नकार दिला. आपल्या आरमाराची निष्ठा आपल्याशी आहे, ॲन्थनीशी नाही असे सांगून आपल्या वास्तव्याचे तिने समर्थन केले. एप्रिलमध्ये ॲन्थनी आणि क्लिओपात्रा यांनी सॅमोस बेटाकडे प्रयाण केले, तिथे एका उत्सवात भाग घेतला आणि मग ती दोघे अथेन्सला गेली. त्यांच्या– पाठोपाठ त्यांचे सैन्य व आरमारही गेले.

दरम्यान या दोघांनी निर्माण केलेल्या संघर्षाला तोंड देण्यासाठी ऑक्टेव्हिअसने पैसे व सैन्य यांची जमवाजमव करण्यास आरंभ केला होता. त्यावर्षीच्या उन्हाळ्यात जर त्यांनी इटलीवर हल्ला केला असता तर ऑक्टेव्हिअसचा पराभव नक्कीच झाला असता. पण



अनुक्रमणिका

ॲन्थनीने तसे केले नाही आणि तसे न करण्यासाठी त्याला सबळ कारणही होते. क्लिओपात्रासारख्या परदेशी सम्राज्ञीच्या जोडीने ॲन्थनीने जर इटलीवर हल्ला केला असता तर इटालियन मदत त्याला मिळाली नसती आणि बंडाची भीती होती. बरे, तिच्याशिवाय इटलीत जायचे तर तिच्या आरमाराबद्दल, त्याच्या निष्ठेबद्दल त्याला खात्री नव्हती.

त्यामुळे ग्रीसमध्ये वाट पाहात राहाणेच त्यांनी पसंत केले. ऑक्टेव्हिअसला एखाद्या तटस्थ देशाच्या भागात गाठून त्याचा पराभव करूया आणि मग शांतपणे रोमकडे परतू ते विजयाचा ध्वज घेऊनच असा त्यांचा विचार होता. त्यांच्याजवळ ५०० लढाऊ जहाजे होती, ७५,००० पायदळ, १२००० घोडदळ आणि २५००० मध्यम दर्जाचे शस्त्रधारी सैनिक असे सैन्य होते. आपण वाट पाहाण्यात काहीच नुकसान होणार नाही असा त्यांचा ठाम विश्वास होता.

अजूनही या सर्व नाटकाचा शेवट कुठे दृष्टिपथात येत नव्हता. शरदऋतूच्या आरंभी ॲन्थनी आणि क्लिओपात्रा अथेन्सच्या पश्चिमेकडे पात्रे येथे गेली आणि ग्रीक समुद्राच्या किनाऱ्यावर सहा ठिकाणी– कोर्फ्यूपासून क्रेटपर्यंत त्यांनी आपले आरमार विभागून ठेवले. त्या हिवाळ्यापर्यंत ऑक्टेव्हिअसच्या सैन्याची जुळवाजुळव पूर्ण होत आली आणि त्याने युद्धाची घोषणा केली. मात्र त्याने क्लिओपात्राविरुद्ध युद्ध पुकारले, ॲन्थनीविरुद्ध नव्हे. इ. स. पूर्व ३१च्या मार्चमध्ये पहिली चढाई झाली.

ऑक्टेव्हिअसच्या आरमारांपैकी मोठा भाग अग्रीप्पा नावाच्या समर्थ नौदल अधिकाऱ्याकडे होता. त्याने पेलॉपोनिसच्या दक्षिणेकडच्या टोकाला मेथोन येथे असणाऱ्या क्लिओपात्राच्या नौदल तळावर हल्ला केला व ते ताब्यात घेतले. यामुळे सर्वांनाच धक्का बसला. मेथोन हा आपला तळ करून ॲग्रीप्पा सर्व इजिप्शियन नौदलाच्या तळांवर हल्ले करू लागला. अलेक्झांड्रियाहून रसद घेऊन येणारी जहाजेही तो लुटू लागला. दरम्यान ऑक्टेव्हिअसने आपले सैन्य ग्रीसच्या मुख्य भागात – कोर्फ्यूच्यासमोर आणून ठेवले. दक्षिणेकडे शत्रूच्या तळापर्यंत जाण्याचा जास्तीतजास्त प्रयत्न त्याने केला. अम्ब्राशियाच्या आखातात ॲक्टियम येथे तो आला व तिथे त्याने तळ ठोकला. काही दिवसांनी स्वत: ॲन्थनी व क्लिओपात्रा तिथे आली व त्यांनी त्याच्यासमोरच आपली छावणी उभारली.

पण आपण जाळ्यात सापडलो हे त्यांच्या लगेचच लक्षात आले. ॲग्रीप्पाने भराभर त्यांची ठाणी काबीज करायला सुरुवात केली. समुद्रमार्गे रसद येईनाशी झाली. ॲग्रीप्पाच्या आरमाराने आखातातून बाहेर पडण्याचे मार्ग रोखले. उत्तरेकडून ऑक्टेव्हिअसचे सैन्य धमकावत होते. फार वेळ वाट पाहिल्याने त्यांचे नुकसान झाले होते. अन्नाच्या अपुऱ्या पुरवठ्यामुळे आणि पसरलेल्या रोगराईमुळे साऱ्या सैन्याचे नीतिधैर्य खचत चालले आणि ॲन्थनीचे मदतनीस हळूहळू त्याला सोडून जाऊ लागले. अहेनॉबार्बस हा त्यात मुख्य होता.



अनुक्रमणिका

तो स्वत: ऑक्टेव्हिअसच्या तळावर नाव घेऊन गेला. काही दिवसानंतर तो मृत्यू पावला. त्याला अतिसार झाला की मलेरिया हे सांगणे कठीण. कारण ॲन्थनीच्या सैन्यात या दोन्ही रोगांची साथ मोठ्या प्रमाणावर होती.

ऑक्टेव्हिअसला वेळ अनुकूल होती. ॲन्थनी आणि क्लिओपात्राने आपल्या अधिकाऱ्यांची बैठक बोलावली. कॅनिडियस क्रासस हा ॲन्थनीच्या सैन्याचा सेनापती होता. त्याच्या मते आरमार सोडून देऊन मॅसेडोनिया इथे ऑक्टेव्हिअसच्या सैन्याला अंगावर घेणे योग्य ठरले असते. त्याला ठाम विश्वास होता की ॲग्रीप्पाला जमिनीवर हरवणे कठीण आहे. क्लिओपात्राने मात्र त्याच्या या म्हणण्याला जोरदार आक्षेप घेतला. आरमार तिचे होते, त्यावर अवाढव्य खर्च झाला होता. त्यामुळे ते सोडून जाणे तिच्या जीवावर येणे साहजिकच होते. शिवाय तिचे सामर्थ्य तिच्या आरमारातच होते. संपूर्ण युद्धामध्ये तिचा सहभाग म्हणजे तिचे आरमार आणि त्याच्या मदतीनेच तर ती ॲन्थनीवर वर्चस्व गाजवू शकत होती.

ॲन्थनीने तिची बाजू घेतली. या बाबतीत परंपरा असे सांगते की तिच्यावरील प्रेमामुळे ॲन्थनीने हा निर्णय घेतला. त्याच्या तिच्याबद्दलच्या मृदू भावना हा या निर्णयामागचा एक घटक असू शकेल; पण त्या दोघांचे नाते आता सामान्य प्रेमिकांच्या नात्यापेक्षा फार गुंतागुंतीचे बनले होते. जर ती त्याला दुरावली तर केवळ आपली प्रेयसी गमावली एवढेच दु:ख नव्हते. उलट प्रेयसीबरोबर पूर्वेकडच्या राज्याची आकांक्षाही त्याला सोडून द्यावी लागणार होती. त्याचे सारे राजकारण, गेल्या दहा वर्षातला त्याचा सारा खटाटोप त्यामुळे व्यर्थ ठरणार होता. आता साथीदार म्हणून राहण्याशिवाय त्यांना पर्याय नव्हता. नौसेनेच्या मदतीने युद्ध करणे हा जर एकच मार्ग शिल्लक असेल तर त्याच मार्गाने जाण्याशिवाय दुसरा पर्याय त्याच्यासमोर नव्हता.

आता जिंकण्यासाठी लढाई नव्हती तर त्या कोंडीतून बाहेर पडण्याची धडपड होती. क्लिओपात्राच्या जहाजावर जी प्रचंड संपत्ती होती ती सुरक्षित राखण्याची धडपड आता सर्वात आधी करायला हवी होती. कारण त्या संपत्तीच्या मदतीनेच आवश्यक तर आणि आवश्यक तेव्हा दुसरे आरमार उभारून लढता येणार होते. त्यानुसार जहाज सज्ज करण्याचा हुकूम त्याने दिला. मात्र त्या हुकुमाचा अर्थ असा लावला गेला की ॲन्थनी आणि क्लिओपात्रा युद्ध सोडून पळण्याचा बेत करताहेत. लोकांची समजूत चुकीची नव्हती पण त्यामागचे कारण निराळे होते. विश्वासघात करून, भ्याडपणाने ती दोघे पळत नव्हती. इ. स. पू. ३१ मधल्या २ सप्टेंबरला ॲक्टियमची लढाई झाली. ॲन्थनी आणि क्लिओपात्रा आपली संपत्ती घेऊन पळून गेले. त्यांच्या आरमारांपैकी बरीच जहाजे ऑक्टेव्हिअसच्या हाती लागली. या सर्व गोष्टी पूर्णपणे खऱ्या आहेत. पण या व्यतिरिक्त बाकी गोष्टींबद्दल मतभेद आहेत.

आधुनिक काळातील इतिहासकारांमध्ये दोन शक्यता वर्तवल्या जातात. डब्ल्यू. डब्ल्यू.

टार्न यांच्या मते आरमाराच्या उत्तरेच्या बाजूने ॲन्थनी अगदी निकराने लढत होता. पण सारी जहाजे त्याला मध्येच सोडून निघून गेली. काहींनी शरणागती पत्करली तर काही बंदर सोडून यायलाच तयार नव्हती. आपण सारे काही गमावल्याची जाणीव होऊन क्लिओपात्राने आपली ६० जहाजे आणि ॲन्थनी यांच्यासह प्रयाण केले. जे. एम्. कार्टर, आर. साइम आणि मायकेल ग्रँट यांचे मत मात्र यापेक्षा वेगळे आहे. त्यांच्या मते आरमारातील सर्वच जहाजे लढत होती पण त्यांची लढत अयशस्वी ठरली. त्यांना असे वाटते की ॲग्रीप्पा आणि ऑक्टेव्हिअस यांनी ॲन्थनीला हुलकावणी देतदेत समुद्रात पुष्कळ आतपर्यंत नेले. त्याला त्याची कल्पना आली नाही आणि त्यामुळे त्याचा इतरांबरोबरचा संपर्क तुटला.

क्लिओपात्रा आणि तिच्याबरोबरची जहाजांची तुकडी बाहेर सटकून जाऊ शकली कारण त्यांना इतर जहाजांनी संरक्षण दिले. ॲन्थनीही तिच्या पाठोपाठ गेला पण इतर जहाजे मात्र शत्रूच्या ताब्यात सापडली. त्यांना निसटण्याएवढा अवधी मिळाला नाही. वास्तविक ती सारी जहाजे सोडून जाण्याचा ॲन्थनी व क्लिओपात्राचा इरादा नव्हता. तीस– चाळीस जहाजे बुडवली गेली आणि बाकीची आखातात परतली. तिथे ती शत्रूंनी ताब्यात घेतली. दुसऱ्या दिवशी सर्वांनी शरणागती पत्करली.

तरीही अगदी सर्वस्वनाश झाला होता असे नाही. क्लिओपात्राजवळची इजिप्शियन संपत्ती सुरक्षित होती. त्यातून पुन: आरमाराची बांधणी करणे सहज शक्य होते. शिवाय त्यांची जमिनीवरील मालकी शाबूत असल्याने ॲन्थनी व क्लिओपात्राला उमेद वाटत होती. पण दैवाने दुसरेच ताट पुढे वाढून ठेवले होते. कॅनिडियस क्रेससने ॲन्थनीचे सैन्य उत्तरेकडे हलवले. पण त्यामुळे ऑक्टेव्हिअसच्या पलटणींनी लगेच त्यांच्यावर मात केली. जमीन व पैसा यांची लालूच दाखवल्याबरोबर सैनिक शरण गेले. कॅनिडियस आणि इतर अधिकारी रातोरात पळाले व त्यांनी ॲन्थनीकडे येऊन त्याला ही बातमी दिली. या वंचनेने, लाजिरवाण्या पराभवाने ॲन्थनी व क्लिओपात्रा हादरून गेले. इथे लढाई झालीच नाही. पराक्रमाने शेवटपर्यंत लढून हार झाली नव्हती. त्यामुळे ते दोघेही फार दु:खी झाले.

जसजसे ते दक्षिणेकडे सरकू लागले तसतशा पराजयाच्या अधिकाधिक बातम्या त्यांच्या कानी येऊ लागल्या. आशिया मायनर ऑक्टेव्हिअसच्या ताब्यात होते. आपला पाठलाग होईल या शंकेने ॲन्थनी इजिप्तच्या सीमेलगतच थांबला. अलेक्झांड्रियावर कधीही समुद्राकडून होणाऱ्या हल्ल्याला तोंड देण्याची त्याने तयारी केली. क्लिओपात्रा पुढे निघून गेली. आपल्या लढाईच्या बातम्या आणि शत्रू राजधानीत पोचण्याआधी तिला तिथे पोचायचे होते.

या दरम्यान एक गमतीशीर घटना घडली. ग्रीसमध्ये असतानाचा इटलीत उठाव झाल्याची बातमी ऑक्टेव्हिअसच्या कानी आली. त्याला आपल्याच यशाची चिंता वाटू लागली. ते यशच अंगावर उलटेल की काय असे वाटू लागले. कारण त्याचे स्वत:चे सैनिक आणि पकडून आणलेले शत्रूसैनिक पगाराची, पैशांची मागणी करू लागले.

आपल्याला कबूल केलेल्या जमिनी दिल्या नाहीत तर बंड करण्याची धमकी त्यांनी दिली. त्याच्या विजयवार्तेने सैनिक जोर करू लागले. आधी अॅग्रीप्पा आणि नंतर ऑक्टेव्हिअस स्वत: रोमला परतले आणि या समस्येवर तोडगा काढण्याच्या प्रयत्नांना लागले. लढाईत विजयश्री आणल्यानंतर त्याचे कौतुक वा सत्कार समारंभ राहिला दूरच उलट त्याला सैनिकांच्या असंतोषालाच तोंड द्यावे लागले. ब्रन्डीशियम येथे या सर्वांच्या संतापजनक निदर्शनांना त्याला तोंड द्यावे लागले.

या सगळ्या गोंधळाचा फायदा अॅन्थनी आणि क्लिओपात्राला मिळाला. पण या मिळालेल्या अवधीचा योग्य तो फायदा उठवण्याच्या मन:स्थितीत अॅन्थनी नव्हता. शिवाय क्लिओपात्राच्या वर्तनातील बदलही त्याला अधिक निराश करीत होता. तिला शक्य तेवढा पैसा तिने उभा केला. तिने सिझेरियनला त्याच्या शिक्षकांबरोबर नाइलच्या प्रवासाला पाठवला. वाळवंट पार करून त्याने लाल समुद्रातील एखाद्या बंदराचा आश्रय घ्यावा आणि मग भारताकडे त्याने प्रमाण करावे अशी तिची योजना होती. आपणही त्याच्यामागोमाग जावे असा तिचा इरादा होता. त्यासाठी तिने नाइलपासून लालसमुद्रापर्यंत आपली जहाजे नेली. पण हा सारा विस्मयकारक खटाटोप फुकट गेला. ती जहाजे पाण्यात उतरताक्षणीच नबारियन अरबांनी त्यांचा विध्वंस केला.

क्लिओपात्राचा पळून जाण्याचा बेत फसल्यावर तिने काही काळ वाट पाहायची असे ठरवले. तिच्याजवळ पैसे होतेच. आणि त्या पैशांच्या उबेमुळे सत्ताही तिच्याजवळ होती. ऑक्टेव्हिअसचा त्या पैशांवर डोळा होता. तो पैसा हस्तगत करून सैनिकांचे पगार भागवावे अशी कल्पना त्याच्या मनात होती. पैशाच्या जोरावर ती अजूनही वर्चस्व गाजवू शकत होती. इ. स. पूर्व ३०च्या वसंतऋतूत ऑक्टेव्हिअस पूर्वेकडे परतला. अॅन्थनी आणि क्लिओपात्राचे पूर्वीचे साथीदार एकामागोमाग एक ऑक्टेव्हिअसला जाऊन मिळाले. उन्हाळ्यात तो हल्ला करण्यासाठी इजिप्तच्या अगदी जवळ आला. क्लिओपात्राने त्याच्याकडे दूत पाठवून राज्यत्याग करण्याची तयारी दर्शवली. पण आपल्याऐवजी आपल्या मुलांना राज्य करू द्यावे अशी तिची अट होती. अॅन्थनीने आपला मुलगा अॅन्टिलस याच्याकरवी ऑक्टेव्हिअसला मोठी रक्कम लाच म्हणून देऊ केली आणि सार्वजनिक जीवनातून निवृत्त होण्याची तयारी दर्शवली. क्लिओपात्रानेही पुन: तोच निरोप पाठवला. ऑक्टेव्हिअसने या सर्व सूचनांकडे दुर्लक्ष केले.

क्लिओपात्राने स्वत:साठी खूप मोठी कबर बांधून घेतली होती व सर्व संपत्ती त्या इमारतीत ठेवली होती. त्या कबरीला आग लावून द्यायचा तिचा विचार होता. आता मात्र ऑक्टेव्हिअसने तिच्याकडे निरोप पाठवण्याची वेळ आली. त्याने तिला खात्रीशीर सांगितले की राणीने इतके निराश होण्याचे काही कारण नाही. त्यामुळे टॉलेमींची वंशपरंपरागत संपत्ती

विनाश पावेल. सरतेशेवटी ॲन्थनीने ऑक्टेव्हिअसकडे निरोप पाठवला की,"आपला मृत्यू जर क्लिओपात्राला वाचवू शकणार असेल तर मी स्वत: आत्मघात करून घेईन."

अलेक्झांड्रियाच्या उपनगरांपर्यंत ऑक्टेव्हिअस पोचला. अग्रभागी असणाऱ्या त्याच्या तुकडीचा पराभव करून ॲन्थनीने त्यांना पिटाळून लावले पण त्याचा फारसा फायदा झाला नाही. १ ऑगस्ट इ. स. पूर्व ३०ला इजिप्शियन आरमाराने अलेक्झांड्रियातून बाहेर पडून ऑक्टेव्हिअससमोर शरणागती पत्करली. ही बातमी ऐकून ॲन्थनीच्या घोडदळानेही हार स्वीकारली. त्याचे पायदळ गोंधळून गेले आणि निराशेने शहरातच इतस्तत: पळू लागले. ऑक्टेव्हिअसच्या सैन्याला त्यांच्यावर विजय मिळवणे मग सोपेच गेले. आपल्या तीन साथीदार सेवकांसह क्लिओपात्राने स्वत:ला त्या कबरीत बंद करून घेतले. तिचा मृत्यू झाला या समजुतीने ॲन्थनीने स्वत:ला भोस्कून घेतले पण ती जखम प्राणघातक ठरली नाही. तेवढ्यात राणी जिवंत असल्याची बातमी घेऊन एक दूत आला. तो तिच्या त्या इमारतीकडे गेला. त्याला वर घेण्यात आले आणि तिथे तो मृत्यू पावला.

ऑक्टेव्हिअसचा प्रतिनिधी तेवढ्यात तिथे आला. त्यालाही आत प्रवेश मिळाला. आपल्या कपड्यात लपवलेल्या कट्यारीने स्वत:चा घात करून घेण्याचा प्रयत्न राणीने केला पण तो अयशस्वी ठरला. तिला बंदिवान केले गेले. ॲन्थनीच्या दफन विधीच्या वेळी हजर राहण्याची तिला परवानगी मिळाली पण नंतर ती कडकोट बंदोबस्तात होती. रोमला परत गेल्यावर आपल्या विजयोत्सवात तिचे प्रदर्शन करण्याची ऑक्टेव्हिअसची इच्छा होती असा लोकांचा समज होता. त्यानेही तो कायम ठेवला. कदाचित त्या परिस्थितीत अपरिहार्य असणारा तिचा आत्मघात तिने घाईने उरकावा म्हणूनही ती गोष्ट मुद्दामहून प्रसृत करण्यात आली असेल. जर असेच असेल तर तो हेतू साध्य झाला असे म्हणता येईल. तिच्यावर नजर ठेवणाऱ्या पहारेकऱ्याजवळ तिने ऑक्टेव्हिअससाठी एक पत्र दिले.

थोड्याशा साशंकपणेच तो ते पत्र घेऊन गेला. आणि तिला हवी तशी संधी मिळाली. आपल्याला ॲन्थनीच्याजवळ पुरण्यात यावे अशी विनंती त्या पत्रात केलेली होती. नक्की काय झाले हे पाहायला त्याने माणसे पाठवली खरी पण कदाचित त्याबाबतीत त्याने जाणूनबुजून दिरंगाई केली असावी. ती माणसे आली तोवर क्लिओपात्रा मृत्यू पावली होती.

तिने स्वत:चा अंत कसा करून घेतला हे नक्की ज्ञात नाही. तिच्या खाजगी वैद्याच्या आठवणी प्लुटार्कने वाचल्या होत्या पण त्यालाही त्याबद्दल खात्री नव्हती. अंजिरांच्या टोपलीतून लपवून आणलेल्या सर्पाच्या दंशाने तिला मृत्यू आला असावा. कदाचित तिने यासाठी विष तयारच ठेवले असावे आणि ते आपल्या कंगव्याच्या पोकळीत लपवून ठेवले असावे असाही एक प्रवाद आहे. किंवा केसांना लावायच्या विषारी आकड्याने तिने स्वत:ला टोचून घेतले असावे. तिच्या हातावर छोटेसे दोन दंशव्रण फक्त आढळले.



अनुक्रमणिका

ऑक्टेव्हिअसने सिझेरियन आणि ॲन्टिलस यांना ठार मारले. ॲन्थनी आणि क्लिओपात्राची तिन्ही मुले मात्र त्याने सोडून दिली. अलेक्झांडर आणि क्लिओपात्रा (छोटी) या जुळ्या मुलांना ऑक्टेव्हिअसच्या विजयोत्सवात सामील केले गेले. पण नंतर या छोट्या क्लिओपात्राने न्युमिडियाच्या राजपुत्राशी– जुबाशी– विवाह केला. तिच्या या पतीच्या दरबारातच तिचे दोन्ही भाऊ होते. आपले आईवडील, सावत्रभावंडे यांच्या आयुष्यांची त्यांना कल्पना होती. त्यामुळे बहुधा त्यांनी आपली आयुष्ये शांतपणे, विशेष काही न करता घालवली. इतिहासदेखील त्यांना विसरला.

ऑक्टेव्हिअसने रोम आणि इजिप्तची राज्ये एकत्र केली. त्याच्या दीर्घायुष्यातील हा फार मोठा विजय होता. इ. स. पूर्व २७ मध्ये त्याने स्वत:ला ऑगस्टस सीझर म्हणवून घ्यायला आरंभ केला आणि रोमन कॅलेंडरचा सहावा महिना ऑगस्ट नावाने ओळखला जाईल असे जाहीर केले. कारण त्याच महिन्यात त्याने त्याच्या सर्वात जबरदस्त शत्रूचा– क्लिओपात्राचा– नाश केला होता.

रोमन इतिहासकार टेसिटस याने म्हटले आहे– "मोठमोठ्या घडामोडी, घटना कधी किती अस्पष्ट, धूसर आवरणात असतात. काहीजण त्या घटनांबाबतीत ऐकीव गोष्टींवर विश्वास ठेवतात, त्या ऐकीव गोष्टींना आगापीछा असो– नसो. काहीजण वस्तुस्थितीचा विपर्यास करून खऱ्याचे खोटे करतात. आणि गंमत म्हणजे या दोन्ही प्रकारच्या चुकांचे धागे पुढे पिढ्यान्‌पिढ्या नेणारे लोकही असतात." क्लिओपात्राच्या बाबतीत असेच झाले असावे. पण तिच्या गोष्टीतील कच्चे दुवे, विसंगती आणि तिच्या आयुष्यातील ज्ञात वस्तुस्थिती यांचा संबंध केवळ अशा धूसरतेशी जोडता येणार नाही. तिच्याविषयीच्या दंतकथा उगीचच पसरल्या गेल्या नाहीत. त्या दंतकथांना आधारभूत असणाऱ्या घटना ताज्या असतानाच, लोकांच्या स्मरणात असतानाच या दंतकथा तयार व्हायला आरंभ झाला होता.

त्या प्रसृत करण्यामागे निश्चित असा हेतू होता– तो होता या कथानायिकेला बदनाम करण्याचा. क्लिओपात्राच्या स्नेह्यांनी आणि दोस्त– साथीदारांनी फार थोडे लिखित पुरावे मागे ठेवले आहेत. पाश्चात्य संस्कृतींमध्ये रुजलेली तिची प्रतिमा म्हणजे तिच्या शत्रूंनी तिच्याविरुद्ध केलेला प्रचार आहे. त्या कल्पनेची वाटेल तेवढी रूपे अस्तित्वात येऊन शकतात. पण त्या सर्वांची बाह्यरूपरेखा साधारण सारखीच असते– ती असते राक्षसी पण भुरळ पाडणाऱ्या चेटकीणीच्या रूपातल्या क्लिओपात्राची ! ऑक्टेव्हिअसने तयार केलेली प्रतिमा !

कालौघात या प्रतिमेचे कधीकधी परिवर्तन रूपांतर झाले याचे आश्चर्य वाटते. शिवाय त्यातील काही भाग गाळला जातो हेही जरा कुतूहलाचेच आहे. उदा. – क्लिओपात्राच्या दोन्ही विवाहांबद्दल तिच्या कथेतून काहीच सांगितले जात नाही. (अशा प्रकारचे मात्रागमनी विवाह इजिप्शियन राजघराण्यात रूढ असले तरी रोमनांची तशी प्रथा नव्हती) अर्सिनो या तिच्या

बहिणीच्या तिने करवलेल्या वधाबद्दलही बोलले जात नाही.

१४व्या टॉलेमीच्या- तिच्या भावाच्या खुनाबद्दल तर कधीच बोलले जात नाही. तिने केलेले हे गुन्हे दुर्लक्षिले जातात. कारण थेटपणे रोमनांविरुद्ध केलेले ते गुन्हे नव्हते. क्लिओपात्राच्या एका गोष्टीत तर असे स्पष्ट म्हटले आहे की, रोम हा तिचा मुख्य शत्रू होता. आपल्या राज्यातील लोकांशी ती कशी वागली हे काही फारसे महत्त्वाचे नाही.

कदाचित यामुळेच इजिप्तमधील तिची यशस्वी आणि उत्तम कारकीर्द ही तिच्याबद्दलच्या दंतकथेचा भाग बनू शकलेली नाही. सरळसरळ दिसणाऱ्या तिच्याविषयीच्या या शत्रुत्वापेक्षाही अधिक गुंतागुंतीची कारणे या उपलब्ध दंतकथेमागे असावीत. आपला शत्रू हा उत्तम राज्यकर्ता होता हे मान्य करून तिच्या कार्यक्षमतेची वाखाणणी करणे हा ऑक्टेव्हिअसचा हेतू असणे कदापि शक्य नव्हते. पण तिच्याबद्दल सहानुभूती बाळगणाऱ्यांनी देखील तिच्या या पैलूकडे दुर्लक्ष करावे हे मोठे आश्चर्य ! प्राचीन इतिहासकार आणि कवी यांना इतर गोष्टींप्रमाणेच क्लिओपात्राच्या गोष्टीबाबतही फक्त लैंगिकता, हिंसा, प्रेम आणि युद्ध, यातच रस होता. त्यामुळेच राज्यांची करआकारणी, तिथे पडणारे दुष्काळ, चांगली-वाईट निघणारी पिके, अलेक्झांड्रियासारख्या चंचल वृत्तीच्या बहुभाषिक शहराची धोरणे, कायदा आणि सुव्यवस्था या साऱ्या गोष्टी या कथांच्या बाहेरच राहतात. ज्यावेळी प्रियकराविना ती इजिप्तमध्ये राहात होती आणि अत्यंत कुशलतेने व कार्यक्षमतेने राज्यशकट हाकत होती तेव्हाची तिची वर्षे सर्वांच्या नजरेतून निसटतात.

एखाद्या राज्यात शांतता आणि सुव्यवस्था असली, समृद्धी असली की त्या राज्याकडे कुणाचे लक्ष जात नाही, लोकांच्या ते नजरेत येत नाही किंवा त्याबद्दलची बातमी होऊ शकत नाही त्याचप्रमाणे उत्तम प्रशासक, कुशल राज्यकर्ती, सरळ, साध्या वागणुकीची, कोणतीच भानगड नसणारी क्लिओपात्रा कुणाच्या लक्षातच येत नाही. तिच्या त्या काळाबद्दल काही बोलले जात नाही.

प्रत्येक गोष्टीला आरंभ, मध्य, शेवट असावाच लागतो. क्लिओपात्राचे दोन प्रियकर होते म्हणून तिच्याबद्दल दोन कथा प्रचलित आहेत. दोन्ही कथा अशा रूपात प्रचलित आहेत. की ज्यामध्ये वस्तुस्थितीचा विपर्यास होतो. ज्युलियस सीझर आणि क्लिओपात्रा यांच्या संबंधांबद्दलची कथा अशी सांगितली जाते की तो इजिप्त सोडून गेल्याबरोबर जणू कथाही संपते. त्यानंतर तिचे इजिप्तला जाणे जणू काही कथेचा निष्कर्ष, शेवट बिघडवून टाकणारे आहे अशा रीतीने त्या जाण्याकडे दुर्लक्ष केले जाते. ॲन्थनीबरोबरचे तिचे प्रेमप्रकरण पहिल्याच दृष्टीभेटीत सुरू झाले असावे असे रंगवले जाते. त्या दोघांची आधीपासून सीझर हयात असल्यापासून ओळख होती हे सांगितल्याने त्यातील नाट्यमयता कमी नाही काही होणार ? शिवाय सौंदर्यशास्त्रही सत्यापलाप करावयास सांगतेच की !



अनुक्रमणिका

काही थोड्या लेखकांनी, कलावंतांनी क्लिओपात्रासंबंधीच्या सत्याचा शोध घेण्याचा प्रयत्न त्यांच्या कलेतून केला. इतिहासकाराने घडलेल्या घटनांमध्ये कोणताही बदल न करता त्यांचा अन्वय लावण्याचा प्रयत्न करणे हे त्याचे कर्तव्य ठरते ही भावना थुसिडायडसपासून चालत आलेली आहे. पण गेल्या तीनशे वर्षांतच ती सार्वत्रिक रीतीने मान्य झाल्यासारखी दिसते. आणि शंकाही आता शक्यतेच्या कसोटीवर पारखल्या जातात. आमच्या काळातले भौतिकशास्त्रापासून ते साहित्यशास्त्रापर्यंतच्या क्षेत्रात काम करणारे संशोधकदेखील संपूर्णपणे वस्तुनिष्ठ सत्याचा आदर्श हा एखाद्या काल्पनिक राक्षसासारखा मानतात. त्यांच्या मतानुसार एखाद्याचे वस्तुनिष्ठ आकलनदेखील परिस्थितीशरण आणि विरूप असू शकते. आकलन–कर्त्याच्या व्यक्तित्वावर, मानसिक घडणीवर ते अवलंबून असते. क्लिओपात्रा आणि आपण यांना दोन हजार वर्षांच्या कालखंडाने अलग केले आहे.

या दीर्घ कालखंडात अनेक इतिहासकारांनी आपल्या आवडीप्रमाणे खऱ्या घटनांपैकी काहींची निवड केली, कधी आपापल्या धन्यांना खूष करण्यासाठी, त्यांच्या कीर्तीचे पोवाडे गाण्यासाठी, कधी ईश्वराला खूष करण्यासाठी तर कधी वाचकांचे मनोरंजन करण्यासाठी त्यांनी निर्लज्जपणे वस्तुस्थितीचा विपर्यास केला.

दुसऱ्या शतकातील अलेक्झांड्रियन इतिहासकार अप्पियन याने लिहिलेला रोमन इतिहास फार प्रसिद्ध आहे. त्यात क्लिओपात्राचे अनेक संदर्भ आहेत. आपल्यापुढे असलेल्या साधनांमधून घटनांची निवड करताना आपण कोणती तत्त्वे वापरली हे तो कोणताही आड पडदा न ठेवता सांगतो. तो म्हणतो,"लोकांना चकित करून सोडणाऱ्या, नाट्यपूर्ण, विस्मयजनक घटना मी निवडल्या आणि आधी सांगितलेल्या गोष्टी पक्क्या करण्यासाठी, त्या जनमानसावर ठसवण्यासाठी उपयोगी पडणाऱ्या घटनांचीच मी निवड केली." एखादा आधुनिक इतिहास संशोधक या प्रकाराला मान्यता देणार नाही. पण अनेक शतके हेच निकष वापरले गेले आणि आजही लोकप्रिय लेखनासाठी तेच वापरले जातात. अप्पियनने हे सर्व निलाजरेपणाने सांगितले कारण सत्यशोधन हा त्याचा हेतू नव्हता. त्याला फक्त कथा– कथन करायचे होते.

इसवीसनानंतरच्या आरंभकाळातही ऐतिहासिक सत्याबद्दल लेखकांना विशेष आस्था नव्हती. अश्रूंच्या पडद्याआड झाकलेल्या, दृष्टीपलीकडे असणाऱ्या धूसर, वैभवसंपन्न फिकट सावलीतील जगामध्ये घटनाधिष्ठित सत्य हे आध्यात्मिक सत्यापेक्षा नेहमीच गौण होते. नाटककार, कवी, चित्रकार आणि तथाकथित इतिहासकार या सर्वांनी ऐतिहासिक दस्तऐवजाचा उपयोग कच्च्या मालासारखा केला. आपापल्या कलेच्या अभिव्यक्तीला सोयीचे ठरेल असे या सर्व ऐवजाचे निर्लज्जपणे रूपांतर केले. त्यांना कधी एखादे नीतितत्त्व सांगायचे होते तर कधी एखादी गोष्ट सांगायची होती.

१६व्या शतकात माँतेनने अप्पियनच्या मनातील भावनाच जणू बोलून दाखवल्या. माँतेन म्हणतो,"अविश्वसनीय पुरावे पण शक्यतेच्या कोटीतील, जर मिळाले तर ते खरेच वाटतात. इतिहासकारांनी घटनांचे लावलेले वेगवेगळे अर्थ आणि असे हे पुरावे यातून मी माझ्या उपयोगासाठी अत्यंत दुर्मिळ आणि लक्षात राहतील अशाच अर्थांची, पुराव्याची निवड करतो." अप्पियन आणि तत्कालीन इतर इतिहासकार व माँतेन यांच्यातील पंधराशे वर्षांचे अंतर त्याच्या या उद्‌गारांनी पुसूनच टाकले जाते जणू !

दुर्मिळ आणि लक्षात ठेवण्याजोग्या अशा गोष्टी क्लिओपात्राच्या कथेमध्ये अशा तऱ्हेने घुसडल्या गेल्या आणि तिची दंतकथा तयार झाली. अनिश्चित स्वरूपाची काही सत्ये आणि काही निश्चितपणे खोट्या असणाऱ्या गोष्टी यांची ठिगळे लावून ही दंतकथा प्रसृत केली गेली. या साऱ्या गोष्टींच्या एकत्रीकरणाची प्रक्रिया कशी होत गेली ते सांगण्याचा इथे प्रयत्न केला आहे. तो करीत असताना कोणत्या इच्छा आकांक्षांनी, मनातील कोणत्या भीतीनी क्लिओपात्राला जिवंत ठेवली, ही दुराचारी राणी, नाईलमधील सर्पीण, जिच्यासाठी सारे जग हरवले होते ती स्वप्नसुंदरी क्लिओपात्रा कशा रीतीने लोकांच्या मनात ठसत गेली याचाही वेध घेतला आहे.

---

एखादी घटना / गोष्ट चिरकाल जशीच्या तशी परत येते, ही कल्पनाच गूढ आहे. नीत्शेने तिचा वापर करून तत्त्वज्ञांना अनेक वेळा पेचात टाकले होते. उदा. आपण जिचा अनुभव घेतला आहे, अशी गोष्ट / घटना चिरकाल परत येते, आणि हे असे होण्याला कधी अंतच नाही ही कल्पनाच गूढ आहे. या वेड्या मिथकरवी काय दर्शविले जाते? या विचाराचा / कल्पनेचा अकरणात्मक दृष्टीने विचार करू या. एखादी गोष्ट / घटना चिरकाल परत येते, या मिथने एक मुद्दा अधोरेखित होतो. जे जीवन एकदाचे व कायमचे नाहीसे झाले आहे, ते परत येणारच नाही, ते पडछायेसारखे, काहीही वजन नाही असे आणि अगोदरच मुक्त झालेले असते. ते मग महाभयानक, सुंदर, परतत्त्वाचा स्पर्श झालेले का असेना. त्याची भयानकता, त्याचा परतत्त्वाचा स्पर्श झाल्याची अवस्था, आणि सौंदर्य याला काहीही अर्थ नाही.

समजा फ्रेंच राज्यक्रांती ही चिरकाल जशीच्या तशी परत येतच राहिली. तर फ्रेंच इतिहासकार रोब्सपिअरबद्दल कमी अभिमान बाळगतील. परंतु ही क्रांती परत येणारच नाही अशी त्यांची खात्री आहे. म्हणूनच क्रांतीची रक्तलांच्छित वर्षांचे रूपांतर शब्द सिद्धांत आणि चर्चा यात झाले आहे. ती क्रांतीची रक्तलांच्छित वर्षे ही पिसापेक्षाही हलकी झाली आहेत, आणि त्या वर्षांची भीती कोणालाच वाटत नाही. म्हणूनच आपण एका कल्पनेबाबत एकवाक्यता करू या. एखादी गोष्ट / घटना चिरकाल परत येते. या कल्पनेत एक विशिष्ट दृष्टिकोन अनुस्युत आहे. या दृष्टिकोनानुसार आपणास गोष्टी / घटना जशा माहिती व ज्ञात असतात त्यापेक्षा त्या वेगळ्या दिसतात. क्षणभंगुर अशा प्रकृतीच्या परिस्थितीत त्यांचे गांभीर्य कमी होऊनच त्या घटना / गोष्टी आपणास दिसतात. ही गांभीर्य कमी झालेली परिस्थिती आपणास निर्णयापर्यंतच पोहचू देत नाही. जी गोष्ट, घटना क्षणभंगुर आहे. जी लवकरच बदलणार आहे, तिचा आपणस निषेध कसा करता येईल. **–मिलान कुंडेरा**

# साहित्य व समाज

## न दिसणारा भटक्या
## बोदलेर, स्त्रिया आणि आधुनिकतेसंबधीचे वाङ्‌मय

**– डॉ. मंगला सरदेशपांडे**

### आधुनिकतेचा अनुभव

'आधुनिक'ता ही संकल्पना अनुस्युत असलेले पाश्चिमात्त्य वाङ्‌मयीन साहित्य फक्त पुरुषांच्या अनुभवाचे वर्णन करते. बाहेरच्या जाहीर (Public) जगतात होणारे परिवर्तन आणि त्याला अनुषंगिक अशा जाणिवा याची ते वाङ्‌मयीन साहित्य प्रामुख्याने दखल घेते. 'आधुनिक' म्हणून समजल्या जाणाऱ्या युगाची सुरुवात व उदय नेमका कोठच्या तारखेपासून झाला या संबंधी वेगवेगळे वृतांत उपलब्ध आहेत. अनेक पाश्चिमात्त्य लेखकांनी आधुनिकतेची प्रवृत्ती तिची वैशिष्ट्ये कोणती, ती निर्देशित करून, त्यांची यादीच पेश केलेली आहे. या बाबत असे सांगता येते की या सर्वच वृत्तांतातून जवळजवळ एक गोष्ट समान आहे. ती म्हणजे हे 'आधुनिक' वाङ्‌मयीन साहित्य शहरी जीवन, त्यातले राजकारण, त्यात होणाऱ्या हालचाली आणि शहरातील नागरिक ज्या प्रकारचे श्रम करतात, त्यांच्याबद्दल आस्था दाखविते आणि त्याच्याशीच संबंधित असते. उदा. प्रख्यात जर्मन समाजशास्त्रज्ञ वेबर यांनी 'आधुनिकत्वाची' प्रमुख लक्षणे सांगितली आहेत. तर्क आणि बुद्धी (rationalism) यांच्या मदतीने दिवसेंदिवस अधिक प्रमाणात केला जाणारा विचार– थोडक्यात परंपरागत पद्धतीने विचार करणे सोडून देणे. यानंतर या विचार प्रक्रियेचा ज्यांच्यावर परिणाम होतो त्या प्रमुख सामाजिक संस्था उदा. कारखाने, कचेरी आणि सरकारी खाती. आधुनिक वाङ्‌मयीन साहित्य फक्त पुरुषांच्या अनुभवांचे वर्णन करते असा उल्लेख या अगोदर येऊन गेला आहे. त्याकडे बोट दाखवून कोणी असा मुद्दा उपस्थित करील की, आजवर स्त्रिया, कारखान्यात नेहमीच काम करीत आल्या आहेत. त्याचप्रमाणे नोकरशाहीत झालेली वाढ ही देखील स्त्रियांवरच काही प्रमाणात अवलंबून होती. नोकरशाहीत काम करणाऱ्या असंख्य स्त्रिया आणि कचेरीतील स्त्री सचिव यांच्या मदतीशिवाय नोकरशाही ही सामाजिक संस्था व संघटना उभी राहिली नसती व प्रस्थापितही झाली नसती. ही वस्तुस्थिती असली तरी या विद्यमान जगाचे वर्णन, दोन कारणांसाठी 'पुरुषी' जग म्हणूनच केले पाहिजे. एक या सर्व संस्थांचे चालक 'पुरुष' होते. चालक याचा अर्थ 'पुरुष' मालक होते, उद्योगपती होते, व्यवस्थापक होते, कारखान्यांना भांडवलाचा पुरवठा करणारे शेटजी होते. या सर्वच संस्था पुरुषांच्या प्रभुत्वाखाली– त्या संस्थांच्या दैनंदिन कामात आणि त्या संस्थेच्या नोकरशाही उतरंडीतही–



अनुक्रमणिका

होत्या दुसरे कारण आणखीनच वेगळे आहे. आधुनिक युगात कारखान्यांची वाढ झाली हे खरे. कारण त्याच बरोबर नोकरशाहीचा विकासही. त्या कारखानदारीच्या वाढीच्या प्रक्रियेत अंतर्भूत होता. कारखानदारीची वाढ व नोकरशाहीचा विकास या दोन्ही गोष्टी हातात हात घालून झाल्या. परंतु त्याचबरोबर स्त्री आणि पुरुष यांची कार्यक्षेत्रेही त्याच काळात वेगळी झाली आणि स्त्रियांची रवानगी दिवसेंदिवस अधिक प्रमाणात घराच्या कक्षेत येणाऱ्या 'खाजगी' जागी झाली होती. मध्यमवर्गीय स्त्रियांना उपनगरात हद्दपार करण्यात आले होते. या सर्व गोष्टींबद्दल भरपूर पुरावा व दस्तऐवज उपलब्ध आहे. युरोपमध्ये एकोणिसाव्या शतकातही असंख्य कामगारवर्गीय स्त्रिया आणि अनेक कनिष्ठ मध्यमवर्गीय स्त्रिया घराबाहेर जाऊन काम करीत, नोकऱ्या करीत ही वस्तुस्थिती होती, हे देखील सर्वांनी मान्य केले आहे. तसे असले तरी सर्वच समाजात, तत्त्वप्रणालीच्या पातळीवर तरी स्त्रियांचे स्थान घरकुलातच ही धारणा अगदी पक्की होती. याचा पुरावा त्याकाळी पुरुषांना 'कौटुंबिक वेतन' मिळाले पाहिजे या कामगार वर्गीय मागणत आढळतो. थोडक्यात बाहेरच्या जाहीर जगाचा परिसर हा फक्त 'पुरुषां'च्या प्रभावाखाली होता. अर्थात हे विधान करताना या जाहीर जगात अंतर्भूत असलेल्या कक्षेत अनेक स्त्रिया काम करीत होत्या याचा विसर पडलेला नाही. परंतु 'आधुनिक' या संघटनेत अंतर्भूत असलेल्या गोष्टींचा अनुभव या जाहीर जगातच येणार होता. म्हणूनच तो प्रामुख्याने 'पुरुषी' अनुभव होता. असेच म्हटले पाहिजे.

या लेखात आजवर जे समाजशास्त्रीय विश्लेषण अधिक करून शिष्टसमंत समजले जाते त्याचा पाठपुरावा करण्यात येणार नाही. या शिष्टसंमत विश्लेषणात पुढील गोष्टी अनुस्युत असतात. १) बुद्धी व तर्क यांच्या अनुषंगाने होणारी सामाजिक प्रक्रिया. तिचेच दुसरे नाव नागरिकीकरण (Civilizing) होण्याची प्रक्रिया. हे दुसरे नाव मान्य केले, तर ही प्रक्रिया 'आधुनिक' युग येण्याअगोदर सुरू झाली होती हे लक्षात ठेवले पाहिजे. या लेखात आधुनिकतेसंबधीच्या शिष्टसंमत समाजशास्त्रीय अंगाने विश्लेषण न करता, दुसऱ्याच एका दृष्टिकोनातून ते केलेले आहे. 'आधुनिक' या संकल्पनेला नेमकेपणाने शहरी जीवनात स्थान देऊन, तिच्याबद्दल ज्या लेखकांनी त्याची चर्चा केलेली आहे, त्यांचे लिखाण हे अधिक करून दृक प्रत्ययवादी होते. त्यांच्या लिखाणाचा विचार या लेखात खास करून होणार आहे. शहरी जीवन या शब्दाचाही या विवेचनात एक विशिष्ट अर्थ अभिप्रेत आहे. हे जीवन क्षणात या ठिकाणी, तर मग लगेच दुसऱ्या ठिकाणी, क्षणभंगुर, वैयक्तिक गुंतवणूक नसलेल्या अगदी अलिप्त अशा प्रकारचे शहरी वातावरणात होणारे आदान- प्रदान आणि शहरात नागरिक ज्या एका विशिष्ट प्रकारचा दृष्टिकोन विकसित करतो, या सर्वांचा अंतर्भाव या 'शहरी- जीवन' या शब्दात केलेला आहे. 'शहरी- जीवन' हे केंद्र मानून, त्यावरच लक्ष केंद्रित करून केलेले समाजशास्त्रीय विश्लेषण हे त्या शास्त्राला तसे पटले नाही.



अनुक्रमणिका

जॉर्ज सिम्मेल या प्रख्यात फ्रेंच समाजशास्त्रज्ञाने 'शहरी- जीवनाचे सामाजिक मानसशास्त्र' या विषयावर जे शोध- निबंध तयार केले होते, त्यांचे स्मरण लगेच या ठिकाणी त्या विषयातील जाणकारांना होईल. अगदी अलीकडच्या काळात आधुनिक शहरी व्यक्ती म्हणजे नेमके काय? त्याचे निदान कसे करता येईल? या संबंधात रिचर्ड सेंन्नेट या समाजशास्त्रज्ञाने पुन्हा एकदा लोकांचे कुतूहल जागृत केले आहे.

आधुनिकतेच्या अनुभवाबद्दल एक विशिष्ट प्रकारची आत्मियता, वाङ्मयीन समीक्षेतून नेहमीच वाहाताना दिसते. या अशा प्रकारच्या समीक्षेच्या अगदी सुरुवातीचा प्रेषित होता फ्रेंच कवी चार्लस बोदलेर. एकोणिसाव्या शतकाच्या मध्यावरच्या काळात पॅरिसमध्ये वास्तव्य करणारा हा कवी. वॉल्टर बेंजामिन या प्रख्यात मार्क्सवादी टीकाकाराने कवी बोदलेर यांचे साहित्य व जीवन यासंबंधी, इ. स. १९३० साली एक छोटेखाली निबंधवजा पुस्तक लिहिले होते. या पुस्तकात बोदलेर यांचा 'आधुनिक' या संकल्पनेसंबंधी जो दृष्टिकोन होता त्यावर टीकाटिपणी करणाऱ्या वाचकाला विस्मयचकित करील अशा चिंतनाच्या नोंदी आढळतात. या नोंदी तशा अगदी बेंजामिन यांच्या साहित्य प्रकृतीला अनुरूप अशा खास त्रोटक आहेत. तसेच त्यात सलगता आढळणार नाही हेही खरे.

आपल्या या लेखात, आधुनिकत्वाच्या विशिष्ट वाङ्मय प्रकृतीची आपण तपासणी करीत आहोत. म्हणूनच कवी बोदलेर यांनी १८६९- ७० या साली लिहिलेल्या निबंधातला एक मुद्दा व वक्तव्य या तपासाचा आरंभ करण्याकरता उपयोगी ठरेल. या निबंधाचे नाव आहे The Painter of Modern Life (आधुनिक जीवनाचे चित्रकार). या निबंधात कवी बोदलेर 'आधुनिकत्व' या शब्दाचा अर्थ पुढे दिल्याप्रमाणे करतात. "जे क्षणभंगुर आहे, जे हद्दपार केले गेलेले आहे, ते एकाएकीपणे प्रकट होते; काकतालिय न्यायाने आविष्कृत होते. पण हा त्या कलेचा अर्धा भाग, परंतु या कलेचा दुसरा अर्धा भाग हा चिरंजीव आहे आणि त्यात बदलही होणार नाही." हे जे कवी बोदलेर यांचे उद्गार आहेत त्याचा प्रतिध्वनी, आधुनिकतेच्या अनुभवाचे वर्णन करणाऱ्या अगदी अलीकडच्या काळातील मार्शल बेरनान यांच्या काही थोड्या वर्षापूर्वी प्रसिद्ध झालेल्या ग्रंथात आढळतो.

या ग्रंथात आधुनिकत्वाच्या परस्परविरोधी ऐक्याचे (Paradoxial Unity) तपशीलवार वर्णन केलेले आहे. "वैचित्र्यासाठी ऐक्य, सातत्याने होणारे विघटन, आणि नूतनीकरण, संघर्ष आणि प्रतिवाद, असंदिग्धता आणि काळजी- अनामिक भिती (Anguisn) यांच्या आवर्तात आधुनिकता लोटून देते. हा मार्शल बेरनान यांनी तपशीलवार केलेल्या वर्णनाचा स्थूलमानाने सारांश आहे. मार्क्सने म्हटलेच होते, "जे काही घट्ट व पक्के आहे ते हवेतच विरते" याचा अर्थ आधुनिक बनणे म्हणजे त्या श्रद्धेचा एक भाग बनणे. यावरूनही आपणास जॉर्ज सिमेल यांनी आपणास शहरी व्यक्तित्त्व या संकल्पनेबाबत जो अहवाल पेश केला होता, त्याचे स्मरण होणे हेही क्रमप्राप्तच आहे. जॉर्ज सिमेल म्हणतात, "मज्जातंतूतून

प्रभावित होण्याच्या एकाग्रते (intensification) मध्येच शहरी जीवनपद्धतीतील व्यक्तित्त्वाचा मानसिक आधार आहे." या प्रेरणा (Stimulation) वर्हिगत आणि आंतरिकही असतात. या प्रेरणात अगदी झटकन, आणि कोणत्याही प्रकारचा विरोध न होता झालेले जे वदल असतात त्याचा तो परिणाम असतो.

सिमेल या समाजशास्त्रज्ञाच्या दृष्टिकोनातून या सर्वांचाच आर्थिक आणि वित्तव्यवस्था या दोघांशीही अतिशय घनिष्ट संबंध आहे युरोपमधली अर्थव्यवस्था एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस जगावर प्रभुत्व गाजवू लागली होती. येथे एक मुद्दा अगदी ठोसपणे नमूद केला पाहिजे. युरोपमधील शहरे ही काही एकोणिसाव्या शतकाला नवी नव्हती. ती त्या अगोदरही कित्येक वर्षे अस्तित्वात होती. परंतु आधुनिकतेचे टीकाकार व तिचे समर्थक या दोघांचीही अशी श्रद्धा होती की एकोणिसाव्या शतकाच्या मध्यावरती शहरी अस्तित्वाने अगदी सर्वस्वी वेगळ्या प्रकारची प्रकृती धारण केली.

हे अशा प्रकारचे काळ व तारीख नक्की करण्यास तसा फारसा पुरावा नसतो. तो काळ वा तारीख दोन्हीही अनमान– धपक्यानेच ठरविली जातात. एवढेच नव्हे तर ही तारीख कोठच्या शहरावावत आहे हे लक्षात घेतले म्हणजे त्या तारखेत बदल करावा लागतो. ही तारीख वा काळ लंडन, पॅरिस अथवा बर्लिन ही युरोपीय शहरे जमेस धरून ठरविलेली आहे असे समजू या. पण प्रत्यक्षात असे आहे की या प्रत्येक शहराबावत ही तारीख वेगळी असते. आपण एवढेच म्हणू या (आणि तेच आपल्या विवेचनाच्या संदर्भात उपयुक्त आहे) की या समग्र कालखंडात शहरीकरणाची प्रक्रिया ही दिवसेंदिवस फारच वेगवान झाली. त्याचबरोबर मानवी श्रम, निवासाची जागा आणि सामाजिक संबंध यात परिवर्तन झाले. या सर्वांचा परिणाम होऊन औद्योगिक भांडवलशाहीचा उदय झाला. हे सर्व होत असताना 'आधुनिकते'चाही जन्म झाला. आधुनिकतेच्या दृष्टीने हा सर्वच कालखंड निर्णायक महत्त्वाचा होता.

बेरनान या लेखकाने आणखीही एक निराळाच मुद्दा मांडला आहे. या मुद्यानुसार आधुनिकता व ते घटित या दोघांनाही पूर्वेतिहास आहे असे ते सांगतात. आधुनिकता या संकल्पनेत कोणते घटक अनुस्युत आहेत याचा उल्लेख या पूर्वी आलाच आहे. फ्रेंच राज्यक्रांतीपूर्वी या घटकांपैकी काही घटक अथवा त्यातला काही भाग याचे आगमन होणार आहे, याचे सूचन करीत होते. या वस्तुस्थितीचा आविष्कार प्रख्यात जर्मन महाकवी गटे यांच्या 'फाऊस्ट' या काव्यात आढळतो. मालकम ब्रॅडवरी हे एक नामवंत ब्रिटिश कादंबरीकार व समीक्षक आहेत. त्यांनी आणि दुसरे एक नामवंत समीक्षक मॅकफरसेन या दोघांनी मिळून संपादित केलेल्या एका ग्रंथात, 'आधुनिकते'बाबत इ. स. १८९० ते इ. स. १९३० हा कालखंड आपल्या विवेचनासाठी केंद्र मानला आहे. त्यांच्या मते 'आधुनिकत्व' या संकल्पनेचे जनकत्व फ्रेंच कवी बोदलेर यांच्याकडे जाते. या ठिकाणी एक गफलत आहे.





अनुक्रमणिका

हे दोघेही साहित्य- समीक्षक एका वेगळ्याच प्रक्रियेबद्दल विवेचन करीत आहेत. ते कलाक्षेत्रातील आधुनिकतावादा (MODERNISM) संबंधी विश्लेषण करीत आहेत. तो त्यांचा दोष नाही. याचे कारण आधुनिकतावाद आणि आधुनिकत्व (MODERNITY) या दोघांत अनेक वेळा गल्लत केली जाते. काव्याची भाषा व काव्याचा घाट या दोन्हीमध्ये क्रांती घडवून आणणारा कवी, अशा दृष्टिकोनातून कवी बोदलेर हे एक 'आधुनिकतावादी' कवी होते असा दावा आजवर कोणीही केलेला नाही; असे आम्हास वाटते (चूकभूल द्यावी घ्यावी) परंतु आधुनिकत्वाबद्दलचा सुरुवाती सुरुवातीचा अनुभव हा एकोणिसाव्या शतकाच्या मध्यावरती नेऊन ठेवणे आणि त्या शतकाच्या अखेरीला कलांतून आधुनिकत्वाचा आविष्कार होणे या दोन विधानांत कोणत्याही प्रकारची विचूकता व विरोध नाही.

आधुनिकतेची काही अनोखा अशी वैशिष्ट्ये व प्रकृती आहे. शहरातील व शहरी जीवनातील जे क्षणभंगुर व निसटते हर्ष- विमर्षाचे प्रसंग, प्रतिमा, अनुभव, दृक प्रत्यय या सर्वांचा समावेश त्या वैशिष्ट्यांत व प्रकृतीत असतो. आधुनिकतेच्या समाजशास्त्राने एका गोष्टीचा शोध घेणे आवश्यक आहे. ती गोष्ट म्हणजे, विद्यमान समाजातील सामाजिक आणि भौतिक बाजूत या नव्या वागणुकीचे आणि अनुभवाचे उगमस्थान नक्की करणे. जॉर्ज सिमेल यांच्या या संबंधातल्या भाष्याचा उल्लेख या पूर्वी येऊन गेला आहे. समाजात जी आर्थिक आणि वित्तव्यवस्था विद्यमान असते त्यांच्याशी- जॉर्ज सिमेल यांचे वर्णन 'विनधास्त दृष्टिकोन असे करतात- तो दृष्टिकोन आणि शहरी व्यक्तित्व संबंधित आहे असे सिमेल यांचे मत आहे. मार्क्सने कम्युनिस्ट जाहीरनाम्यात वर्णन केलेल्या 'वितळणारी प्रचिती' (melting vision) या विषयीच्या मार्क्सच्या विवेचनापासून सुरुवात करून, मार्शल बेरनान मार्क्सने सांगितलेल्या आणखी काही गोष्टींकडे वळतात.

बेरनान असे करताना त्यांची कारणेही देतात. वितळणारी प्रचिती आधारभूत मानायची. बुर्झ्वा आणि भांडवलदार यांनी निर्माण केलेली व त्यांना मंजूर असलेली उत्पादन व्यवस्था जमेस धरायची. असे केल्याने या भांडवलशाही उत्पादन व्यवस्थेने निर्माण केलेले ·पराकोटीचे (Radical) सामाजिक बदल आपल्या विवेचनाला आधारभूत ठरतात. विवेचनात त्यांचा उपयोग होतो असे मार्क्सचा हवाला देऊन बेरनान आपणास सांगतात. याउलट कवी बोदलेर 'आधुनिकता' या घटितासंबंधी विचार करतात. ते त्या मागच्या धारणांची विचारपूस करीत नाहीत. हे या ठिकाणी खास करून लक्षात ठेवले पाहिजे. या लेखात आधुनिकतेच समाजशास्त्र म्हणजे काय? याचे विवरण करणे, हे आमचे उद्दिष्ट नाही. म्हणूनच 'आधुनिक' अनुभवाचा, सामाजिक आणि आर्थिक पाया कशा प्रकारचा आहे? या विषयीचे एकमेकाशी स्पर्धा करणारे जे सिद्धांत आहेत त्याचे मूल्यमापन करणे, त्यांची उतरंड ठरविणे हे कामही या लेखात केले जाणार नाही. तसेच या लेखात गृहित धरलेले 'आधुनिकत्व' हे कितपत, तसे अगदी तंतोतंत बरोबर आहे याचीही तपासणी केली जाणार नाही. आधुनिक शहरी

अनुभव म्हणून जो समजला जातो त्या संबंधीचे वृत्तांत त्या विषयी जी टीका – टिप्पणी करण्यात आली आहे ती विचारात घेणे एवढेच मर्यादित उद्दिष्ट या लेखात आहे. त्याजबरोबर हेही कोणी नाकारणार नाही की या लेखात विचारात घेतलेले वृत्तांत व टीकाटिप्पणी कमी अधिक प्रमाणात समाजशास्त्रीय दृष्टिकोनातून त्या अनुभवाचे वर्णन करतात.

हे सर्व अनुभव जमेस धरून एकोणिसाव्या शतकात लैंगिक स्वरूपाचे जे सामाजिक विभाजन होते (Gender division) त्याची दखल घेऊन त्या अनुभवांचा विचार होणार आहे. या अशा मर्यादित कक्षेत विचार करता एखादा विशिष्ट वृत्तांत हा तत्कालीन कालखंडातील सामाजिक– ऐतिहासिक अशा आकलनावर पुरेसा आधारलेला आहे की नाही हे या लेखातील संकल्पित विवेचनाच्या संदर्भात अजिबात महत्त्वाचे नाही. तसेच येथे विचारात घेतलेले वृत्तांत हे सुसंगत असलेच पाहिजेत असेही नाही उदा. बेरनान यांनी असे दाखवून दिले आहे की कवी बोदलेर हे जेव्हा आधुनिकत्वासंबंधी लिहितात, तेव्हा अनेक वेगवेगळया संकल्पनांचा वापर करतात. तसेच 'आधुनिकत्व' या घटितासंबंधी त्यांचे मोजमापही एकसारखे बदलत असते.

कवी बोदलेर यांचे कला– समीक्षात्मक असे ते लिखाण आहे. त्या लिखाणातील आधुनिकत्वासंबंधीचे भाष्य हे तसे अधिक स्पष्ट आहे. या आपल्या भाष्यातल्या मुद्यांच्या अनुषंगाने त्यांनी आपल्या स्वत:च्या कविता आणि गद्य कविता यावरही भाष्य केलेले आहे. पण ते त्यांच्या कला– समीक्षात्मक लिखाणातील भाष्याइतके खासच स्पष्ट नाही. 'The salon de 1845' इ. स. १८४५च्या चित्रकला प्रदर्शनावर त्यांनी एक परीक्षण लिहिले आहे. त्यात आधुनिकतेसंबंधी उल्लेख आढळतो.

कवी बोदलेर यांनी आधुनिकतेसंबंधी केलेल्या भाष्यातले ते अगदी सुरुवातीचे भाष्य. या परीक्षणातील अगदी शेवटच्या परिच्छेदात त्याचा उल्लेख आहे. परीक्षण लिहून हातावेगळे करता करता त्यांना तो विचार सुचला असावा अशा प्रकारे तो त्या ठिकाणी समाविष्ट करण्यात आला आहे. या परीक्षणात त्यांनी विद्यमान चित्रकलेची शिफारस केलेली आहे. परंतु या चित्रकलेला आपल्या अवतीभवतीच्या वर्तमानकालीन जगात रस नाही यावद्दल खेदही व्यक्त केलेला आहे. कवी बोदलेर म्हणतात,

"भविष्यकाळातील वारे कसे वाहतील यासाठी कोणीही कान टवकारलेले नाहीत. असे आहे तरी 'आधुनिक जीवनातील' वीरता आपल्याला घेरते आणि आपल्यावर दबावही टाकते. आमच्या भावनांनी आमचा गळा आम्हास घुसमटावयास लावील अशा प्रकारे आवळला आहे. तो इतका आवळला आहे की, आम्हाला आमच्याच भावना ओळखणे शक्य नाही असे झाले आहे. महाकाव्ये रचण्यासाठी विषयांची वाण नाही, रंगाचाही तोटा नाही. आपण सारे अस्सल चित्रकाराच्या शोधातच आहोत. हाच चित्रकार आजच्या

दैनंदिन महाकाव्याला अनुरूप असे जे गुण असतील, ते टिपेल व पकडून ठेवील. आपल्या कुंचल्याने अगर आपल्या लेखणीने, तो आपणस एक गोष्ट पाहण्यास भाग पाडील, व समजावूनही देईल ती म्हणजे आम्ही टाय लावलेले,पेटंट लेदरचे बूट घातलेले आहेत. पण तरीही आम्ही किती महान आणि काव्यत्मकता असलेले आहोत. येत्या वर्षी नवे जे काही येणार आहे त्याच्या आगमनाचा उत्सव साजरा करण्यातील आनंद हे महाकाव्यात्मकतेला आवश्यक असलेल्या गुणांचे जे शोधक आहेत, ते आम्हास बहाल करतील. निदान आपण तशी आशा करूया."

परंतु त्यानंतरचे वर्ष काही अधिक चांगले नव्हते. खऱ्याखुऱ्या दृष्टीने जिला तत्कालीन कला म्हणता आले असते, ती त्या प्रदर्शनात गैरहजर होती. याबद्दल कवी बोदलेर खेद व्यक्त करतात ("ही विद्यमान कथेला") त्यांच्या मते बाल्झा यांच्या कादंबऱ्यांत आढळणाऱ्या व्यक्तिचित्रांशी आणि आधुनिक संविधानाशीच (Themes) "या विद्यमान कलेला फक्त कर्तव्य होते" या वेळी त्यांनी इ. स. १८४५ साली आधुनिकतेचा जसा जाता जाता उल्लेख केला होता. तसे काही केले नाही. उलट त्यांनी त्याकरता अनेक पाने खर्ची घातलेली आहेत.

इ. स. १८४५ सालाचे कलाप्रदर्शन, या कलाप्रदर्शनाच्या परीक्षणात "आधुनिक जीवनातील वीरत्वा"च्या कथानकासंबंधी शेवटच्या विभागात त्यांनी लिहिले आहे. परीक्षणांतल्या या स्थळी 'आधुनिक' जीवनाने ओळखता येतील अशी काही वैशिष्ट्ये धारण करण्यास सुरुवात केली होती. उदा. लोक घालत असलेल्या कपड्याचे तेच तेच कंटाळा आणणारे एकच एक रंग जाऊन 'आधुनिक' या घटितसंबंधी प्रतिक्रिया व्यक्त करणारा डँडी (Dandy) चा पेहराव आला, बोदलेर काही खाजगी (Private) विषयांची भलावण करतात. याचे कारण तत्कालीन चित्रकलेचे जाहीर (Public) आणि विद्यमान राजवट यांचे जे विषय होते, त्यांच्यापेक्षा या खाजगी विषयांचे द्वारे वीरत्वाचा आविष्कार अधिक प्रमाणात होत होता. बोदलेर यांनी म्हटले होते,

"फॅनशवेल जीवनाचे नयनमनोहरी प्रदर्शन आणि अंतराळात विहार करणारी हजारो अस्तित्वे- गुन्हेगार आणि ठेवलेल्या रखेल्या... एखाद्या महानगरातील गुन्हेगारी जगतात हे सारे दिशाहीनतेने वाहातच असते. उदा. गाझेट डे टिबुनी आणि मोनिटर या दोन संशोधन पत्रिकांनी आपणास असे दाखवून दिले आहे की आपल्या समाजातील 'वीरता' जाणण्याकरिता आपले डोळे फक्त उघडे ठेवले पाहिजेत. ... आपल्या शहरातले जीवन काव्यात्मकतेच्या बाबतीत श्रीमंत आहे आणि अनेक विलोभनीय असे विषय त्या जीवनात आहेत."

त्यानंतर तब्बल चौदा वर्षांनी लिहिलेल्या "आधुनिक जीवनाचे चित्रकार" या लेखात या सर्वच विषयांची बोदलेर यांनी अधिक तपशीलात जाऊन वर्गवारी केलेली आहे. या

मध्यंतरीच्या काळात बोदलेर यांना एका चित्रकाराचा शोध लागला. या चित्रकाराचे नाव आहे CONSTANTIN GYYS कोनस्टानटिन गी. हा चित्रकारच त्यांच्या निबंधाचा विषय आहे. त्यांच्या मते 'आधुनिकता' टिपणे, तिचे चित्रण करणे ही सर्व कामे करण्याच्या दृष्टीने, हा चित्रकार त्या कामास न्याय देईल असा आहे. आता खरे असे आहे का? या क्षेत्रातले पंडित आपणास असे सांगतात की गी यांची वॉटरकलर्स (पाणरंग चित्रे) आणि इतर रेखाटने ही सर्वसामान्यपणे तो एक कुशल व बुद्धिमान चित्रकार होता एवढेच सांगतात. परंतु कलाशास्त्राच्या दृष्टिकोनातून विचार करता तो चित्रकार फारच उथळ होता, उदा. बेरनान हे टीकाकार "रूपवान व्यक्ती आणि त्यांचे विश्व यांचे मनोहारी चित्रण करणारा हा चित्रकार" असे सांगून त्याला निकालात काढतात. त्याचबरोबर ते एका गोष्टीबद्दल आश्चर्यही व्यक्त करतात. ती गोष्ट म्हणजे, "बोदलेर ज्या चित्रकलेला फारच वरच्या श्रेणीची कला समजतात ती वस्तुत: ब्लुमिंगडेल अगर बॉनवीर यांच्या जाहिरातीच्या पलीकडे जाणारी फारशी उच्च दर्जाची कला नाही. ते काहीही असो, हा बोदलेर यांचा जो निबंध आहे त्यात 'आधुनिकत्व' ही जी संकल्पना आहे, त्याचा विस्तार आहे, म्हणून लक्षणीय आहे." गी हे आधुनिक जीवनाचे चित्रकार आहेत. ते रात्र आणि दिवस याबद्दलच्या ज्या नानाविध प्रतिमा आहेत त्या टिपतात. बोदलेर म्हणतात,

"हा चित्रकार जातो आणि जीवन सरिता आपले ऐश्वर्य, वैभव दाखवित. राजदिमाखात आपल्या समोरून जाताना तो पाहातो. सूर्याच्या माऱ्याखाली जायबंदी झालेल्या अथवा धुक्यानी व्यापलेल्या पाषाणांच्या त्या देखाव्याकडे तो टक लावून पाहातो. देखण्या घोडा गाड्या आणि त्यांचे मस्तवाल घोडे, झगमगाटी पोषाखातले तरतरीत असे त्यांचे मोतद्दार, घोडागाडीवरील सेवकांचे (FOOTMAN) पराकोटीचे कौशल्य कमनीय चालण्याचा ढंग असलेल्या स्त्रिया, मुलांचे सौंदर्य, या सर्व गोष्टींपासून तो आनंद मिळवतो. . . . . समजा एखाद्या वस्त्राची फॅशन बदललेली असेल अथवा ते वस्त्र एका वेगळ्या ढंगाने कापून शिवलेले असेल, केसांचा भांग काढताना फुगे आणि कमानी जाऊन, त्या जागी तुरे आलेले असतील, बॉनेटक चांगल्या मोठ्या झालेल्या असल्या, आणि केसांचा अंबाडा मानेच्या खालच्या टोकापर्यंत सेंटीमीटरभर पुढे सरकला असला, कंबरेला वेढणारा कमरपट्टा जरा थोडा वर आला असला, आणि स्कर्टसची लांबी तो चांगलाच पायघोळ होईल अशी वाढलेली असली, तर त्या चित्रकाराच्या गरुड दृष्टीने, हे सारे कितीही दूरवरच्या अंतरावर घडत असले, तरी केव्हाच टिपलेले असते, याबद्दल अगदी पक्की खात्री बाळगा."

बेरनान या टीकाकारानी हा परिच्छेद 'जाहिरातीसाठी लिहिलेला मजकूर' असे सांगून निकालात काढलेला आहे. क्षणभर त्यांचे म्हणणे मान्य करूया. जे केवळ दिखाऊ, वरवरचे आहे आणि केवळ फॅशनबेल आहे, त्याची ती जंत्री आहे, असे जरी गृहित धरले, तरी एक मुद्दा राहातोच. तोच मुद्दा महत्वाचा आहे. तो म्हणजे आपल्या दृकप्रत्ययाचे प्रदर्शन

करण्यातच आधुनिक जाणिवा, तसेच 'आधुनिक' युगाला योग्य ठरेल असे सौंदर्य त्या वर्णनात अनुस्युत आहे. त्याहीपेक्षा अधिक महत्त्वाची एक गोष्ट आहे. ती म्हणजे हे क्षणभंगुर, पळ काढणाऱ्या वर्तमानकालीन संदर्भ असलेल्या गोष्टी पकडते.

बोदलेर आपल्या लेखनातून वरवरच्या (formal) केवळ लगेच दिसणाऱ्या लक्षणाचे सूचन करतात. याठिकाणी पुन्हा डँडी (DANDY) या संकल्पनेत अनुस्युत असलेली व्यक्ती प्रकट होते; ती अगोदरच्या एका परिच्छेदात उल्लेखिलेल्या 'गी' या चित्रकाराबरोबर तुलना करण्यासाठी, तसेच त्या दोघात जे काही वेगळेपण असेल त्याचा निर्देश करण्यासाठी, त्याचबरोबर प्रत्येक व्यक्तीच्या ठिकाणी जी प्रतिभा आहे ती ठाऊक व्हावी म्हणून आणि तिचे प्रकटीकरण व्हावे यासाठीही डँडी पुन्हा एकदा प्रवेश करतो. या सर्व व्यक्ती तसे बघायला गेल्यास एकछापीच असतात. परंतु या व्यक्तींच्या मनात आपले जे चित्र दिसावे व त्याबद्दलची त्यांची जी व्यथा आहे, ती त्या डँडीसारखीच आहे. डँडी हा तसा बिनधास्त वृत्तीचा व दृष्टिकोनाचा तसेच इतरांच्या भावनांबावत संवेदनाक्षम नसलेला असतो. 'गी' यांना अशा दृष्टिकोनासंबंधी घृणा आहे. निदान बोदलेर तसे आहे असे आपणास सांगतात. गी हा तसा भटक्या (Flaneur फ्लोनर) आहे. तो गर्दीत असला म्हणजे मग त्याला आपली प्रकृती गवसते... थोडक्यात तो जगाच्या केंद्रस्थानी असतो. जगापासून तो लपलेला असतो.

बेंजामिन यांनी एकोणिसाव्या शतकातले पॅरिस शहर आणि बोदलेर या दोघांविषयी एक प्रदीर्घ निबंध लिहिला आहे. या निबंधात 'भटक्या' ही मध्यवर्ती व्यक्तिरेखा आहे. शहरातले हमरस्ते, या रस्त्यावर दुतर्फा उभारलेल्या कमानी हेच त्या भटक्याचे घर असते. बेंजामिन यांच्या शब्दात सांगावयाचे झाल्यास "त्या डांबरी रस्त्यावरच भटक्याही फोफावतो. समाजाच्या सीमारेषांवर अथवा समाजात जी व्यक्ती उभी असते. त्या व्यक्तीला गर्दीत अनुभवावयास येणारी अनामिकता सुरक्षितता प्राप्त करून देते." या ठिकाणी 'भटक्या' या संकल्पनेत बोदलेर बरोबर बेंजामिन आपलाही समावेश करतात. बोदलेर यांनी एडवर्ड ॲलन पो या इंग्रज लेखकाच्या गुप्त पोलिसाच्या चातुर्याच्या कथाचे भाषांतर केलेले होते. या कथात खुनी अथवा त्याचे भक्ष्य ठरलेल्या व्यक्ती या दोघांच्यातही आपला व बोदलेर यांचा समावेश करतात.

परंतु भटक्याचे जे शहर होते, ते बेंजामिन यांच्या दृष्टीने विचार करता, बोदलेर यांना जे शहर अभिप्रेत होते, त्यापेक्षा ऐतिहासिकदृष्ट्या कितीतरी अधिक मर्यादित होते. पॅरिस या शहरात त्या काळी अशी परिस्थिती होती की त्या काळात पॅरिस शहरात 'भटक्या'ची उर्जितावस्था होती. या परिस्थितीचे वर्णन करताना असे म्हणता येईल, की त्या परिस्थितीत भटक्याची इच्छा असली तर त्याला सामील होता येत असे, नसली तर सामील न होण्याचेही स्वातंत्र्य होते. इतर दुसऱ्या शहरात तशी परिस्थिती नव्हती. उदा. लंडन आणि बर्लिन ही शहरे. या शहरातील 'भटक्या'ला सामील होणे वा न होणे असे पर्याय उपलब्ध

नव्हते. इतकेच नव्हे तर या कालखंडानंतरच्या काळातील पॅरिसमध्येही 'भटक्या' उर्जितावस्थेला आला नसता.

याचे कारण असे की सरकारी व सामाजिक नियंत्रणाचे जाळे असे काही विणण्यात आले होते की अनामिकतेत पळून जाणे,अशक्यप्राय झाले होते. या ठिकाणी बेंजामिन यांच्या या विधानाशी बोदलेर व बेरनान या दोघांचाही मतभेद आहे. या दोघांच्या मते, या उलट होस्समान (Haussmann) यांच्या संकल्पचित्रानुसार तयार झालेल्या बुलव्हयर्ड (महारस्ते) मुळे पॅरिस हे कमीत कमी नियंत्रण असलेले खुले पॅरिस शहर बनले होते. या खुलेपणामुळे सामाजिक बंधने आणि विभागामुळे निर्माण झालेली विभिन्नता कोसळून पडली होती. म्हणूनच पॅरिस हे शहर अधिक करून टक लावून पाहाण्याचा 'आधुनिक' परिसर अधिक प्रमाणात झाला होता. थोडक्यात तो भटक्याचा परिसर बनला होता.

एवंच 'भटक्या' हा आधुनिक हिरो आहे. 'गी' या चित्रकाराप्रमाणेच या 'भटक्या'चा अनुभव आहे. याचा अर्थ शहरात मुक्त संचार करून, दुसऱ्यांचे निरीक्षण करायचे आणि दुसऱ्याकडून आपले निरीक्षण होत आहे हे गृहित धरायचे, पण त्याचबरोबर कधीही दुसऱ्या कोणाबरोबर आदान-प्रदान करायचे नाही. अशा प्रकारचे स्वातंत्र्य या भटक्याला आहे. 'आधुनिकत्वा' संबधीचे जे वाङ्मय पाश्चिमात्य जगात उपलब्ध आहे, त्यात 'भटक्या' या संकल्पनेशी नाते असलेली आणखी एक संकल्पना आहे. अनोळखी (Stranger अनोळखी) या शब्दप्रयोगाने ती ओळखली जाते. कवी बोदलेर यांच्या एका गद्य काव्य संग्रहाचे नाव आहे. PARIS SPLEEN पारी स्प्लीन या काव्यसंग्रहातील एका रचनेचे नाव आहे लेट्राँजेर (L'etranger) अनोळखी. हे गद्यकाव्य एक छोटासाच संवाद आहे. त्यात या गूढ माणसाला (enigmatic man) एक प्रश्न विचारण्यात येतो. त्याचे कोणावर व कशावर प्रेम आहे? आपल्या पित्यावर, मातेवर, भगिनींवर का भावावर? आपले मित्र, आपला देश, सौंदर्य की सोने? या सर्व प्रश्नांना तो नकारार्थी उत्तरे देतो. जॉर्ज सिमेल या मानसशास्त्रज्ञाच्या दृष्टीने हा 'अनोळखी' माणूस कशातही गुंतलेला नसतो हे खरे. पण त्याला कोणाबद्दल व कशाबद्दलही ममत्व, आत्मियता नसते वा तो जखडलेला नसतो असेही नाही. या अनोळखी व्यक्तीचे वर्णन पुढीलप्रमाणे करता येईल. तो एखाद्या खास गटाचा नैसर्गिक असा (INORGANIC) विशिष्ट प्रकारचा सदस्य नसतो. परंतु एक नव्या भागात येऊन तेथे स्थिरस्थावर झाल्यानंतर, तो त्या गटाचा सदस्य बनतो.

हे या 'अनोळखी' माणसाचे वैशिष्ट्य आहे असे त्याचे वर्णन करता येईल. हा मनुष्य 'आज आला आणि उद्या राहील' असा आहे. या दृष्टिकोनातून विचार करता, तो भटक्या आणि बोदलेर यांना अभिप्रेत असलेल्या व्यक्तीपेक्षा खासच वेगळा आहे. या दोघांपैकी कोणीही एकाच जागी मुक्काम ठेवून स्थिरस्थावर होणार नाही, अथवा आपल्या अवती-भोवती जे कोणी असतील त्यांच्याशी संपर्कही साधणार नाहीत. हे सारे जरी खरे



अनुक्रमणिका

असले तरी सरतेशेवटी, समाजशास्त्रज्ञ सिमेल यांचा अनोळखी मनुष्य हा नेहमीच एक सुप्तावस्थेतील संभाव्य भटक्या (Potential wanderer) असतो एखाद्या ठिकाणी येणे, आणि तेथून प्रयाण करणे, ही जी त्याची मनोवृत्ती होती, तिला मागे टाकणे त्याला अजून तरी तितकेसे जमलेले नव्हते.

थोडक्यात 'आधुनिकतेचे' हे जे हिरो आहेत ते येथवर नमूद केल्याप्रमाणे पुढे उल्लेखिलेल्या गोष्टींत सहभागी असतात. उदा. फार दूरवरच्या प्रवासाची संभाव्यता व शक्यता, तोवर पाय घट्टपणे रोवून असलेल्या एखाद्या स्थानापासून स्वत:ला उखडून घेणे, नव्या जागी अगदी अनामिकपणे आगमन करणे. यासर्व गोष्टींचा त्या सहभागात समावेश आहे. परंतु महत्त्वाचा मुद्दा एकच, बोदलेर यांचा भटक्या व अनोळखी आणि सिमेल यांचा अनोळखी या सगळ्यात एकही स्त्री नव्हती. अर्थातच ते सर्व पुरुष होते.

**स्त्रिया आणि जाहीर स्थानातले (Public) जीवन**

रिचर्ड सेन्नेट या समाजशास्त्रज्ञाने आधुनिकतेवर जो ग्रंथ लिहिला आहे त्याचे नाव आहे 'दि फॉल ऑफ पब्लिक मॅन' या नावात व्यक्ती या शब्दाऐवजी पुरुष (Man) हा शब्द वापरण्यात आला आहे तो अपघात नाही– लेखकाचा पितृसत्ता समाजात कायम वावर असल्याकारणाने, शब्दांच्या अर्थाबद्दल कोणतीही काळजी न घेण्याची स्वाभाविक प्रवृत्ती असते. या शब्दाचा वापर ही त्या स्वाभाविक प्रवृत्तीचा आविष्कार नाही. भाषेच्या गैरवापराचे ते उदाहरण आहे, असेही म्हणता येणार नाही. हा शब्द लेखकाने वापरला आहे त्या मागे एकच कारण आहे.

हा ग्रंथ अठराव्या आणि त्या अगोदरच्या शतकात 'जाहीर स्थानी' जी व्यक्ती होती त्या संबंधात आहे. या 'व्यक्तींच्या मृत्यूचा आलेख या ग्रंथात चित्रित केलेला आहे. ही व्यक्ती आपला वेळ कॉफीहाऊसमध्ये मैफल जमवून गप्पा मारण्यात घालवीली. काही वेळा उगाचच रस्त्यावर भटकण्यात घालवीली. तर काही वेळा ती नाट्यगृहात असे. काही वेळा जाहीर ठिकाणी अनोळखी माणसाशी बोलत असे. या सर्व ठिकाणी हजर असलेली व्यक्ती ही 'पुरुषच' असे. म्हणून या ग्रंथाचे नाव आहे 'दि फॉल ऑफ पब्लिक मॅन' सेन्नेट यांनी असेही दाखवून दिले आहे, एखाद्या उद्यानात अथवा रस्त्यावरती अनोळखी स्त्रीबरोबर पुरुषाने बोलणे हे शिष्टसंमत होते. फक्त पुरुषाने याबाबत एक पथ्य पाळावयाचे असे. त्या स्त्रीने पुरुषाच्या संवादाला उत्तर दिले, तर मग पुरुषाने त्या स्त्रीच्या मनात, त्या पुरुषाच्या घरास तिला भेट देण्याची इच्छा आहे असे गृहित धरावयाचे नाही!

परंतु या ग्रंथात असे कोठेही सूचन नाही स्त्रियांना परक्या पुरुषाबरोबर बातचीत करण्यास परवानगी होती. युरोपमधील एकोणिसाव्या शतकातील शहर हे इत:पर जीवन जेथे जाहीर जगात व्यक्त करता येईल असे खुले मैदान उरलेच नव्हते. नेमक्या याच काळात भटक्याने समाज जीवनात अवतार घेतला. भटक्याचे निरीक्षण कोणीही करावे, त्याच्याशी

बातचीत मात्र करायची नाही. Privatization of personality– व्यक्तित्वाचे खाजगीकरण यात स्त्री व पुरुष या दोघांचा सहभाग असेलही. व्यक्तित्वाचे खाजगीकरण या शब्दप्रयोगाचा अर्थ, अत्यंत काळजीपूर्वक जपलेली अनामिकता आणि जाहीर जीवनातून काढून घेतलेले अंग जाहीर आणि खाजगी जीवन या दोहोंचे विभाजन करणारी जी सीमारेषा होती, ती दिवसेंदिवस अधिक स्वस्थपणे व काटेकोरपणे आखली जात होती.

याचा परिणाम एकच झाला. तो म्हणजे अधिक करून स्त्रिया या 'खाजगी जीवनात' लोटल्या गेल्या व तेथेच बंदिस्त झाल्या. या उलट पुरुषांनी मात्र गर्दीत मिसळण्याचे, कॉफी हाऊस आणि मद्यपानगृहात जाण्याचे आपले स्वातंत्र्य अबाधितपणे कायम ठेवून घेतले होते. युरोपमध्ये एकोणिसाव्या शतकाच्या अगोदरच्या काळात जी कॉफीहाऊसिस होती, त्यांच्या जागी आता पुरुषांचे क्लबज आले !

येथवर ज्या लेखकांचा उल्लेख केलेला आहे, ज्यांच्या लिखाणाची चर्चा करण्यात आली आहे त्यातल्या एकालाही, तत्कालीन आधुनिक शहरातील स्त्रियांचा जो वेगळा अनुभव होता त्याचे ज्ञान नव्हते असे नाही. उदा. सन्नेट यांनी आपल्या उपरोक्त ग्रंथात पुढील विधान केलेले आहे, "जाहीर अशा खाजगीत (Public privacy) निसटून जाण्याच्या हक्काचा उपभोग स्त्री व पुरुष या दोघांना सारख्याच प्रमाणात घेता येत नव्हता. याचे कारण एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस स्त्रियांनी पॅरिस शहरातील कॉफीगृहात एकट्याने जाणे शिष्टसंमत नव्हते." तीच गोष्ट लंडन या शहराची होती. सन्नेट यांना या तत्कालीन वस्तुस्थितीची चांगलीच जाण आहे. सन्नेट म्हणतात, एकाकी गर्दी (The Lonely crowd) खाजगीकरण झालेल्या स्वातंत्र्याच्या कक्षेत येत होती. या कक्षेत जाऊन पुरुष अधिक करून निसटून जाण्याचा प्रयत्न करीत असत. मग ते केवळ आपले प्रभुत्व व अधिकार दाखविण्यासाठी असेल, अथवा त्यांना निसटून जाणे या अवस्थेची अधिक आवश्यकता असेल. सन्नेट यांनी आणखीही एका गोष्टीची नोंद घेतली आहे.

एकोणिसाव्या शतकाच्या अगोदरच्या काळातील "जाहीर स्थानामधील जीवनात" स्त्रियांना आपण कशा प्रकारे पोषाख करतो याबद्दल फारच काळजी घ्यावी लागे. स्त्रियांनी आपण केलेल्या पोषाखातून तो कशाचे "प्रतीक वा चिन्ह" नसल्याचे सूचन त्यातून न होणे हे आवश्यक होते. स्त्रीचा पोषाख हा त्या स्त्रीचे सामाजिक स्थान प्रदर्शित करीत असे. त्यासाठी तिच्या पोषाखाची अगदी बारकाईने व तपशीलात जाऊन तपासणी होई. एकोणिसाव्या शतकानंतरच्या पाश्चिमात्य जगातील परिस्थिती ही थोडी वेगळी होती. त्या काळात स्त्रीच्या पोषाखाची तपासणी एका वेगळ्याच हेतूने होत असे. तिने केलेला पोषाख हा घरंदाज स्त्रीचा आहे की 'उठवळ' स्त्रीचा आहे हे जाणून घेण्यासाठी ती तपासणी होई. सिमेला या समाजशास्त्रज्ञाने मान्यवर ग्रंथ लिहिला नाही हे खरे आहे. पण त्यांनी अनेक चांगले समाजशास्त्रीय निबंध लिहिले आहेत. त्यांचा उपयोग येथवर साक्षेपाने करण्यात

आलेला आहे. त्यांनीही स्त्रियांच्या वर उल्लेखिलेल्या काळातील परिस्थितीकडे लक्ष वेधले आहे.

सिमेल यांनी 'स्त्रियांची परिस्थिती', 'स्त्रियांचे मानसशास्त्र', 'स्त्रीची संस्कृती', 'स्त्रियांच्या चळवळी आणि सामाजिक लोकशाही' या सारख्या अनेक विषयावर शोध-निबंध लिहिलेले आहेत. सिमेल यांचे एक वैशिष्ट्य मुद्दाम अधोरेखित करावयास हवे. युनिव्हर्सिटी ऑफ बर्लिन हे बर्लिन शहरातील एक विद्यापीठ. या विद्यापीठातील अभ्यासक्रमात समाविष्ट असलेल्या परिसंवादात स्त्रियांना स्नातक होण्यासाठी विद्यार्थी म्हणून प्रवेश नव्हता. तेथे त्यांना तसा प्रवेश फारच मागाहून मिळाला. पण त्या अगोदर कितीतरी वर्षे नॉर्ज सिमेल यांनी आपल्या वर्गात स्त्रियांना प्रवेश दिला होता. या घटनेच्या संदर्भात स्त्री-पुरुष या दोघांनाही बरोबरीचा मान देऊन वागविणारे ते पहिले प्राध्यापक व समाजशास्त्रज्ञ. आपण त्यासाठी त्यांना मानवंदना देऊया. बेरनान या समाजशास्त्रज्ञानेही वर उल्लेखिलेल्या स्त्रियासंबधीच्या दृष्टिकोनाबाबत सहमती दर्शविली आहे. ते तसे बरेच दिवस चांगलेच थांबून राहिले होते असे दिसते.

पण त्यानंतर का होईना, ते असे मान्य करतात की पुरुषांचा जो शहराबद्दल अनुभव असतो, त्यापेक्षा शहरांविषयीचा स्त्रियांचा अनुभव अगदी सर्वस्वी वेगळ्या पातळीवरचा असतो. बेरनान यांनी असे सुचविले आहे की जेन जेकबस या लेखक स्त्रीने 'दी डेथ अँन्ड लाईफ ऑफ ग्रेट अमेरिकन सिटिज'– (महान अमेरिकन नगरातील जीवन आणि मृत्यू, या ग्रंथात शहरासंबधी स्त्रियांचा जो दृष्टिकोन आहे. त्याचा पूर्ण आविष्कार झालेला आहे. हा ग्रंथ इ. स. १९६१ साली प्रसिद्ध झाला. या ग्रंथात लेखक स्त्री जेन जेकबस यांनी शहरातले आपले जे दैनंदिन जीवन आहे, आपले शेजारी दुकानदार आणि पौंगडावस्थेतील मुले आणि शहरात घाम गाळून होणारे श्रम – या सर्वच गोष्टींचे अगदी बारीक-सारीक तपशीलासहीत वर्णन केलेले आहे. बेरनान असे सांगतात की स्त्री व पुरुष दोघेही शहरातील जीवनात आपण सारेच सहभागी असतो. स्त्रियांना त्या जीवनाविषयी काहीतरी सांगायचे आहे. परंतु स्त्रियांना जे काही सांगावयाचे आहे त्याकडे आपण दुर्लक्ष केल्या कारणाने, आम्ही आमचे जीवन तसेच स्त्रियांचे जीवनही दरिद्री केले आहे.

खरा प्रश्न वेगळाच आहे. स्त्रियांचे जीवन जमेस न धरल्याकारणाने, त्याकडे दुर्लक्ष केल्या कारणाने आधुनिकतेसंबधी जे वाङ्मय आहे, त्याची संपन्नता कमी झालेली आहे. हा मुद्दा प्रथम लक्षात घेतला पाहिजे. आधुनिक जीवनाचा जो अनुभव आहे त्याच्या सारांशाला डँडी, भटक्या, हिरो आणि अनोळखी या सर्व प्रकाराच्या व्यक्ती द्वारा आवाहन केले जाते. परंतु या साऱ्या व्यक्ती पुरुष आहेत. इ. स. १८३१ साली जॉर्ज सँड या प्रख्यात फ्रेंच स्त्री कादंबरीकाराला पॅरिस मधील जीवनाचा अनुभव घेण्याची, आपल्या काळातील कला व कल्पना यांच्याबद्दल ज्ञान आणि शिक्षण घेण्याची इच्छा झाली. त्यावेळी तिने एखाद्या

मुलासारखा पोषाख केला व तो अनुभव घेतला. स्त्रियांना त्या स्वातंत्र्यात सहभागी होता येणार नाही हे तिला माहीत होते. ते स्वातंत्र्य स्वत: उपभोगण्यासाठी तिला या मार्गाचा अवलंब करावा लागला.

*"म्हणून मी माझ्या स्वत:साठी चांगल्या जाड्याभरड्या राखाडी रंगाच्या कापडाचा सैन्यातले अधिकारी घालतात तसा लांबलचक ओव्हर कोट शिवून घेतला. त्याच्याबरोबरच मॅच होईल, शोभून दिसेल अशी पँट व कोटही घेतला. राखाडी रंगाची हॅट आणि गळ्याभोवती मोठा थोरला रुमाल गुंडाळल्यानंतर मी कॉलेजमधला अगदी चांगला असा विद्यार्थी बनले : मी जे बूट घातले होते त्याने मला किती पराकोटीचा आनंद झाला होता; तो मला शब्दातून व्यक्तच करता येत नाही. माझा लहान भाऊ त्याला बुटाची पहिली जोडी मिळाली तेव्हा बूट पायावर तसेच ठेवून झोपत असे. तसेच मीही आनंदाने बूट पायावर ठेऊनच झोपले असते. या बुटाला छोटेसे नालही होते. मी बूट घालून रस्त्यावर चांगली पाय रोवून उभी होते. पॅरिसच्या या टोकापासून त्या टोकाकडे माझा संचार होता.*

*मी जणू जगालाच प्रदक्षिणा घालीत आहे असे मला वाटले आणि माझ्या कपड्याना तसे कशाचेच भय नव्हते. मी कसल्याही प्रकारच्या हवेत हुंदडत होते. मी घरी कोठच्याही वेळी परत येई. मी नाट्यगृहाच्या पिटातही बसले. माझ्याकडे कोणीही लक्ष दिले नाही. माझ्या वेषांतराबद्दल कोणालाही कल्पना आली नाही. मला कोणीही ओळखत नव्हते, कोणीही माझ्याकडे पाहिले नाही. कोणीही माझ्यातला दोष दाखविला नाही. मी त्या प्रचंड गर्दीत हरवलेल्या एका अणूवत होते."*

'भटकी स्त्री' ही सामाजिक भूमिका आस्तित्वात नव्हती. म्हणूनच शहरात स्त्रियांनी एकट्याने कधीच भटकायचे नसे. याचा परिणाम असा झाला की ती एक भटकी ही भूमिका पत्करता आली नसती. हे तिला चांगले ठाऊक होते. या वेषांतरामुळे भटक्याचे जीवन तिला उपलब्ध झाले.

बोदलेर यांच्या निबंधात आणि कवितांत स्त्रिया वारंवार येताना दिसतात. शहरात राहाणाऱ्या स्त्रियांतही आधुनिकतेने कितीतरी प्रकार निर्माण केले होते. तसेच आधुनिकतेमुळे त्या स्त्रिया लोकांच्या नजरेस पडतील अशी व्यवस्थाही केलेली होती. या अनेक प्रकारच्या स्त्रियांत वेश्या, विधवा, वृद्धा, समलिंगी संभोग घेणाऱ्या (लेसबियन) आणि खुनाचे भक्ष्य ठरलेल्या स्त्रियांना फारंच प्रामुख्याने स्थान मिळाले असते. बोदलेर यांच्या दृष्टिकोनानुसार लेसबियन स्त्री ही आधुनिकतेची नायिका होती; असे बेंजामिन यांचे मत आहे. बोदलेर यांचा 'लेफ्लर ड्यू माल' या नावाचा काव्यसंग्रह प्रसिद्ध आहे. या संग्रहाला मुळात ले लेसबियन असे नाव देण्याची इच्छा होती हे सर्वच जाणकारांना निश्चितपणे चांगलेच माहीत आहे. बेंजामिन यांनी आणखी एका मुद्याकडे आपले लक्ष वेधले आहे. लेसबियन या विषयावरील कवितांतील महत्त्वाच्या कवितेच नाव आहे 'डेलाफिन ए दिप्पोप्लीर' या कवितेचा शेवट

लेसबियन स्त्रिया 'दु:खदायक असे भक्ष्य' असे सांगून त्यांचा निषेध करून, त्यांची रवानगी नरकात केलेली आहे.

बोदलेर यांच्या 'क्रेपुसुल ड्यू सुआर' या कवितेचा विषय वेश्या आहे. 'दि पेंटर्स ऑफ मॉर्डन लाईफ' या निबंधाच्या एका विभागात वेश्या या विषयाची चर्चा आहे. या दोन्हीही ठिकाणी बोदलेर यांचा दृष्टिकोन तसा दोलायमान व संदिग्ध आहे. एकीकडे त्यांना वेश्यांचे कौतुक आहे पण त्याचबरोबर त्यांच्याबद्दल ते घृणाही व्यक्त करतात. वेश्येची तुलना मुंग्याच्या वारुळाबरोबर आणि माणसाचे अन्न चोरणाऱ्या किड्याबरोबरही केलेली आहे. परंतु समाजाच्या मध्यभागी नसून काठावर उभ्या असलेल्या स्त्रिया उदा. वृद्धा आणि विधवा यांच्याबद्दलची बोदलेर यांची कणव अधिक नि:संदिग्ध आहे. वृद्धा ही पित्याप्रमाणे दुरूनच हळुवारपणे नजर ठेवते. विधवेचा अभिमान, दु:ख आणि दारिद्र्य यांचे बोदलेर संवेदनाक्षमतेने निरीक्षण करतात. परंतु या कवितांतून भेटणारी एखादी स्त्री कवीला बरोबरीच्या नात्याने भेटत नाही. कवीच्या टक लावून पाहाण्याचा त्या स्त्रिया या केवळ एक विषय आहेत. तो जी 'मशागत' करीत असतो त्यासाठी त्याचे त्या लक्ष्य आहेत. बोदलेर यांची 'आयून' पासान्ते शीर्षकाची कविता आहे. या कवितेत ज्या स्त्रिया समाजव्यवस्थेत काठावर नाहीत आणि ज्यांचे पतन झालेले नाही, अशा स्त्रियांपैकी एका स्त्रीचे वर्णन आहे. या ठिकाणी कवी स्त्री या विषयाबरोबर प्रत्यक्ष मुकावला करताना आढळतो. परंतु या कवितेत आलेल्या स्त्रीचा एक विशेष आहे, तो म्हणजे ही स्त्री सुतकात असल्याने दु:खमग्न आहे. ही उंचनींच भव्य व्यक्तित्वाची स्त्री एका रस्त्यावर कवीच्या अंगावरून जाते. ही स्त्री आपल्या मार्गाने पुढे जात असताना कवीची आणि तिची क्षणिक अशी दृष्टिभेट होते. कवी जागच्या जागीच असतो. तो काहीही हालचाल करीत नाही. फक्त एकच प्रश्न विचारण्यासाठी, 'एक दोन वर्षात नाही निदान कल्पांतात तरी आपली भेट होईल का?' या स्त्रीने कवीच्या टक लावून पाहाण्याला प्रतिसाद दिला होता यावर कवितेच्या अखेरच्या चरणात शिक्कामोर्तब करण्यात आले आहे.

बेंजामिन यांनी या कवितेचा अन्वयार्थ सांगून त्यावर पुढील भाष्य केले आहे. "या निसटत्या मुकावल्यात जे गुंगारा देणे अनुस्युत आहे, तेच बोदलेर यांना विलोभनीय वाटते. "प्रथमदर्शनी प्रेम यात शहरी नागरिकाला जितका आनंद होतो, त्यापेक्षा कितीतरी अधिक आनंद हे दर्शन शेवटचेच ठरेल या विचारातून होतो" धक्का या अवस्थेत खास करून जी अवस्था असते असे म्हणता येईल त्या वर्गात कवी व त्या स्त्रीची भेट यांची गणना करावी लागेल. परंतु या ठिकाणी एका मुद्याची विशेष करून नोंद घ्यावयास हवी. शहरी अनुभवात स्त्री सहभागी होते, याचे हे अपवादात जमा होणारे उदाहरण. आपणास आणखी एक प्रश्न उपस्थित करता येईल. एका अनोळखी माणसाच्या टक लावून पाहाण्याशी इ. स. १८५० मधील घरंदाज युरोपीय स्त्रीने दृष्टभेट केली असती का?

ते काहीही असो. त्या काळी एक गोष्ट गृहितच धरण्यात येत होती. ती म्हणजे ज्या स्त्रिया 'जाहीर' जीवनात सहभागी होतात, त्या कोणत्या ना कोणत्या प्रकारे पुरुषी प्रवृत्ती प्रकट करतात. एका विधवेचे बोदलेर यांनी निरीक्षण केले व त्याच्याबद्दल लिहिले. तिचे वर्णन करताना ते असे सांगतात की एखाद्या पुरुषी व्यक्तित्वात असलेल्या वागणुकीचा ढंग त्या स्त्रीचा होता. बोदलेर यांना लेसवियन स्त्रियांबद्दल व्यामिश्र कौतुक आहे. बेंजामिन या संबंधी लिहिताना सांगतात की त्या लेसबियन स्त्रीमध्ये तथाकथित पुरुषत्व असते, त्याचे ते कौतुक आहे. बेंजामिन यांनी स्पष्टीकरण देताना पुढील वस्तुस्थिती नमूद केली आहे.

एकोणिसाव्या शतकात युरोपीयन स्त्रीला कारखान्यात काम करण्यासाठी जावेच लागत होते. कालांतराने या स्त्रियांत पुरुषी वागणुकीचा ढंग व प्रवृत्ती दिसून येणेही क्रमप्राप्त होते. रिचर्ड सन्नेट यांनी याच प्रकारचे प्रतिपादन केले आहे. परंतु त्यासाठी ते काहीही पुरावा देत नाहीत. खरे म्हणजे लिंगविचार लक्षात घेऊन त्यावर आधारित अशा विद्यमान दृष्टिकोनाचा फायदा त्यांना घेता आला असता. पण ते त्याकडे दुर्लक्ष करतात. रिचर्ड यांनी आपण जे प्रतिपादन करीत आहोत, त्याच्या समर्थनार्थ पुढील युक्तिवाद केला आहे. ते म्हणतात, "एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीला स्त्रियांची मुक्ती व्हावी या ध्येयाशी ज्यांची बांधिलकी होती अशा स्त्रिया पुरुषांप्रमाणे पोषाख करू लागल्या आणि ज्या शारीरिक हालचालींना 'पुरुषी' म्हणता येईल अशा प्रकारचे शारीरिक हावभाव विकसित केले गेले."

परंतु त्या 'पुरुषी' जगात ज्या स्त्रिया समाजाच्या रंगमंचावर लोकांना दिसू लागल्या होता, अशा स्त्रियांना जी मान्यता प्राप्त झाली त्याचे एक कारण होते. ते म्हणजे त्या पुरुषी जगातून स्त्रीला हद्दपार करण्यात आले होते या वस्तुस्थितीला गोळाबेरजेने दिलेली ती मान्यता होती. याबद्दल एकच असा आक्षेप घेता येईल की ही मान्यता अस्थानी होती. या संदर्भात बोदलेर यांचा स्त्रियांबद्दल जो सर्वसामान्य दृष्टिकोन होता, तो त्यांच्या गद्य लिखाणातून आणि पत्रांतून व्यक्त झालेला आहे. शहरातील स्त्रियांबद्दल त्यांना जबरदस्त आकर्षण होते. या विषयाचा त्यांचा काव्यात्मक आविष्कार आपणास वाचावयास मिळतो.

बोदलेर यांचा स्त्रियांबद्दलचा दृष्टिकोन आहे तो त्या संदर्भात मोठा उद्बोधक आहे बोदलेर यांनी एका स्त्रीचे उदात्तीकरण करून तिला देवघरात नेऊन ठेवली होती. त्यांनी त्या स्त्रीला जे पत्र लिहिलेले आहे, त्यात त्यांनी दिलेली कबुली लक्षणीय अशीच आहे. बोदलेर म्हणतात, "माझे स्त्रियांबद्दलचे पूर्वग्रह त्याबद्दल द्रेष वाटावा असेच आहेत. वस्तुतः माझी कशावरच श्रद्धा नाही. तुझा आत्मा फार छान आहे. पण सरतेशेवटी तो एक स्त्रीचा आत्मा आहे." बोदलेर यांच्या 'दी पेंटर ऑफ मॉर्डन लाईफ' या ग्रंथात स्त्री ही न- व्यक्ती (non person) आहे असे सांगून तिची भलावण करण्यात आलेली आहे. बोदलेर म्हणतात –

*"सर्वसामान्यपणे कलावंतासाठी आणि खास करून मॉसिए गी* (GUYI) *यांच्या दृष्टीने स्त्रीचे वर्णन एका वाक्यातच करता येईल. स्त्री ही पुरुषाची स्त्री यापेक्षा कितीतरी अधिक*



अनुक्रमणिका

*आहे. ती देवता आहे, आकाशातला तारा आहे. पुरुषाच्या मेंदूतील सर्व कल्पनांबाबत ती अध्यक्षपदी असते, ती सर्व सुखद गुणांचा एक चमचमणारा सुसंवादी समूह आहे. एकाच देहात हे सारे गुण एकवटलेले आहेत. जीवनाबद्दल जो कोणी चिंतन करतो, त्याला जीवनाचे जे चित्र आहे त्याकडून दोन गोष्टी बहाल केल्या जातात. स्त्रीही आपणावर अगदी लक्ष एकवटून केल्या गेलेल्या कौतुकाचे आणि कुतूहलाचे केंद्र आहे. ती एक प्रकारची देवता-मूर्ती आहे. कदाचित मूर्ख असेल. परंतु ती डोळ्यांचे पारणे फेडणारी, आपले गारुड पसरणारी खासच आहे. ती आपल्या एका नेत्रकटाक्षाच्या जोरावर व्यक्तीचे भविष्य अधांतरी ठेवते आणि त्या व्यक्तीच्या इच्छा आपल्या कवेत पकडून ठेवते. स्त्रिला जे जे काही सुशोभित करते, तिचे सौंदर्य खुलावे यासाठी ज्या ज्या गोष्टीचा तिला उपयोग होतो, या सर्वच गोष्टी स्त्रिचाच एक भाग आहेत. या अशा गूढ सजीव प्राण्याचा ज्या कलावंतांनी खास अभ्यास केला आहे, ते एकच गोष्ट करतात.*

एखादी सुंदर स्त्री पाहिल्यानंतर, त्यापासून होणारा जो आनंद व सुख आहे, त्याचे चित्रण व रेखाटन करण्यासाठी एखादा कवी बसला, तर मग ती स्त्री आणि तिने घातलेला देखणा पोषाख, या दोन गोष्टी अलग करण्याची हिंमत तो कशी दाखवील! साहित्यसृष्टीतील स्त्रीद्रेष्ट्या पुरुषाची परंपरागतपणे मान्य झालेली एक प्रतिमा आहे. ही प्रतिमा तशी दुहेरी आहे. एकीकडे स्त्रीचे उदात्तीकरण करीत असताना तिच्यात काही अर्थ नाही असे म्हणायचे, वस्तुस्थितीत प्रत्यक्ष हजर आहे आणि संवेदनाक्षम आहे असे म्हणत असताना ती घृणास्पद आहे असे सांगायचे. या अशा प्रकारच्या सर्व विचारांचे प्रदर्शन बोदलेर यांनी आपल्या लिखाणात केलेले आहे. या लेखात केलेल्या सर्व विधानांना बोदलेर यांचे चरित्रकारसुद्धा पुष्टी देतात.

परंतु या सर्वांचा संबंध एका गोष्टीशी आहे. आधुनिकता ही संकल्पना स्पष्ट करण्यासाठी त्यावर भाष्य करण्यासाठी वाङ्मयात प्रयत्न जरूर झाले आहेत. त्याचे आपण अवलोकन करतो. बोदलेर यांच्या साहित्यात विशिष्ट ठरावी अशी स्त्रियांची संख्या मिरवणुकीने आपणासमोर खडी आहे; त्याचीही दखल आपण घेतो. बोदलेर यांनी ही जी स्पष्टीकरणे दिली, भाष्ये केले, स्त्री या विषयाबद्दल शाब्दिक रेखाटने केली, त्या सर्वांचा संबंध आधुनिकता या विषयाच्या वाङ्मयाशी जरूर आहे. परंतु बोदलेर या लेखकाव्यतिरिक्त दुसऱ्या अनेकांच्या लिखाणाचाही उल्लेख येऊन गेला आहे. हे सर्वच लेखक स्त्री द्वेष्टे नव्हते. याउलट ते सर्व लेखक स्त्री मुक्ती प्रत्यक्षात यावी. समाजात स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीने स्थान प्राप्त व्हावे, अशी इच्छा करणारे आणि तत्कालीन समाजात स्त्रियांची जी विशिष्ट परिस्थिती होती, त्याविषयी सहानुभूती बाळगणारे लेखक होते.

या सर्वच विरोधाभासी वस्तुस्थितीचे स्पष्टीकरण तीन प्रकारे येईल. (१) समाजशास्त्रीय अशी जी तपासणी व संशोधन झाले त्याची प्रकृती नेमकी कोणत्या प्रकारची होती. (२)

याचा परिणाम 'आधुनिकत्वा'बद्दलच्या संकल्पनेवर झाला. ती मग काहीशी अधुरीच राहिली. (३) स्त्रियांचे समाजात जे स्थान होते, त्याबद्दलची वस्तुस्थिती. या सर्वच मुद्यांबाबत अलीकडच्या स्त्री– मुक्तीवादी समाजशास्त्रज्ञ आणि इतिहासकार या दोघांत खूपच चर्चा झालेली आहे. परंतु विवेचनाच्या या स्थळी, आधुनिकतेच्या प्रश्नाच्या विशिष्ट संदर्भात, या सर्वच चर्चेची नव्याने उजळणी करणे वाजवी ठरेल. 'आधुनिकत्व' या विषयासंबंधीच्या वाङ्मयात स्त्री अदृश्य असणे.

एकोणिसाव्या शतकात समाजशास्त्र या ज्ञानशाखेचा उदय व विकास झाला. पाश्चिमात्य औद्योगिक समाजात 'जाहीर' आणि 'खाजगी' गोष्टी कोणत्या यांच्यातले अंतर दिवसेंदिवस रुंदावत जात होते. समाज– शास्त्राचा उद्‌गम व विकास या विभाजनाशी चांगलाच संलग्न आहे. कारखाने आणि कचेऱ्या यांच्या विकासाबरोबर कामाची जागा आणि घर या दोहोंत फारकत झाली. 'खाजगी' आणि 'जाहीर' असे. विभाजन होण्यामागचे ते एक प्रमुख कारण होते. इ. स. १८५० सालच्या सुमारास 'जाहीर' आणि 'खाजगी' या फारकतीमुळे बहुतेक प्रमुख शहरातून लोकसंख्येचे स्थलांतर उपनगरात झाले. उदा. इंग्लंडमधील औद्योगिक शहरे मँचेस्टर आणि बर्मिंगहॅम. कायद्याच्या बाबतीत आर्थिक किंवा अन्य प्रकारे स्त्रिया पुरुषांच्या बरोबरीने कधीही 'जाहीर' कार्यक्षेत्रात सामिल झालेल्या नव्हत्या हे खरे आहे.

परंतु 'जाहीर' आणि 'खाजगी' यात कामाची जागा व घर अशी भौगोलिक फारकत झाल्याकारणाने आजवर जो धंदा कौटुंबिक समजला जात होता, ज्यात स्त्रिया अत्यंत घनिष्टपणे संलग्न होत्या आणि त्यांची त्यातली मानसिक व शारीरिक गुंतवणूकही महत्त्वाची होती. मग हा कौटुंबिक व्यवसाय हा व्यापार असेल, वस्तूंचे उत्पादन करणे असेल, अथवा कोणत्याही स्वरूपाचे व्यावसायिक काम असेल या सर्वात स्त्रियांचा सहभाग हा नेहमीच महत्त्वाचा होता. घर आणि त्याच्या अनुषंगाने येणारे चूल आणि मूल या क्षेत्रात स्त्रिया हळूहळू बंदिस्त होत गेल्या.

उपनगरात लोकवस्तीचे हळूहळू स्थलांतर होत होते, त्या कारणाने 'खाजगी' व 'जाहीर' ही कार्यक्षेत्रे हे नेहमीच व कायमचीच वेगळी असली पाहिजेत या विचारसरणीच्या पुरस्काराला फारच जोरदार टेकू मिळाला. हे सारे होत होते, त्यावेळी एक नवे 'जाहीर' जग तयार होण्याची प्रक्रिया वेगाने चालू होती. या 'जाहीर' जगात व्यावसायिक व धंदेवाइंक संघटना, राजकीय आणि आर्थिक प्रस्थापित अशा संस्था, सामाजिक व सांस्कृतिक संस्था या सर्वांचा समावेश होता. या सर्वच संस्था या जवळजवळ नेहमीच पुरुषी संस्था होत्या. याचा अर्थ या संस्थातून स्त्रियांना हद्दपार केले होते असा नाही. काही नाममात्र गोष्टींसाठी स्त्रियांना सहभागी जरूर करून घेण्यात येत असे.

उदा. काही विशिष्ट समारंभात स्त्रियांना पाहुणे म्हणून पण त्यांचा त्या समारंभात सहभाग कमीत कमी असेल अशा प्रकारे त्यांना सामील जरूर करून घेण्यात येत असे; अथवा

त्यांना काही वेळा मानद सदस्य म्हणूनही स्वीकारले जाई. इ. स. १८५० ते इ. स. १९०० या कालखंडात ज्या व्यावसायिकांच्या व धंदेवाईकांच्या संस्था वाढतच होत्या. त्यांचे कार्यक्षेत्रही झपाट्याने विस्तारत होते. परंतु स्त्रियांना त्यातून खड्यासारखे वगळण्यात आले होते. गंमत अशी आहे की यातल्या काही धंद्यात उदा. वैद्यक– स्त्रिया परंपरागतपणे नेहमीच सहभागी झालेल्या होत्या. या धंद्यातूनही त्यांना वगळण्यात आले होते. मग परंपरागतपणे ज्या व्यवसायांतून त्यांना वगळण्यात आले होते, त्या व्यवसायाबद्दल काही सांगावयासच नको. उदा. कायदा आणि उच्च शिक्षण (academy). या काळात काही नवे व्यवसाय व धंदे निर्माण झाले होते.

उदा. कलाशिक्षण. त्यातून स्त्रिया वगळल्या जाणे हेही क्रमप्राप्तच होते. समाजशास्त्र एक नवी ज्ञानशाखा म्हणून सिद्ध होत असताना, त्यात दोन गोष्टी गृहित धरल्या गेल्या होत्या. (१) या ज्ञानशाखेवर पुरुषांचे प्रभुत्व व नियंत्रण राहाणार होते. (२) श्रम करणारांचे जे जगत होते, त्यांच्याशीच या ज्ञानशाखेला कर्तव्य होते. म्हणूनच समाजशास्त्र या विषयातले जे अक्षर (classical) ग्रंथ समजले जातात त्यात स्त्रिया आढळतात. त्या फक्त एकाच संदर्भात त्यांचा पुरुषांशी संपर्क येतो त्याचवेळी उदा. कुटुंबात, कौटुंबिक बाबतीत अथवा 'जाहीर' क्षेत्रात लहानशा भूमिका पार पाडताना, मॅक्स वेबर या प्रख्यात जर्मन समाजशास्त्रज्ञाचा 'दि प्रॉटेस्टंट एथिक अँड दि स्पिरीट ऑफ कॅपिटॅलिझम' हा विश्वविख्यात ग्रंथ समाजशास्त्रीय वाङ्मयात अक्षर स्वरूपाचा ग्रंथ समजला जातो.

डेव्हिड मॉर्गन या विद्यमान समाजशास्त्रज्ञाने त्यावर पुढील मत नोंदविलेले आहे. ते म्हणतात अगदी "अलिकडच्या काळाचा विचार करता, अनेक लोकांच्या दृष्टीतून एक गोष्ट खासच निसटली नसणार. ती गोष्ट मॅक्स वेबर यांच्या या ग्रंथात उद्धृत केलेल्या विशिष्ट इतिहासात, स्त्रियांना विशेष करून फारच नजरेआड ठेवण्यात आलेले आहे. या ग्रंथात हिरोच्या भूमिकेत फ्रॅंकलीन, लुथर, कालाव्हिन, बॅक्स्टर, आणि वेस्लो आहेत – हे सारे पुरुषच आहेत. स्त्रिया या रंगमंचावर प्रवेश करतात तो कशाप्रकारे? जर्मनीतील कारखान्यात काम करणाऱ्या स्त्रिया म्हणून, पण परंपरागतपणे 'श्रम' या गोष्टीबद्दलचा जो दृष्टिकोन तो घेऊनच हा त्यांचा प्रवेश होतो. पण तोही क्षणमात्रच असतो, हेही लक्षात ठेवले पाहिजे.

खाजगी व जाहीर अशी कार्यक्षेत्रांची विभागणी ही तशी अपुरीच प्रक्रिया होती. याचे कारण अनेक स्त्रियांना उदरभरणासाठी जे पैसे लागतात ते मिळविण्यासाठी अजूनही घराबाहेर कामवर जावेच लागत होते. अर्थात या कामावर जाणाऱ्या स्त्रियांतील बहुसंख्य स्त्रिया या कोणाच्यातरी मोलकरणीचे काम करीत असत हेही खरे. तथापि परंपरागत समाजशास्त्रीय लिखाणातून, ग्रंथांतून, कारखान्यात, गिरण्यांत, शाळांत आणि कचेरीत काम करणाऱ्या स्त्रिया आढळत नाहीत. परंतु ज्या स्त्रिया जाहीर संस्थांतून काम करीत असत त्यांची दखल जरूर घेतली जाई. एकतर अशा स्त्रियांची संख्या फारच कमी होती, म्हणूनच



अनुक्रमणिका

त्यांची दखल घेण्यासारखे जे प्रसंग होते तेही थोडेच. पण या स्त्रियांना तत्कालीन समाज-शास्त्रीय विश्लेषकांनी अत्यंत महत्त्वाचे स्थान दिलेले आहे.

याचा आणखी एक अर्थ होतो. तो म्हणजे हा जो 'आधुनिकत्वा'बद्दलचा विशिष्ट अनुभव होता; त्याची बरोबरी जाहीर कार्यक्षेत्रातील अनुभवाबरोबर करण्यात येत होती. शहरांची वाढ व विस्तार तर झपाट्याने होत होता आणि श्रीमंत व अति गरीब, हे दोन्हीही गट एकमेकांना जणू चिटकूनच राहात होते. हे वास्तव धक्कादायक होतेच. फ्रेडरिक एंगल्स यांनी याबद्दल विस्ताराने व भरपूर पुरावा देऊन लिखाण केलेले आहे. काही शहरांतून हे वास्तव अस्तित्वात येऊ नये यासाठी जरूर काळजी घेतली जात होती.

काहीवेळा उपनगरांची निर्मिती होऊन या वास्तवातील दाहकता कमी होई. जाहीर जीवनात, जो कोणत्याही प्रकारची वैयक्तिक बांधिलकी नसलेला, क्षणभंगुर असा मानवी संबंध येई त्याचेही नाविन्य होते. या सर्व गोष्टींनी 'आधुनिकता' या विषयासंबंधी लिहिणारे जे लेखक होते, त्यांना भुरळ पडली होती. तसेच त्यांना या सर्व घडामोडींबाबत कर्तव्यही होते. या लेखकात,'आधुनिकता' या विषयावर लिहिणारे लेखक, समाजशास्त्रज्ञ आपल्या निरीक्षणांना भरपूर पुरावा देऊन लेखन करणारे शोध-निबंधकार, समाजातील घडामोडींचे विश्लेषक, वाङ्मयीन साहित्यातील गद्य व काव्य रचणारे लेखक, या सर्व प्रकारच्या लेखकांचा समावेश आहे. हे समाजजीवनात जे परिवर्तन होत होते, त्याचा परिणाम अर्थातच सर्वांवर होत होता. याला व्यक्तीचे लिंग आणि तिचे सामाजिक वर्ग रचनेतील स्थान यांचा अपवाद नव्हता. याचा अर्थ असा नाही की प्रत्येक व्यक्तीची या परिवर्तनासंबंधीची जी प्रतिक्रिया होती ती एकछापी होती.

व्यक्तीचे लिंग आणि तिचे वर्गीय स्थान यानुसार ती प्रतिक्रिया बदलत होती. इतकेच नव्हे तर वेगवेगळे सामाजिक गट फारच भिन्न प्रकारे आपली प्रतिक्रिया नोंदवीत. परंतु आधुनिकत्वासंबंधीचे जे वाङ्मय आहे, त्याचे 'खाजगी' क्षेत्राकडे पूर्णत: दुर्लक्ष झाले आहे. म्हणूनच स्त्रियांच्या दृष्टीने प्राथमिक महत्त्वाचे असे जे तत्कालीन कार्यक्षेत्र होते, त्यासंबंधी या वाङ्मयात मुग्धता आढळते. ही जी मुग्धता आढळते, ती तत्कालीन स्त्रियांचे जीवन समजावून घेण्याच्या दृष्टीने अनेक प्रकारे अपायकारक आहे. इतकेच नव्हे तर पुरुषांच्या जीवनातील अत्यंत महत्त्वाचा निर्णायक असा भागही त्यामुळे काळोखात जातो.

एकतर पुरुषांच्या अनुभवातील फक्त एकाच महत्त्वाच्या भागावर लक्ष केंद्रित झालेले असते. त्यातून निष्कर्ष काढून समाजशास्त्रीय स्वरूपाची अनुमाने बसविली जातात. त्याचबरोबर आणखी एका त्रुटीचा उल्लेख करता येईल. तो म्हणजे 'जाहीर' आणि 'खाजगी' या दोन कार्यक्षेत्रांचे परस्परांशी संबंध काय होते, याचा शोध घेण्यात तत्कालीन समाज-शास्त्रज्ञ अयशस्वी ठरले आहेत. एकतर पुरुषांचा वावर 'खाजगी' व 'जाहीर' या दोन्ही क्षेत्रात होता. इतकेच नव्हे, तर जाहीर संस्था व कार्य यांचा अर्थ एकच होता. तो म्हणजे

विशिष्ट संस्थाचा संच आणि विशिष्ट चालचालणूक व पद्धती यांचाच फक्त समावेश करून जे काही 'जाहीर' समजले जाई त्याची संरचना करायची. हे करण्यासाठी एक गोष्ट गृहित धरणे आवश्यक होते. ती म्हणजे, जीवनातली 'जाहीर' व्यतिरिक्त इतर जी क्षेत्रे होती, त्याची रवानगी जे अदृश्य आहे, अशा खाजगी रिंगणात करावयाची. हे सारे आधारभूत करूनच 'जाहीर' व खाजगी ही विभागणी करण्यात आली होती.

आधुनिकत्वासंबंधी जे तत्कालीन वाङ्‌मय आहे त्याला आणखी एका रोगाची बाधा झाली होती. ही बाधा जवळजवळ सर्वच तत्कालीन समाजशास्त्रीय वाङ्‌मयाला झालेली होती. अलीकडच्या काळात या रोगाचे वर्णन 'जाहीर' क्षेत्राचे फाजिल सामाजिकीकरण असे करण्यात आलेले आहे. 'आधुनिकत्वा'संबंधी तत्कालीन लेखकांचा जो दृष्टिकोन आहे तो तसा तिरपाकडाच आहे. त्यामुळेच 'जाहीर' क्षेत्रात स्त्रियांचे पुरुषांबरोबर जे सामाजिक संबंध होते त्याच्या अनुषंगाने वाङ्‌मयात स्त्रीबद्दलचा आविष्कार होतो. आणखीही एका मार्गाने तो होतो. पुरुषांच्या राखीव रिंगणात स्त्रिया आपल्या उपलब्ध असलेल्या अवैध अथवा चक्रम मार्गांनी प्रवेश करताना दिसतात. एवंच ह्या वेश्या, विधवा आणि खुनाचे भक्ष्य या स्वरूपात त्या पुरुषी रिंगणात प्रकट होतात.

इ. स. १८५० नंतरच्या काळात पाश्चिमात्य जगातील स्त्रियांची खरीखुरी परिस्थिनी केवळ घरात बंदिस्त होऊन पडलेली स्त्री, या सरळसोट विधानात जे अभिप्रेत आहे, त्यापेक्षा कितीतरी अधिक गुंतागुंतीची बनली होती. प्रत्येक सामाजिक वर्गानुसार या परिस्थितीत फरक पडत असे. इतकेच नव्हे, एखाद्या देशाच्या एका विभागात जी परिस्थिती होती, ती त्याच देशाच्या दुसऱ्या विभागात असेच असे नाही. थोडक्यात सांगावयाचे झाल्यास देशाच्या एखाद्या विभागातील औद्योगिकरण आणि त्याबरोबरचे इतर घटक, यावर स्त्रियांची खरीखुरी परिस्थिती अवलंबून होती.

भटक्याचे एकाकी आणि स्वतंत्र जीवन स्त्रियांना अगदी मुक्तपणे उपलब्ध नव्हते हे खरे आहे. पण अनेक मार्गांचा उपयोग करून स्त्रिया जाहीर क्षेत्रात क्रियाशील होत्या आणि तत्कालीन समाजाने त्यांच्याकडे आवर्जून लक्ष द्यावे, इतक्या त्या दृष्य होत्या, हेही अगदी स्पष्टपणे दिसून येते. सत्रेट या समाजाशास्त्रज्ञाचा उल्लेख या पूर्वी येऊन गेलाच आह आपल्या लिखाणात त्यांनी स्त्रियांनी आपला पोषाख किती काळजीपूर्वक लक्ष देऊन केला पाहिजे याकडे वाचकाचे लक्ष वेधले आहे. खरे म्हणजे प्रख्यात अमेरिकन समाजशास्त्रज्ञ थोरस्टाईन व्हेब्लेन यांनी आपल्या 'लिझर क्लास' या प्रख्यात समाजशास्त्रीय ग्रंथात या मुद्याचा उल्लेख कितीतरी अगोदरच केलेला आहे. व्हेब्लेन म्हणतात—

*"घरातील प्रमुख 'स्त्री' हा हुद्दा ज्या स्त्रीपाशी असतो, ती स्त्री आर्थिक विकासाच्या वाटचालीत, घराच्या प्रमुखाची प्रतिनिधी या नात्याने एक प्रमुख ग्राहक बनते. हाच दृष्टिकोन नजरेसमोर ठेवून त्या स्त्रीच्या पोषाखाचे संकल्पचित्र तयार करण्यात आले होते. ज्या श्रमातून*

*उघडपणे उपयुक्त अशी निर्मिती होते, ते श्रम एका विशिष्ट पातळीवरच्या वंदनीय अशा घरंदाज स्त्रीला कमीपणा आणणारे होते. त्या अर्थाने ते कनिष्ठ पातळीवरचे समजले जात. हा मुद्दा लक्षात घेऊन घरंदाज स्त्रीच्या पोषाखाचे संकल्पचित्र तयार करण्यासाठी खास कष्ट घेण्यात आले होते. या संकल्पचित्रानुसार तयार केलेला पोषाख घालणारी स्त्री उपयुक्त काम कधीही करीत नाही. हाच मुद्दा त्या घरंदाज स्त्रीकडे पाहाणाऱ्या व्यक्तीच्या मनावर ठसविण्याचा हेतू तो पोषाख तयार करण्यामागे होता.''*

या ठिकाणी स्त्रीचे जे विशेष असे प्रकटीकरण झालेले आहे, ते तिच्या पतीच्या सामाजिक स्थानाचा निर्देष ज्यायोगे होईल असेच आहे: 'ग्राहक' या तिच्या महत्त्वाच्या सामाजिक भूमिकेवर त्यात भर देण्यात आलेला आहे. व्हेब्लेन म्हणतात,

*''आर्थिक विकासाच्या या पायरीवरही अजूनही स्त्रिया सर्व अर्थाने पुरुषाची मालमत्ता असतात. सर्व समाजाच्या नजरेत भरेल असा मोकळा वेळ आणि अनेक वस्तूंची खरेदी करणे, या दोन्ही गोष्टी लक्षात घेऊन स्त्रियांनी पार पाडलेल्या सामाजिक भूमिका, ह्या त्यांनी जी सेवा केलीच पहिजे त्याचा भाग होत्या. स्त्रिया या काही स्वत:च्या स्वामी नव्हत्या. म्हणूनच त्या वस्तूंची खरेदी करण्यात आणि फुरसतीचा वेळ घालविण्यात जो पैसा खर्च करीत, तो त्यांच्या स्वत:च्या खाती खर्ची न पडता, तो त्यांच्या स्वामीच्या खात्यातूनच येणार होता. म्हणूनच ज्या घराची मालकीण (?) असलेली स्त्री ही जी अगदी उघडउघडपणे निर्मिती करीत नव्हती ती अधिक पैसे खर्च करी. तिच्या वागण्यातून एका गोष्टीचे सूचन होई. या स्त्रीच्या घराच्या अथवा त्या घराच्या खऱ्या स्वामीच्या नजरेत, त्या स्त्रीचे आयुष्य कीर्ती व मान प्राप्त करून देण्याच्या दृष्टीने अधिक परिणामकारक आणि अधिक भूषणावह होते.''*

इ. स. १८५० साली युरोपमध्ये पहिल्या डिपार्टमेंटल स्टोअरची स्थापना झाली. इ. स. १८५० सालापासून एक नवा महत्त्वाचा परिसर मध्यमवर्गीय स्त्रियांना वैधपणे आणि शिष्टसंमतपणे वावरण्यासाठी उपलब्ध झाला. 'आधुनिकत्व' या संकल्पनेत चंगळवाद या पैलूला महत्त्वाचे स्थान आहे. 'जाहीर' आणि 'खाजगी' या दोन सामाजिक भूमिकात चंगळवादाकडे 'मध्यस्थाचे' स्थान होते. तसे असले तरी 'आधुनिक' या संकल्पनेत अनुस्युत असलेली जी विशिष्ट प्रकृती या लेखातील विवेचनात प्रस्तुत आहे, त्या विशिष्ट प्रकृतीत पुढील गोष्टींचा समावेश आहे. अनामिक क्षणमात्र टिकणारी अशी भेट, आणि कोणताही हेतू मनात न ठेवता केलेला भटकेपणा. या दोन्ही गोष्टी मध्यमवर्गीय स्त्रियांची खरेदी मोहीम आणि इतर हालचाली या दोघांनाही लागू नाहीत. आपल्या पतीच्या संपत्तीचे प्रदर्शन अथवा आपल्या ग्राहक शक्तीचे प्रकटीकरण या दोन्ही अर्थांनी लागू नाहीत.

तत्कालीन युरोपमध्ये उपनगरातल्या घरगुती अस्तित्वात बंदिस्त झालेल्या स्त्रियांच्या जीवनासंबंधी अधिक अधिक माहिती करून घेण्यासाठी सुरुवात झालेली आहे. हेच ज्या स्त्रियांनी फार मोठ्या प्रमाणात घराघरातून मोलकरणीचे काम पत्करले,त्याचबरोवर कामगार-

वर्गात समाविष्ट असणाऱ्या स्त्रियांच्या बाबतीतही सांगता येईल. आधुनिक युगाचा उदय झाला त्यावेळी आणि त्यानंतरच्या लगतच्या काळात, आधुनिक युगाने या वर उल्लेखिलेल्या सर्वच स्त्रियांच्या जीवनावर परिणाम केला होत. तो परिणाम इतका मोठा होता की त्यांचे 'घर' आणि 'श्रम' याबाबतचे जे अनुभव होते, त्यात परिवर्तन झाले होते. स्त्रियांच्या अनुभवाचा तपास करणे आणि तो पुन्हा एकदा आपण माहीत करून घेणे हा एक महान प्रकल्प आहे. तो आणखी एका महाप्रकल्पाचा उपभाग आहे.

या संकल्पित प्रकल्पाचे वर्णन पुढीलप्रमाणे करता येईल. आपणापासून आजवर जे लपविण्यात आले होते, ते हस्तगत करणे, तत्कालीन स्त्रियांच्या अनुभवांचा नव्याने तपास घेणे, असे करून, आपल्या पूर्वसूरींनी आपल्यासाठी जे अक्षर साहित्यात जमा होतील असे वृत्तांत पेश केलेले आहेत, त्यातील फटी बुजवून टाकणे. सामाजिक इतिहास आणि समाजशास्त्र या दोन्ही शास्त्राबाबत स्त्री - मुक्तीवादाच्या, त्या शास्त्रातील स्त्रियांशी संबंधित गोष्टींचे पुनर्लेखन केलेले आहे. या त्यांच्या प्रयत्नामुळे एक गोष्ट नक्की होणार आहे.

ती म्हणजे, आजवरचा जो समाजशास्त्र या ज्ञानशाखेतील प्रमुख प्रवाह होता, त्यात झुकते माप घालणे आणि विशिष्ट प्रवृत्तीवर भर देणे या गोष्टी नेहमीच हजर होत्या. स्त्री-मुक्तिवाद्यांनी केलेल्या या पुनर्लेखनाचा परिणाम म्हणून आजवर जी जी माहिती आपणा सर्वांपासून दडवून ठेवण्यात आली होती; ती हळूहळू उजेडात येणार आहे.

'आधुनिकत्व' या संकल्पनेबाबत स्त्री- मुक्तीवादी समाजशास्त्र कसे असेल हे अजूनही अजिबात स्पष्ट झालेले नाही. 'भटकी' (स्त्री) या शब्दाला अभिप्रेत असलेल्या संकल्पना तयार करणे वा तिचा शोध घेणे याचा प्रश्नच नाही. मुलभूत महत्त्वाचा मुद्दा एकच, तो म्हणजे एकोणिसाव्या शतकात जी लैंगिक तत्त्वावर आधारलेली विभागणी झाली होती, त्यामुळे 'भटकी' (स्त्री) अशा प्रकारचे व्यक्तित्व असणे, वा तसे व्यक्तित्व घडणे, हे केवळ अशक्यप्राय होऊन बसले होते. परंतु विद्यमानकाळी अस्तित्वात असलेले आधुनिकता या विषयासंबंधीचे जे वाङ्मय आहे; ते सर्वस्वी त्याज्य ठरविणे हेही योग्य होणार नाही. याचे कारण एक अनुभव या स्वरूपात फारच मोठ्या प्रमाणात पुरुषांच्या जीवनाच्या सीमारेषा कोणत्या याचे वर्णन, त्या वाङ्मयात निश्चितपणे आहे.

त्याचबरोबर ते अनुभव तत्कालीन स्त्रियांचा जो अनुभव होता, त्याचा मध्यवर्ती असा भाग नसला तरी त्या अनुभवाचा तो भाग खासच होता. या आधुनिकतेच्या वाङ्मयात गैरहजर असलेली एकच गोष्ट आहे. ती म्हणजे, 'जाहीर' असे मानले गेलेले जे कार्यक्षेत्र होते, त्यातील जीवनाचा काहीही वृत्तांत या तत्कालीन आधुनिकतेच्या वाङ्मयात नाही. त्याचबरोबर ज्या स्त्रिया 'जाहीर' परिसरात येऊन खड्या झाल्या होत्या त्यांच्या अनुभवांच्या वेगळ्या प्रकृतीबद्दलही त्यात उल्लेख नाही. याबाबत फारतर एकच उदाहरण देता येईल. या

अशा एका स्त्रीचा बोदलेर यांच्याशी जो मुकाबला झाला; त्यासंबंधी केलेली कविता. 'ला फाम पासान्ते' –

(आधारीत)

**त्रयस्थ**

सांग सांग पांथस्था,
गूढ गृहस्था !
कोणावरती जीव जडे तुज
पिता? माता? भगिनी? भ्राता
नाही रे राजा नाही मजपाशी
रक्तबंधनाची नातीगोती
सखेसुहृद तरी?
शब्द उच्चारिला तुवा. राजा आता
अर्थ त्याचा मज ठाऊकीना.
स्वदेश?
कुठे माझा देश कुठे मी हिंडतो
ना ठवे मज पत्ता त्याचे अक्षांश रेखांश
सौंदर्य?
अमर अशी ही सौंदर्याची देवी
तिच्यावर प्रेम कदाचित करीन मी !
सुवर्ण?
ईश्वर नावडे जसा तुजलागी
सुवर्णाची घृणा मज तैशी?
अरे अनामिका, अरे आगळ्यावेगळ्या त्रयस्था?
प्रेम तरी कशावर आहे तुझे?
पुढे सरकती पुढे धावती
असे थरकती तसे थिरकती
आकाशींचे मेघ असे हे
प्रेम तयांवर करितो मी रे !

**जाणाऱ्या स्त्रीस.......**

सभोवतालचा रस्ता कर्कश कानठळ्या बसवून
करतो मला बधिर उंच, शेलाटी, दुःखमग्ना,
लचकत मुरडत चालल्यामुळे तिचे दुःख
देखील भासते रुबाबदार !

चपला आणि उमदी, शिल्पाकृतीसम
अवयवाची
आणि मी दिल्या झोकांड्या मवाल्यासारख्या
मी प्राशन करतो
तिच्या नेत्रांकरवी खदिरांगाराची तप्तता
डोळ्यांची निरांजने असतील तर
आकर्षण वाटावं
नसतील तर.... आपलीच तगमग !

मिटल्या पापण्या ! रात्र झाली.......
हे सौंदर्यवती, तुझ्या नुसत्या
क्षणिक नेत्रकटाक्षाने
माझा अवचित पुनर्जन्मच झालाय ग.
मी तुला फक्त परलोकीच पाहू का?

दूरदूर इथून अगदी दूरात.....
खूप खूप उशीरा– कदाचित कधीच नाही
ठाऊकच नाही मला तुझी दिशा कोणती
ना तुला माझी प्रवासवाट
प्रेम तुझ्यावर केले असते मी
तुला तर ते ठाऊकच आहे !

---

# नोंदवही

## १) Waste Land - कवी मॅडिसन कॉवेन

The bad poet immitates, good poet steals.
- T. S. Elliot

Briar and fennel and chincapin,
And rue and ragweed everywhere,
The field seemed sick as a soul with sin,
Or dead of an old despair,
Born of an ancient care.

The cricket's cry and the locust's whirr,
And the note of a bird's distress,
With the rasping sound of the grasshopper,
Clung to the loneliness
Like burrs to a trailing dress.

So sad the field, so waste the ground,
So curst with an old despair,
A Woodchuck's burrow, a blind mole's mount
And chipmunk's stony lair,
Seemed more than it could bear.

So Lonely, too, so more than sad,
So droning loud with bees --
I wondered what more could Nature add
To the sum of its miseries . . . .
And then - I saw the trees.

Skeletons gaunt that gnarled the place,
Twisted and torn they rose -
The tortured trees of a perished race



अनुक्रमणिका

Of monsters no mortal knows,
They startled the mind's repose.

And a man stood there, as still as moss,
A lichen form that stared;
With an old blind hound that, at a loss,
Forever around him fared
With a snarling fang half bared.

I looked at the man; I saw him plain;
Like a dead weed, gray and wan,
Or a breath of dust. I looked again -
And man and dog were gone,
Like the wisps of a greying dawn . . . .

Were they a part of the grim death there,
Ragweed, fennel, and rue?
Or forms of the mind, an old despair,
That there into semblance grew
Out of a grief I knew?

**टि. एस. इलियटचे श्रुतयोजन.**

श्रीमती शांता शेळके यांनी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणात श्रुतयोजन ही संज्ञा व संकल्पना सांगितली. हे विचार त्यांनी 'जाणता - अजाणता' या महाराष्ट्र टाइम्समधील सदरात मांडले होते. निर्मितीक्षम साहित्यिक एखादा विचार वाचतो, तो विचार त्याच्या स्मृतीकोशात जाऊन बसतो व कालांतराने वाङ्मयीन कलाकृती निर्माण करताना वाचलेला विचार निराळ्या तेजाने उजळून त्याच्या कलाकृतीत अवतरतो. अशा श्रुतयोजनाचा अन्वयार्थ श्रीमती शांता शेळके यांनी सांगितला आहे.

ज्यावेळी कवी किंवा लेखक दुसऱ्याचे विचार वाचतो ते विचार त्याच्या बुद्धीच्या लोलकातून जातात, त्याच्या प्रज्ञेने तो त्या विचारांचे पृथक्करण करतो, त्या पृथक्करणात तो स्वत:चे विचार मिसळतो व हे निर्माण झालेले मिश्रण स्वत:च्या प्रतिभेच्या भिंगातून एकीकरणाच्या झोतात पुन्हा एखाद्या कलाकृतीच्या स्वरूपात बाहेर येतात. असे बरेच वेळा

घडतही असेल. पण ज्यावेळी दोन कलाकृतीत विलक्षण साम्य असते व त्याच्यात आधी लिहिलेली कलाकृती प्रकाशित पण अप्रसिद्ध व नंतर लिहिलेली प्रकाशित व सुप्रसिद्ध असे असते अशावेळी या साम्याचा कोणता किंवा कसा काय अर्थ लावायचा असा प्रश्न पडतो.

टि. एस. इलियटच्या 'वेस्टलँड' या सुप्रसिद्ध कवितेचा साहित्य शोध रॉवर्ट इअॅन स्कॉटने घेऊन झगझगीत झोत टाकला आहे.

टि. एस. इलियट (जन्म १८८८ मृत्यू १९६५) कवी, नाटककार. समीक्षक, १९४८ साली साहित्याचे नोबेल, वेस्टलँड कविता १९२२ साली प्रकाशित. मॅडिसन कॉवेन या अमेरिकन कवीची 'वेस्टलँड' कविता १९१३ साली प्रकाशित.

**पहिली वेस्टलँड** – पहिली वेस्टलँड कविता टि. एस. इलियटने लिहिली नाही. पण त्याला ती कविता वाचण्याची संधी खचितच मिळाली. साल १९१४ सप्टेंबर महिना. लंडन. टि. एस इलियट व इझ्रा पौंड यांची लंडन येथे प्रथम भेट. शिकॅगो येथून प्रकाशित होणारे पोअेट्री हे मासिक इलियटने वाचले. या मासिकाचा युरोपिय संपादक इझ्रा पौंड. इलियटची 'दि लव्ह साँग ऑफ जे अल्फ्रेड प्रुफ्रॉक' ही कविता पोअेट्री मासिकाकडे पौंडने पाठवली. पौंड इलियटचा गुरुतुल्य स्नेही ! पोअेट्री मासिकाच्या जानेवारी १९१३ च्या अंकात मॅडिसन कॉवेन या अमेरिकन कवीची वेस्टलँड ही कविता प्रकाशित झाली होती.

मॅडिसन कॉवेन हा सर्वपरिचीत कवी असल्यामुळे त्याची ओळख करून देण्याची गरज नाही असे कवितेच्या सुरुवातीलाच छापले होते. याच पोअेट्रीच्या अंकात पौंडचा 'लंडनचे कवी' हा लेखही प्रकाशित झाला होता पण त्या लेखात इलियटचा उल्लेख नव्हता. पोअेट्रीचा हा अंक इलियटच्या हातात पडला होता. मॅडिसन कॉवेनची जानेवारी १९१३ मध्ये पोअेट्री मासिकात प्रकाशित झालेली वेस्टलँड सोबत देत आहे.

कॉवेनची कविता प्रकाशित होऊन आठ वर्षे उलटली, आणि इलियटची वेस्टलँड प्रकाशित झाली. या दोन कवितांमधील साम्यस्थळे पाहिली म्हणजे फक्त योगायोग असे म्हणण्याचा धीर होत नाही. कॉवेनच्या कवितेचे शीर्षक आणि कवितेतील मूळ रूपक यावर दोघांच्या कविता आधारित आहेत. पापशल्यांनी पछाडलेला एखादा आत्मा आणि शापित 'वेस्टलँड' हे कॉवेनच्या कवितेतील रूपक आहे. कॉवेनच्या कवितेतील आणि इलियटच्या कवितेतील सूक्ष्म गोष्टी किती समान ते पाहा. विंडस्, फ्लॉवर, रॉडन्टस्, क्रिकेटस्, वर्डकॉल्स्, विप्स् ऑफ कॉग, डस्ट, स्टोन्स्, स्केलेटन्स डेडट्रीज, मेनासिंग डॉग्ज्, द मॅन व्हू व्हॅनिशेस या सर्व गोष्टी दोन्ही कवितेत समान, कॉवेन व इलियट यांच्या कवितेत कमीत. कमी तेरा साम्ये आहेत.

इलियटने त्याच्या वेस्टलँड या कवितेची साधने कोणती हे सांगितले आहे. व त्यांची यादीसुद्धा दिली आहे. इलियटची वेस्टलँड व त्याने दिलेली वेस्टलँडची साधने यात साम्य–स्थळे आहेत. परंतु त्यापेक्षा कितीतरी जास्त साम्यस्थळे मॅडिसन कॉवेनची वेस्टलँड व इलियटची वेस्टलँड यांमध्ये आहेत. असे असून सुद्धा इलियटने दिलेल्या वेस्टलँडच्या

साधनांच्या यादीत मॅडिसन कॉवेनच्या वेस्टलँडचे नाव नाही. आजपर्यंत इलियटबद्दल तीन हजार निबंध लिहिले गेले पण फक्त दोन निबंधात कॉवेनचा उल्लेख आढळतो. कॉवेनचे भूत कोणालाच नको आहे.

पिटर ॲक्रॉइड हा इलियटचा चरित्रकार. तो म्हणतो, "इलियटच्या स्वत:च्या मौलिक कल्पना थोड्याच होत्या. त्याने वाचलेल्या विचारांचे तुकडे त्याच्या स्मृतीत जात व निराळा आकार घेऊन, अर्थपूर्ण भावाच्या रूपात त्याच्या वाङ्मयात कितीतरी वर्षांनंतर प्रकट होत." पिटर ॲक्रॉइड इलियटबद्दल हे लिहितो पण त्यावेळी तो कॉवेनच्या वेस्टलँडचे उदाहरण देत नाही !

**ही वेस्टलँड व ती वेस्टलँड** – 'लाइक द विस्प् ऑफ ग्रेईंग डॉन' ही मॅडिसन कॉवेनच्या वेस्टलँडमधील ओळ तर "अंडर दि ब्राउन फॉग ऑफ विंटर डॉन" ही इलियटच्या वेस्टलँडमधील एकसष्टावी ओळ ! कॉवेनचे 'अ ब्रेथ ऑफ डस्ट' तर इलियटचे 'हँडफुल ऑफ डस्ट' ! 'वेस्टलँड, रुटस्, ब्रान्चेस्, स्टोन्स्, रबीश, क्रिकेट' या संज्ञा दोन्ही वेस्टलँडमध्ये समानतेने येतात.

केन्टकी राज्यातील 'लुइव्हिल' गावी कॉवेन राहात होता. गावातून फेरफटका मारणे एवढीच करमणूक त्याच्या खिशाला परवडणारी होती. अशाच एका भ्रमंतीत एखाद्या पडिक जमिनीचा तुकडा त्याच्या नजरेस पडला असावा व त्यातूनच वेस्टलँड या कवितेची निर्मिती झाली असावी. इलियटने कॉवेनचे ऋण मान्य केले नाही, त्यामागे त्याची स्वत:ची अशी काही कारणे असतील. पण वाचकांनी कॉवेनकडे दुर्लक्ष केल्याने त्यांच्या पदरात काही पडणार नाही. कारण कॉवेनसारखा अप्रसिद्ध म्हणून सामान्य ठरलेला कवी कशी असामान्य कलाकृती मागे ठेवून जातो हे आपल्याला कधीच उमगणार नाही.

काही समीक्षकांनी इलियटवर वेस्टलँडच्या संदर्भात वाङ्मयचौर्याचा आरोप केला होता. त्या समीक्षकांची दिशाभूल करण्यासाठी इलियटने वेस्टलँड कवितेवर टिपणे लिहिली असे त्याने स्वत:च लिहून ठेवले आहे व या टिपणांना त्याने पोकळ पांडित्य (बोगस स्कॉलरशिप) असे म्हटले आहे. लेखकाने कलाकृतीसाठी वापरलेल्या साधनांची सूची दिली म्हणजे तो त्या साधनांवर कमी प्रमाणात अवलंबून होता असे होत नाही.

त्यानी वापरलेल्या साधनांचे महत्त्व कमी होत नाही तर ते तेवढेच राहाते. ग्रोव्हर स्मिथ हा इलियटचा दुसरा चरित्रकार. त्याने म्हटले आहे, "इलियट त्याच्या अत्यंत महत्त्वाच्या व अर्थपूर्ण साधनांचे ऋण मान्य करताना दिसत नाही" पण असे लिहिताना कवी कॉवेनचा उल्लेख स्मिथ करीत नाही !

वेस्टलँड ही कविता विसाव्या शतकातील सांस्कृतिक ऱ्हासाबद्दलची आहे. इलियटने वेस्टलँडची जी साधने दिली आहेत ती या संकल्पनेला उजाळा देणारी आहेत. बायबल, दान्ते, शेक्सपीयर यांच्या गतकाळातील अभिजात साहित्यकृती त्याने साधने म्हणून सूचीत नमूद केल्या आहेत. इलियटने या दिग्गजांबरोबर विसाव्या शतकातील मॅडिसन कॉवेन या

सामान्य कवीचे नाव साधनांच्या सूचीत घातले असते तर इलियटची 'वेस्टलँड' ही कविता एक विनोद ठरला असता व त्या कवितेची मौलिकताही कमी झाली असती. परंतु कॉवेनची वेस्टलँड वाचली म्हणजे कॉवेनच्या कवितेने इलियटच्या कवितेला भावनिक भूमी तयार करून दिली व त्यावर इलियटच्या कवितेची चौकट उभी आहे हे आपल्याला पटते. इलियटच्या वेस्टलँडचा प्रभाव कॉवेनच्या वेस्टलँडवर आधारित आहे असे रॉबर्ट इअॅन स्कॉटने म्हटले आहे.

ज्या पोअेट्री मासिकाने मॅडिसन कॉवेनची वेस्टलँड प्रकाशित केली त्या मासिकाचे संपादक इलियटची 'दि लव्ह साँग ऑफ जे अल्फ्रेड प्रुफ्रॉक' ही कविता प्रकाशित करायला नाखूष होते. त्याच पोअेट्री मासिकात छापून आलेली सामान्य वेस्टलँड ही कविता वापरून आपण असामान्य व प्रसिद्ध वेस्टलँड ही कविता लिहिली ही गोष्ट इलियटचा स्वाभिमान सुखावणारी असावी. आपण या संपादकांची कशी गंमत केली असे त्याच्या विनोदबुद्धीला वाटून गेले असावे.

इलियटने कवितेच्या मौलिकतेची खास व्याख्या केली होती. सामान्यत: कल्पनाच करता येणार नाही अशा असंभवनीय व छोट्याशा साहित्यकृती एकत्र करून जुळणी करणे हे त्याच्या कवितेच्या व्याख्येत बसत होते, म्हणून कॉवेनची कविता साधन म्हणून वापरणे त्यांच्या दृष्टीने योग्य होते. स्पष्टीकरण न देता कुठच्या कानाकोपऱ्यातील विचारांचा समीपन्यास करण्यात इलियटची हातोटी होती. इलियट हा विचारांचे वेचे एकत्रित करणारा महान 'अन्थॉलोगायझर' होता असे रॉबर्ट इअॅन स्कॉटने म्हटले आहे.

**अशिक्षित कॉवेन – सुशिक्षित इलियट** – इलियटचे हार्वर्ड, सॉबॉन (फ्रान्स), ऑक्सफर्ड, या तीन सर्वोत्तम विद्यापीठांमध्ये शिक्षण झाले होते. मॅडिसन कॉवेन कोणत्याही विद्यापीठात शिकला नव्हता. इलियटला वारसा हक्काने संपत्ती मिळाली होती. कॉवेन जन्मत:च निष्कांचन होता. इलियटला इझ्रा पौंडसारखा सल्लागार व संपादक मिळाला होता तर कॉवेन एकांडा शिलेदार ! 'सिनसिनॅटी पूल' (पैसे लावून खेळ खेळण्याची जागा) येथे सहाय्यक खजिनदाराचे काम पोटाची खळगी भरण्यासाठी कॉवेन करीत होता. त्याने सहा वर्षे नोकरी करून थोडे पैसे गाठीला बांधले, कशासाठी तर 'लुइव्हील' या स्वत:च्या गावी जाऊन शांतपणे कविता करण्यासाठी ! त्याने पंधराशे कविता छत्तीस वह्यांत लिहून ठेवल्या.

पहिल्या महायुद्धाच्या धक्क्याने त्याला पक्षाघाताचा झटका आला. १९१४ साली मॅडिसन कॉवेन वयाच्या अठ्ठेचाळीसाव्या वर्षी मृत्यू पावला. त्याची वेस्टलँड ही कविता त्याच्या मृत्यूआधी म्हणजे १९१३ साली पोअेट्री मध्ये प्रकाशित झाली होती. टि. एस. इलियटची वेस्टलँड मॅडिसन कॉवेनच्या मृत्यूनंतर आठ वर्षांनी प्रकाशित झाली. इलियटंची वेस्टलँड वाचायला मॅडिसन कॉवेन जिवंत नव्हता. आता हे इलियटचे श्रुतयोजन का आणखी काही हे वाचकांनी ठरवावे.

**– डॉ. आनंद जोशी**



अनुक्रमणिका

## २) ऑलिव्हिया गोल्डस्मिथ

ऑलिव्हिया गोल्डस्मिथ ह्या 'फर्स्ट वाइव्हज क्लब' या बेस्ट सेलर कादंबरीच्या लेखिकेसंबंधी थोडेसे

*एकदा पोळले तर पहिली पत्नी अधिक बुजरी बनते.*
*दुधाने तोंड पोळले तर ताकही फुंकून प्यावेसे वाटते.*

ऑलिव्हिया गोल्डस्मिथ– राहणार लेक्झिंटन आणि थर्ड अव्हेन्यूच्या मधला ईस्ट ७७ वा रस्ता – १२ वर्षांपूर्वीचा दिवस – तिच्या विवाहाच्या विच्छेदनाचा – थंडीतला दिवस– तिला चांगला आठवतोय.

'फर्स्ट वाइव्हज क्लब' या बेस्ट सेलर कादंबरीची आणि त्यावर निघालेल्या हिट सिनेमाची ही लेखिका म्हणते,"मी अशा चांगल्या मध्यमवर्गीय कुटुंबातून आले होते की जिथे घटस्फोट मान्य नव्हता." ती पुढे म्हणते की, "त्या दिवशी साचलेले बर्फाचे घाणेरडे थर पाहून माझ्या मनात लगेचच विचार आला, देवा रे बरं झालं, माझ्याजवळ माझा पैसा आहे."

अर्थात हे आभार मानण्यात उतावीळ झाली हे तिच्या लक्षात आले नाही. हे खरे होते की १९८४ मध्ये स्वत:चा सल्लागाराचा व्यवसाय विकून टॅक्स वजा जाता तिला तीन लक्ष डॉलर्स मिळाले होते. आणि तिने व तिच्या कार्पोरेट एक्झिक्यूटिव्ह नवऱ्याने मिळून एक दिमाखदार अपार्टमेंट आणि लँग आयलंडवर एका खेडेगावात जागा घेतली होती.

तिच्या घटस्फोटाचा काळ सहा वर्षे लांबेल असे तिच्या मनातही आले नव्हते. ह्या केसने तिचा बराच पैसा खाल्ला. शिवाय नवऱ्याने दोन्ही घरे व जग्वार या गाडीचा ताबा मिळवला. एकदा अशी वेळ आली की तिच्याजवळ फक्त चाळीस हजार डॉलर्स उरले आणि त्यापैकीही बरेचसे पेन्शन अकाऊंटमध्ये अडकलेले. तिला तिच्या एका शिक्षिका मैत्रिणीकडून पैसे उसने घ्यावे लागले. ह्या घटनेचा परिणाम असा झाला की ती काळजीपूर्वक गुंतवणूक करू लागली.

४२ वर्षांची श्रीमती गोल्डस्मिथ टीशर्ट आणि लेगिंग्ज घालून मुलाखतीसाठी तयार होऊन बसलेली असताना एकदा म्हणाली, "माझ्या आयुष्याचा पट एकदा उधळला गेला. मला कळलं की मी बांधलेले किल्ले वाळूतले होते. परत एकदा हे सगळं मी शून्यातून उभं करीन पण परत परत ते शक्य नाही."

तिच्या पुस्तकांच्या जॅकेटवर तिचा अगदीच वेगळा फोटो असतो. प्रसिद्धीसाठी लागणारे हे फोटो अगदी वेगळाच विग वापरून काढलेले असतात. एरवी ती तिचे पिंगे केस आखूड कापते आणि स्वत:ला 'प्लेन ब्राऊन रेन' म्हणवून घेते. स्वत:च्या 'फिगर' बद्दल सदैव चिंतेत असणे हा तिच्या पात्रांचा स्वभावधर्म तिचाही आहे.

सगळ्याच गुंतवणूकदारांप्रमाणे श्रीमती गोल्डस्मिथनेही आपल्याला सुखात राहाता यावे म्हणून कमीतकमी किती रक्कम हवी ह्याचे गणित मांडले होते – ३ मिलीअन डॉलर्स !

मात्र इतरांना ह्या गणिताचे उत्तर साधलेच असते असे नाही, तिला मात्र ते साधले. तिला तिचे ध्येय गाठता आले. ती म्हणते की माझ्या पहिल्या कादंबरीपासून मला फारसे काही मिळाले नाही. कारण मी लेखिका म्हणून नवीन असल्यामुळे १९९१ मध्ये प्रसिद्ध झालेल्या या 'द फर्स्ट वाइव्हज क्लब' ह्या पुस्तकाबद्दल फारच थोडे पैसे मागितले. नंतरच्या चार कादंबऱ्यांना– त्यातल्याच दोन बेस्ट सेलर झाल्या. तिला भरपूर पैसे मिळाले. पाचवी 'मॅरिइंग मॉय' ही कादंबरी नुकतीच प्रसिद्ध झाली. आता तिला 'स्वीचरू' ह्या तिच्या कादंबरीची पटकथा गेल पेरेंट ह्याच्याबरोबर लिहिल्याबद्दल १. २५ मिलीअन डॉलर्स भागीत मिळणार आहेत. ही कादंबरी नित्य नव्यानव्या जागा शोधणारे नवरे पत्नी आणि ठेवलेली बाई ह्यांना सारख्याच पद्धतीने सांभाळतात ह्या विषयावर आहे.

एका गोष्टीचे मात्र श्रीमती गोल्डस्मिथ ह्यांना आश्चर्य वाटते. सल्लागार म्हणून करीत असलेल्या उद्योगापेक्षा हा लेखिका म्हणून उद्योग अधिक किफायतशीर आहे. त्याचे कारण 'उत्पादनाचा फेरवापर' ही युक्ती आहे असे तिचे म्हणणे आहे. तुम्हाला एखादे हस्तलिखित कादंबरी म्हणून प्रकाशकाला देता येते तेच पुन्हा विविध भाषांसाठी देता येते, सिनेमासाठी, मालिकांसाठी, ध्वनिफितीसाठीही ते विकता येते. इतकेच नव्हे तर आज विकले गेले नाही म्हणजे उद्या जाणारच नाही असेही नव्हे. 'फर्स्ट वाइव्हज क्लब' ही अद्‌भूत घटना घडली त्यामुळे ती स्थावर इस्टेटीसारखी झाली. आता माझ्या इतर प्रॉपर्टीला (कादंबऱ्याना) चांगला शेजार मिळाला त्यामुळे त्यांची किंमत वाढतच जाईल. महत्त्वाचे हे की मी १. ५ मिलीअन डॉलर्सचा माझा स्वत:चा व्यवसाय करते आहे.

घटस्फोटाबद्दलचा राग आणि दु:ख अजून मनातून गेलेले नसल्यामुळे स्त्रियांच्या आर्थिक स्वातंत्र्याबद्दलचे संदर्भ तिच्या बोलण्यात सतत येत असतात. "विवाह करणाऱ्या प्रत्येक स्त्रीजवळ स्वत:ची ओळख, व्यक्तिमत्त्व हवं आणि स्वत:चा पैसाही हवा याचा अर्थ असा नव्हे की दोघांचे एकत्रित पैसे असू नयेत. पण स्त्रीला फक्त स्वत:चेच असतील असे पैसे असायला हवेत."

कोणत्याही स्त्रीला गरज असते ती एका उत्तम प्रसूतीतज्ज्ञाची, एका उत्तम केशरचनाकाराची, एका उत्तम शेअरब्रोकरची आणि एका उत्तम अकाउंटंटची असे तिचे मत होते.

मार खावा लागल्यामुळे श्रीमती गोल्डस्मिथला पैसा सांभाळणे शिकावेच लागले. ती आता तीन पद्धतींनी पैसा गुंतवते – एक, चार वर्षापूर्वी तिने स्वत:च सुरू केलेल्या, मालक नोकर स्वत:च असलेल्या कंपनीत, टॅक्स लांबणीवर टाकता येणाऱ्या (Deferred) पेन्शन प्लॅनमध्ये ती पैसे ठेवते. १९९५ मध्ये तिने त्यात साठ हजार डॉलर्स ठेवले आणि १९९६ अखेरीस ते पाच लाख डॉलर्स झाले.

आता ही रक्कम तात्पुरती ट्रेझरी बिल्स, ब्लूचिप्स स्टॉक, झिरोकूपन आणि उच्च दर्जाच्या कार्पोरेट बाँडमध्ये गुंतवलेली आहे.

'टॅकर अँथनी इन्व्हेस्टमेंट फर्म' मध्ये तिचे जवळजवळ ९ लक्ष डॉलर्स आहेत. सगळी रक्कम सुरक्षितपणे गुंतवण्यावर तिचा भर आहे आणि त्यासाठी तिचा ब्रोकर ख्रिस ओलसन तिला मदत करतो. त्याने तिचे बरेचसे पैसे म्युनिसिपल बाँडमध्ये गुंतवले आहेत.

मात्र धोका पत्करता यावा अशी सोय एक लक्ष डॉलर्सच्या एका अकाऊंटद्वारे केलेली आहे. इंटेलसारख्या प्रचंड उच्च तंत्रविज्ञान उद्योगात ती ह्यातून गुंतवणूक करते. लिओनॉर्ड गार्टनर हा अकाउंटंट ह्या प्रकारच्या गुंतवणुकीसाठी मदत करतो. त्याची नेमणूक दीर्घ काळासाठी केलेली आहे. श्रीमती गोल्डस्मिथ एवढ्या रकमेच्या बाबतीत मोठ्या उड्या मारायला तयार असते. कारण तिला ७ डॉलरचा भाव २८ डॉलर झालेला बघायला आवडणार आहे. त्यासाठी ती नुकसान सोसायलाही तयार आहे.

मात्र तिची वृत्ती अधिक गुंतागुंतीची आहे. एकीकडे तिला हा लहानशा प्रमाणातला धोका पत्करायचाही आहे आणि त्याचवेळी तिला पैसा हरणेही आवडत नाही म्हणून तिने सूचनाच देऊन ठेवल्या आहेत की मी हरले तर मला कळवू नका. कारण त्यामुळे माझ्या लेखनात व्यत्यय येईल.

"ह्या इतक्या सगळ्या गोष्टी करण्यामागे कारण एकच आहे ते म्हणजे मला काय वाटेल ते लिहिण्याचं स्वातंत्र्य मिळावं. लिहिताना कशाचंही दडपण असू नये."

तिचा कार्यक्रम अगदी भरगच्च असतो. तिला दमवणारा असतो – लेखन, भाषणे आणि स्वत:ची करिअर सांभाळणे. 'मी माझ्या अक्कलहुषारीने राहाते. कधी कधी माझी मती गुंगही होते.' तिची खरी गुंतवणूक आहे ती स्थावर मालमत्तेमध्ये ! १९९२ मध्ये नॉर्थ कॅरोलिनात तिने प्रत्येकी दोन लक्ष डॉलर्सना दोन भाड्याची घरे विकत घेतली. तीन वर्षानंतर 'व्हरमाऊंट'मध्ये आठ लक्ष डॉलर्सना स्वत:साठी 'कंट्रीहोम' (गावाकडचे घर) विकत घेतले, ती म्हणते, 'तिन्ही, घरं मिळून आज किंमत १५ लाख डॉलर्स आहे.'

श्री. गार्टनरच्या मते तिला स्थावर मालमत्तेमध्ये अंतर्ज्ञान आहे. ती ज्यात गुंतवणूक करते त्याचा भाव नेहमी वाढतच जातो. तिच्या नैराश्यावर ह्याचा चांगला परिणाम होतो.

ह्यापूर्वी तिने केलेली घरांची खरेदी फायद्यात पडली. श्री. गार्टनर म्हणतात की १९९० मध्ये व्हरमाऊंटमध्ये १ लक्ष २५ हजार डॉलर्सना घेतलेले घर १९९५ मध्ये दोन लक्ष डॉलर्सना विकले गेले. १९९२ मध्ये तिने दिवाळखोर प्लोरिडा डेव्हलपमेंटस्‌मध्ये एक घर ७५००० डॉलर्सना घेतले. तेच घर १९९५ मध्ये ३ लक्ष डॉलर्सना विकले गेले.

फ्लोरिडामध्ये टॅक्सचे नियम जरा शिथील आहेत म्हणून तिथे अनेक धनिक, लेखक बराच काळ घालवतात. रॉबिन कुकसारख्या अनेक लेखकांप्रमाणे तीही सहा महिने एक दिवस फ्लोरिडामध्ये राहाते.

श्रीमती गोल्डस्मिथला ही एवढी मोठी प्रसिद्धी मिळाली ती केवळ नशिबाने ! लेखिका व्हावी अशी कोणतीही पार्श्वभूमी तिला नव्हती. एका शिक्षिकेची व सरकारी कारकुनाची ही मुलगी. न्यू जर्सी आणि न्यूयॉर्कला वाढली आणि न्यूयॉर्क युनिव्हर्सिटीत शिक्षण हा प्रमुख



अनुक्रमणिका

विषय घेऊन स्नातक बनली.

तिने व्यवसायशिक्षण घेतलेलेच नव्हते. तरीही पदवीनंतर आपण उद्योगात पडावे असे तिच्या मनाने घेतले. उद्योगधंद्यात सल्लागाराचे काम करावे, असे तिने ठरविले. १९७० मध्ये एका मोठ्या मॅनहॅटन कंपनीत ती शिरली आणि बघता बघता वर चढत गेली. वयाच्या पंचविसाव्या वर्षी ती ७५ हजार डॉलर्स – आजच्या चलनवाढीच्या संदर्भात १ लाख ७५ हजार डॉलर्स – मिळवित होती. आयबील्मसारख्या उच्च तंत्रविज्ञानातल्या कंपन्यांना आणि त्यांच्या गिऱ्हाईकांना ती सल्ला देत होती. "ही अगदी पिळून काढणारी नोकरी होती. त्या काळात मी सतत हिंडत होते आणि मला वाटतं की ह्या व्यवसायात एम. बी. ए. ची पदवी न घेता येणाऱ्यांपैकी मी जवळ जवळ शेवटच्या गटामध्ये होते." असे ती म्हणते.

तिच्या नवऱ्यालाही ह्या काळात उत्तम पगार मिळत होता. नवी क्षेत्रे पादाक्रांत करण्याचा तरुण उद्योजकांचा तो काळ – यप्पी टाईम – होता. (अमेरिकेत यप्पी म्हणजे Young Urbanised protestant professional )

१९८१ मध्ये दुसऱ्या एका गुंतवणूकदाराच्या मदतीने तिने 'ऑमनी कन्सल्टींग' ह्या नावाने व्यवसाय सुरू केला. ३ वर्षानंतर तिच्या घटस्फोटाच्या काळात तिने हा व्यवसाय एका ब्रिटिश कंपनीला ५ लक्षांना विकला – टॅक्स दिल्यावर तिला ३ लक्ष उरले – आणि ती तिथेच नोकर म्हणून राहिली.

त्याचवर्षी ती दोघे विभक्त झाली. 'हा दोन वेगळया प्रकारे वाढलेल्या व्यक्तींचा घटस्फोट होता' असे तिचे म्हणणे होते. 'फर्स्ट वाइव्हज क्लब' मध्ये दाखवलेल्या पुरुषी अहंकाराच्या दुर्दैवी बळी असलेल्या स्त्रियांप्रमाणे ती नव्हती तरीही तिला काही वर्षे ह्या विभक्त होण्याचा त्रास झालाच.

"मी हताश झाले. 'सेल्फ हेल्प ग्रूप' मध्ये मी जाऊ लागले. मी काम थांबवलं. एकतर मला बदल हवा होता आणि दुसरं म्हणजे मला ते करवतही नव्हतं. खोटाखोटा देखावा करणं मला जमत नव्हतं." असे तिचे म्हणणे !

तिच्या नैराश्यपूर्ण मन:स्थितीमुळे तिने आयुष्याचा फेरविचार केला आणि तिच्या लक्षात आले की ती सल्लागार व्हायला जन्मालाच आली नव्हती. "मला वर्ड प्रोसेसिंग अधिक परिणामकारक करण्यासाठी थोडं अधिक मार्केटिंग करायला हवं असा विचार मृत्यूशय्येवर पडलेली असताना मी करीत आहे ही कल्पनाच मला चमत्कारिक वाटते. शिवाय मला ते काम आवडत असतं, मला माझे क्लायंट्स आवडत असते तर मी ते कदाचित केलंही असतं. पण ह्या कामाच्या संदर्भात भेटणारे कंपन्याचे सगळे अध्यक्ष एकाकी असतात. त्यांना बोलण्याची भूक असते. थोडक्यात मी त्यांची मानसोपचारतज्ज्ञ असते."

तिचा अनुभव असा आहे की अमेरिकेचा उद्योग व्यवसाय भावनिक दृष्ट्या खुजी असलेली यांत्रिक माणसे चालवतात. आणि ती इतरांसारखीच भांबावलेली आणि घाबरलेली असतात.

"दुर्दैवाने ते इतके गोंधळलेले आहेत की ते ह्या ग्रहाची नासाडी करतात" असे तिचे म्हणणे आहे.

घटस्फोटाची प्रक्रिया सुरू झाल्यावर कोर्टाचा खर्च आणि स्वत:चा रोजचा खर्च ह्यात तिची पुंजी कमी व्हायला लागली. असे असतानाही तिने आर्थिक दृष्ट्या असुरक्षित म्हणून प्रसिद्ध असलेल्या नव्या उद्योगात उडी घ्यायचे ठरविले – लेखन व्यवसाय – कथा, कादंबरी लेखन. "मी स्वत: जुगारी वृत्तीची नाही पण लेखन व्यवसाय पत्करताना मी जुगार खेळले. याचं कारण असं की मला पुस्तकं अतिशय आवडतात. जेव्हा तुमचं आयुष्यच उधळलं जातं तेव्हा निदान आनंद का शोधू नये?"

तिची पहिली कादंबरी – एक ऐतिहासिक नाट्य – तिने कधीच पुरी केली नाही. कारण तिला स्वत:लाच ती वाचताना कंटाळवाणी वाटली होती. ती एका १८ व्या शतकातल्या एकाकी आईबद्दल होती. १९८९ मध्ये 'फॉर्चुन'मासिकात 'ट्रॉफी वाइफ' बद्दल (वृद्ध नवऱ्यांच्या तरुण पत्नी ज्या त्यांना मोठेपणासाठी हव्या असतात) एक लेख तिने वाचला. इथे तिला तिची बेस्ट सेलर स्फुरली.

कथा अशी होती की नवे कॉर्पोरेट एक्झिक्यूटिव्हज अशा ट्रॉफी वाइव्हज मिळवतात. मी अजूनही मला पाहिजे ते मिळवू शकतो असे त्यांना त्यांच्या तरुण तुर्कांना दाखवायचे असते.

श्रीमती गोल्डस्मिथ म्हणते की, "ही कथा चुकीची आहे. ही कथा खरं म्हणजे 'पहिल्या बायकोची' असते. मला ह्या घमेंडखोर पहिल्या बायकाही ठाऊक आहेत आणि ह्या फालतू ट्रॉफी वाइव्ह्जही ठाऊक आहेत. म्हणून मी सुरुवात केली ...'द फर्स्ट वाइव्ह्ज क्लब' !"

१९९० मध्ये जेव्हा तिचा घटस्फोट एकदाचा झाला तेव्हा तिचा व्यवसाय विकून आलेल्या पैशांवर तिला ताबा मिळाला. तिच्या नवऱ्याला दोन्ही घरे मिळाली. तोपर्यंत तिचा बराचसा पैसा संपला होता. ह्या पैशाच्या तंगीतून सुटण्याचा एकमेव मार्ग म्हणजे तिच्या कादंबरीचे हस्तलिखित.

"माझ्या टेबलावर एक मिलीअन डॉलर्स आहेत की ५०० निरुपयोगी कागद आहेत ह्याचा मला अंदाज येत नव्हता" असे ती म्हणाली.

अनिकेत अवस्था असल्यामुळे तिने मॅनहॅटन सोडून व्हरमाऊंटला राहायचा निर्णय घेतला. ते घर अगदी शांत होते. श्रीमती गोल्डस्मिथला आठवते. 'आणि पुस्तकाच्या दुकानदाराशी माझी चांगली गट्टी झाली होती.'

फर्स्ट वाइव्ह्ज क्लबचे प्रकाशकांनी सुरुवातीला 'थंडे' स्वागत केले. त्यांनी दुरुस्त्या करायलाही सुचविले नाही ! आवडले नाही असे म्हणून नुसतेच परत केले. एक प्रकाशक म्हणाला की, 'ते अगदी विषण्ण करणारे आहे.' दुसरा म्हणाला, 'पुरुष इतके काही वाईट वागत नाहीत.' श्रीमती गोल्डस्मिथचे म्हणणे मात्र असे होते की, ही पात्रे अगदी खरीखुरी आहेत. प्रत्यक्षात तिला भेटलेली माणसे ह्यापेक्षा वाईट वागणारी आहेत.

१९९१ मध्ये तिच्या यशाचा मार्ग मोकळा झाला. त्यावेळची स्वतंत्र निर्माती आणि

आजची 'पॅरामाऊंट पिक्चर्सची' अध्यक्षा शेरी लान्सिंग हिने तिचे चित्रपटाचे हक्क विकत घेतले. ती म्हणाली, "मी हस्तलिखित वाचलं आणि मला कळून चुकलं की हा उत्तम चित्रपट होईल."

श्रीमती गोल्डस्मिथचे आयुष्यच ह्या घटनेने बदलून गेले. श्रीमती लान्सिंगने तिच्या क्रेडिट कार्डावरचे तुंबलेले बील द्यायलाही मदत केली असे श्रीमती गोल्डस्मिथचे म्हणणे.

तिथून मग तिच्या कर्तृत्वाने भरारी घेतली. १९९२ मध्ये हार्पर कॉलीन्स कंपनीने तिच्याबरोबर तीन पुस्तकांचा करार केला – तीन मिलीअन डॉलर्सना. 'आता माझ्याजवळ गरजेपेक्षा जास्त पैसे नसले तरी बचत करण्यापुरते तरी पैसे माझ्या हाती आहेत.' हे तिचे शब्द !

तिचा चिकटपणा सोडून द्या. 'सगळी मदार स्थावर, जंगम वस्तूंवर आणि पैशा-अडक्यावर ठेवू नये हे मी आता शिकले आहे.' हे श्रीमती गोल्डस्मिथचे विचार. "जवळ भरपूर वस्तू असणे छानच पण त्या योग्य जागी योग्य पद्धतीने ठेवणे हे अधिक महत्त्वाचं ! आता माझी जीवनपद्धती खरोखरच छान आहे. याहून काही हवे असंही मला वाटत नाही."

आता तिला बॉयफ्रेंडही मिळाला आहे. पॉल स्मिथ – मॅन हॅटनच्या रेकॉर्डिंग स्टुडिओत साऊंड इंजिनिअर असलेला हा मुलगा गेली ९ वर्षे तिचा मित्र आहे. श्रीमती गोल्डस्मिथच्या पडत्या काळात ज्या शिक्षिकेने तिला अगदी किराणा आणायलासुद्धा पैशांची मदत केली तिचाच हा मुलगा !

श्रीमती गोल्डस्मिथ आता शपथपूर्वक सांगते की ती तिच्या आर्थिक बाबींवरचा ताबा आता परत कधीही सोडणार नाही – म्हणजेच पुन्हा लग्न करणार नाही. कारण अमेरिकन न्यायपद्धती स्त्रीला योग्य न्याय मिळवून देईल ह्यावर तिचा काडीचा विश्वास नाही. श्रीमती लुइझा स्मिथ – पॉलची आई – श्रीमती गोल्डस्मिथची मैत्रीण – हिला ह्या तरुण स्त्रीच्या दृष्टीकोनाबद्दल सहानुभूती आहे. तिलाही अमेरिकन न्यायपद्धतीने हिसका दाखवलेला आहे.

पॉल स्मिथ म्हणतो की, "श्रीमती गोल्डस्मिथला वारंवार सांगत राहावं लागतं की बरेचसे पुरुष हे सुसंस्कृत असतात. हे खरं असलं तरी तिला तिच्या लेखिका म्हणून असलेल्या प्रसिद्धीमुळे अनेक लिंगद्वेषी व्यक्तींकडून अनेक प्रकारच्या पत्रांतून भरपूर मालमसाला मिळतो. तो तिला तिच्या पुढच्या कादंबऱ्यांसाठी उपयोगी पडतो. तरुण पत्नी मिळविण्यासाठी धनाढ्य नवऱ्यांकडून सोडचिठ्ठी दिल्या गेलेल्या परित्यक्त्या स्त्रियांकडून दर आठवड्याला सरासरी दीडशे पत्रे तिला येतात."

ती म्हणते, "त्यातलं एक अविस्मरणीयच ! टेक्सासमधल्या एका फुटबॉल प्लेअरची ती बायको. तिच्या नवऱ्याची वार्षिक कमाई सात आकडी. पत्रात ती म्हणते 'जेव्हा ते कोर्टात पोहोचले तेव्हा न्यायाधीशाने त्याची 'स्वाक्षरी' मागितली. हिच्या स्वत:च्या वकिलानेही मागितली. कोर्टाकडून तिला मिळाले दरमहा डॉलर्स दोनशेवीस फक्त !'

**– प्रतिभा टिल्लू**



अनुक्रमणिका

## ३) 'एका इराणी लेखकाचे अनावृत्त पत्र' – शाऊल बख्श

फराज सारकुही, इराणी लेखक आणि अदिनाह (Adineh) ह्या साहित्यपत्रिकेचा संपादक ह्याने इराणच्या गुप्तहेरखात्याने (मिनिस्ट्री ऑफ इंटलिजन्स) किंवा स्टेट सिक्युरिटीच्या एजंटानी त्याला परत अटक करण्यापूर्वी (म्हणजेच २७ जानेवारी १९९७ पूर्वी) एक अनावृत्त पत्र लिहून ठेवले आहे. ह्या पत्रात तो म्हणतो की, "माझी अटक आता अगदी येऊन ठेपलेली आहे. एकतर मला अपघाती मृत्यू येईल, माझा मृत्यू आत्मघात म्हणून जाहीर केला जाईल किंवा मला कैदेत पडावे लागेल. छळ, यातना, तुरुंग, मृत्यू अगदी माझी वाटच पाहात आहेत."

गेल्या पाच महिन्यातली ही सारकुहीची चौथी अटक. सारकुहीचे वृत्तपत्र हे डाव्या विचारसरणीचे वृत्तपत्र. पण हा त्रास ह्या वृत्तपत्रामुळे तितकासा मिर्नाण झालेला नाही. उच्चार स्वातंत्र्याला दिलेल्या पाठिंब्यामुळे आणि सगळ्या बुद्धिवाद्यांमागे इराणी सरकारचा जो ससेमिरा आहे त्यांच्याविरुद्ध बोलल्यामुळे सारकुहीच्यामागे ही पीडा लागलेली आहे.

एक इराणी व चार लेबनीजवर जर्मनीमध्ये एक खटला चालू आहे. त्यामुळे जर्मन सरकारची अप्रतिष्ठा करण्याचा जो एक कट इराणच्या गुप्तहेर खात्याने आखला आहे त्या लाटेत दुर्दैवाने सारकुही सापडलेला आहे. इराणच्या कुर्दीश डेमोक्रटिक पार्टीचा एक नेता आणि त्याचे तीन सहकारी १९९२ मध्ये बर्लिनमधल्या मायकॉन्स रेस्टॉरंटमध्ये जेवत असताना त्यांचा खून केल्याचा आरोप या पाच जणांवर आहे. मार्च १९९६ मध्ये जर्मन फेडरलच्या वकिलाने (Prosecutor) अली फलाहिन ह्या गुप्तहेरखात्याच्या मंत्र्यावरच पकड वॉरंट काढले. ह्या हत्येचा कट रचल्याचा आरोप त्याच्यावर केला. त्यामध्ये इराणचा सर्वोच्च नेता अली खोमेनी ह्याचाही अंतर्भाव करण्यात आलेला आहे. ह्या उघडउघड केलेल्या आरोपामुळे इराण सरकारचे माथे भडकले आणि सारकुहीच्या दुर्दैवाला सुरुवात झाली.

१३४ लोकांनी खुल्या अभिव्यक्तीची मागणी करणारा एक जाहीरनामा ऑक्टोबर ९४ मध्ये प्रसिद्ध केला. त्यावर सही करणाऱ्यांमध्ये सारकुहीदेखील होता. घडले होते असे की अली अकबर सैदी सिरजानी ह्या वक्रोक्तीपूर्ण लेखन करणाऱ्या मान्यवर लेखकाला हेरगिरी, समलिंगी संभोग, गर्द घेणे अशा प्रकारच्या आरोपाचे कुभांड रचून तुरुंगात टाकण्यात आले. त्या संदर्भात वरील जाहीरनामा काढण्यात आला होता. पुढे नोव्हें. ९४ मध्ये तो तुरुंगातच मरण पावला. त्यानंतर घटना घडतच गेल्या. ह्या जाहीरनाम्यावर सही करणाऱ्यांपैकी आणखी दोन लेखक मरण पावले.

१९९५ मध्ये भाषांतरकार अहमद मिर अलाई ह्याचे शव त्याच्या नेहमीच्या वस्तीपासून आणि नेहमीच्या वावराच्या जागांपासून तिसरीकडेच सापडले आणि तेही सरकारी कृपेमुळे अशी बोलवा आहे. नोव्हें. १९९६ मध्ये गफार हुसेन हा भाषांतरकार आणि निबंधकार आपल्या घरातच मेलेला आढळला. आपल्याला मारले जाईल आणि तो नैसर्गिक मृत्यू

म्हणून जाहीर होईल ह्याची भीती सारकुहीला का वाटते हे वरील घटना प्रसंगांवरून सिद्ध होईल.

गेल्या ऑगस्टमधली एका संध्याकाळची गोष्ट. सारकुही आणि इतर पाच महत्त्वाचे लेखक आणि बुद्धिमंत जर्मन सांस्कृतिक राजदूताचे मंत्री श्री. जेम्स गट ह्यांच्या घरी भोजनासाठी जमले होते. सरकारी सुरक्षा अधिकारी आत घुसले. त्यांनी सगळ्या पाहुण्यांचे फोटो घेतले. इराणी लोकांना ताब्यात घेतले. दुसऱ्या दिवशी वर्तमानपत्रांपर्यंत बातमी पसरवली गेली की इराणी लेखक दारू पीत होते आणि पडदा नसलेल्या स्त्रियांबरोबर गंमत करीत होते. लगेचच काही घडले नाही पण हेरगिरी, बेकायदेशीर हालचाली इत्यादी आरोपांची ही पूर्वतयारी चालू आहे ह्याचे त्यांना भय वाटले – सारकुहीच्या बाबतीत हेच तर घडले होते.

सप्टेंबरमध्ये सारकुहीसकट बरेचसे लेखक एकत्र जमून लेखक संघाच्या एका जाहीरनाम्याचा तर्जुमा तयार करीत होते. ह्या जाहीरनाम्यात परत एकदा अभिव्यक्ती स्वातंत्र्यावर भर दिलेला होता. सुरक्षा अधिकाऱ्यांनी ही बैठक मोडली. नंतर सारकुही दोन दिवस कोठडीत होता. त्याची ह्या काळात कसून चौकशी केली गेली. त्याला भरपूर मारही बसला.

बायकोमुलांना भेटायला जर्मनीत जायचे म्हणून सारकुही ३ नोव्हेंबरला तेहरान विमानतळावर आला आणि तिथूनच तो गायब झाला. इराणी अधिकारा म्हणतात तो विमानात चढला तर जर्मन अधिकारी म्हणतात त्याने जर्मनीत पाय ठेवल्याचा कोणताही दस्तऐवज नाही. परत २० डिसेंबरला सारकुही तेहरान विमानतळावर अचानक उपटला आणि त्याने वार्ताहर परिषद घेतली. तो म्हणाला, 'मी एवढा काळ जर्मनीतच होतो. पण माझ्या बायकामुलांना मी भेटलो नाही. तुर्कमोनिस्तानकडून मी इराणला परत आलो.' इराण्यांनी नंतर ज्याच्यावर जर्मन प्रवेश परवानगीचा शिक्का उमटलेला आहे असा सारकुहीचा पासपोर्ट दाखवला पण 'दी वेल्ट' ह्या जर्मन वृत्तपत्राने खात्रीलायक माध्यमाकडून मिळालेल्या बातमीनुसार तो ठसा खोटा आहे असे म्हटले होते.

सारकुहीने पत्रात म्हटल्याप्रमाणे वास्तविक त्याला तेहरान विमानतळावरच पकडण्यात आले आणि चौकशीसाठी सात आठवडे त्याला भयानक त्रास देण्यात आला. मानसिक दबावाखाली आणि मारहाण करून त्याच्याकडून पुढील गोष्टींची कबुली घेण्यात आली –

– तो परकीय सरकारचा हस्तक आहे.

– तो फ्रान्स आणि जर्मनीसाठी हेरगिरी करीत आहे.

– त्याने त्याच्या वृत्तपत्राला आदर्शवादी स्वरूप दिले ते जर्मन आणि फ्रेंच दूतावासाच्या सांगण्यावरून.

– त्याचे अनेक स्त्रियांशी विवाहबाह्य संबंध आहेत.

– त्याचे इतर लेखक मित्रही इतर स्त्रियांशी असे संबंध ठेवून आहेत.

ह्या कबुलीजबाबाचे व्हिडीओ शुटिंग केले गेले आणि त्या मुलाखती वाटाव्यात अशा प्रकारे रचना केली गेली. ह्या मुलाखती सप्टेंबरमध्येच घेतल्या गेल्या म्हणजेच तो जर्मनीला जाण्यापूर्वी असेही भासविले गेले. वीस तारखेच्या पत्रकार परिषदेत सगळ्या गोष्टी त्याला पढवल्या गेल्या होत्या – जर्मन मंत्र्याबरोबरची डिनर पार्टी, त्याचा जबरदस्तीने घेतलेला कबुलीजबाब, जर्मनीला कधीच न दिलेली भेट – आणि त्याला तसेच बोलणे भाग पडले. ह्या सगळ्या घटना एकमेकात इतक्या बेमालूम मिसळलेल्या होत्या की जर्मन लोक खरोखरीच हेर आहेत, इराणी अधिकाऱ्यांना उगाचच अनैतिक आणि अप्रामाणिक ठरविण्याचा उद्योग करीत आहे असे वाटावे.

वीस डिसेंबरच्या विमानतळावरील वार्ताहर परिषदेनंतर सारकुहीला सोडण्यात आल आपल्याला पुन्हा अटक होईल किंवा ठार मारण्यात येईल ह्या भीतीने सारकुहीने एक सविस्तर पत्र लिहून ठेवले. ह्या पत्रात त्याने हा खोटा कबुलीजबाब आपण का दिला, ह्या बनावात आपण साथ का दिली ह्यासंबंधी खुलासा केला आहे. त्याच्या अटकेचा आणि चौकशीचा सगळा वृत्तांत त्यात त्याने नमूद केला आणि हे पत्र देशाबाहेर पाठविले.

ह्या पत्रावरून एक गोष्ट लक्षात येते की स्टॅलीनच्या राजवटीत रशियात जो मानसिक आणि शारीरिक छळ करण्यात येत असे तोच आता इराणमध्ये वापरला जातो आहे. इराणच्या लेखक आणि बुद्धिवाद्यांच्या सुरक्षा अधिकाऱ्यांनी केलेल्या अनन्वित छळ कहाण्यांपैकी एक म्हणजे सारकुहीचे दुर्दैव! गेल्या तीन वर्षात अनेक वृत्तपत्रे व मासिके बंद करण्यात आली. किंवा त्यांना टाळे ठोकण्यात आले. जानेवारी ९६ मध्ये 'गार्डन' ह्या मासिकाच्या संपादकाला ६५ फटके आणि ६ महिने कैद अशी शिक्षा झाली.

त्याचा मुद्रणपरवाना रद्द करण्यात आला. कोणत्याही प्रकारची वृत्तपत्रकारिता करण्यापासून त्याला दोन वर्षाकरिता प्रतिबंध करण्यात आला. कैद होण्यापूर्वीच तो परदेशात पळून गेला. इस्लाम धर्म सर्व धर्माचा (Phiralism) आणि अभिव्यक्ती स्वातंत्र्याचा मान ठेवतो असे म्हणणारा प्रसिद्ध इस्लामिक तत्त्वज्ञ अब्दुल करीम सोरुश ह्याला स्वत:लाच १९९५ पासून जाहीर भाषण करायला बंदी करण्यात आली आहे. प्रतिबंध करणाऱ्यांनी त्याच्या थोबाडीत ठेवून दिली आणि त्याला तेहरान आणि इस्पाहान मध्ये विद्यापीठाच्या विद्यार्थ्यांपुढे बोलूच दिले नाही.

टी. व्ही वरच्या 'व्यक्तिमत्त्व' (Identity) ह्या आता बदनाम झालेल्या कार्यक्रमाचे सूत्रधार बहुधा सरकारी गुप्तहेरखातेच असावे. पाश्चिमात्याळलेले बुद्धिवादी लेखक, कलावंत ह्यांना मुस्लीम विरोधक (काफर), अनीतिमान, इस्लाम प्रजासत्ताकाशी अप्रामाणिक असणारे ठरवून त्यांच्यावर ह्या कार्यक्रमात राळ उडविली जात असे. ह्या कार्यक्रमात ज्यांच्यावर टीका करण्यात येत असे त्यांच्या चेहऱ्यावरून बेंजामिन फ्रँकलिनचे चित्र असलेली १०० डॉलरची अमेरिकन नोट विरघळत असलेली दाखवली जात असे.

सरकारी सूत्रे म्हणतात की सारकुही देश सोडून पळून जात होता म्हणून आम्ही त्याला

अटक केली. त्याचे मित्र म्हणतात तो नेहमीप्रमाणे साप्ताहिक हजेरी लावायला गुप्तहेर खात्याच्या कचेरीत गेला असताना त्याला कैद झाली. 'पेन' ह्या आंतरराष्ट्रीय संस्थेच्या म्हणण्याप्रमाणे तो तूर्तास कैदेत आहे.

## एक अनावृत्त पत्र

**– फराज सारकुही**

आज तीन जानेवारी, मी, फराज सारकुही, हा मजकूर अत्यंत घाईघाईने लिहीत आहे. हेतू हा की कधीतरी, कोणीतरी हा मजकूर वाचील आणि इराणी लोकांना आणि जगातल्या सगळ्याच लोकांना – विशेषत: माझ्या लाडक्या फरिदाह, अराश आणि बहार यांना– कळेल की मी किती भयानक अनुभवांना सामोरा गेलेला आहे. कदाचित ही चिठ्ठी कोणापर्यंत कधीच पोचणारही नाही ही सुद्धा शक्यता आहे. पण मला मात्र आशा आहे की कोणीतरी ती वाचील आणि माझ्या अटकेनंतर किंवा मृत्यूनंतर ती प्रसिद्ध करील आणि माझ्या यातना, वेदना, हालअपेष्टा ह्यांना पुराव्यादाखल एक दस्तऐवज राहील.

हातात किती वेळ शिल्लक आहे – ठाऊक नाही. मला लगेचच अटक होईल किंवा माझा खून होईल आणि तो आत्मघात म्हणून जाहीर होईल. छळ, तुरुंग, मृत्यू माझ्या अगदी दाराशी उभे आहेत. इथे मी फक्त काय घडलेय ते नमूद करणार आहे. खरेतर मला माझी सुद्धा कैफियत मांडायची आहे.

इराणच्या माहिती खात्याने (Ministry of information) आखलेल्या आणि अमलात आणलेल्या कटाचा मी एक बळी ठरलो आहे आणि अजून ती प्रक्रिया पूर्ण व्हायचीच आहे. पुढे काय ? मला ठाऊक नाही. आतापर्यंत काय घडले हे मी लिहितो आहे.

मला मेहेराबाद विमानतळावर ३ नोव्हेंबरला अटक करण्यात आली. त्यांनी माझे डोळे बांधले आणि एका मोटारीने मला गुप्त ठिकाणी असलेल्या हेरखात्याच्या एका तुरुंगात नेण्यात आले. २० डिसेंबरला माझी सुटका होईपर्यंत मी तिथेच होतो. इथे त्यांच्या कटाचा मुख्य भाग सुरू झाला.

त्यांनी जी कागदपत्रे तपासणीच्या काळात मला दाखवली त्यावरून आणि त्यांच्या आपसातल्या बोलण्यावरून माझ्या एवढे लक्षात आले की त्यांनी माझ्या पासपोर्टवरचा फोटो बदलला आहे. दुसऱ्या कुणाचा तरी फोटो त्या जागी लावलेला आहे. त्या व्यक्तीला माझे परदेशी चलन देण्यात आले. त्याने काही खरेदीही केली आणि तो माझ्या पासपोर्टसह मी म्हणून हॅम्बुर्गला गेला. आता माझ्या पासपोर्टवर हॅम्बुर्गमध्ये प्रवेश केल्याचा शिक्का आहे. नंतर मला असे कळले की तेहरानमधल्या माझ्या एका मैत्रिणीकडे त्यांनी कोणालातरी पाठविले आणि सांगितले की माझे विमान उशीरा येणार आहे. मी लुफ्तानसाने येत आहे.

तिने जर्मनीत फोन करून माझ्या कुटुंबियांना सांगावे की त्यांनी विमानतळावर येऊ नये.



अनुक्रमणिका

परवीनचा निरोप फार उशीरा पोचला आणि काही मंडळी मला भेटायला विमानतळावर आली होती. हेरखात्याच्या योजनेप्रमाणे आतापर्यंत गोष्टी सरळ घडत गेल्या.

पहिल्या दुसऱ्या दिवशीच त्यांनी मला उघड उघड सांगितले की मी 'हरवलो आहे.' "अधिकृतपणे असे जाहीर केले गेले आहे की तू इराण सोडून गेला आहेस आणि जर्मनीच्या हॅम्बुर्ग विमानतळावर तुझ्या जर्मन प्रवेशाची पासपोर्टवर नोंद झाली आहे. तू काही काळ या बंदिवासात एकाकीच राहशील. मुलाखती आणि चौकशी आटपली की आम्ही तुला ठार मारू. नंतर तुला गुपचूप पुरून टाकू – किंवा तुझे प्रेत आम्ही जर्मनीमध्ये टाकून देऊ." तिसऱ्या किंवा चौथ्या दिवशी त्यांनी मला फोनवरचे एक ध्वनिमुद्रित संभाषण ऐकवले. माझा भाऊ इस्माइल माझ्या पत्नीला– फरीदाला सांगत होता की मेहेराबाद विमानतळावर असे अधिकृतपणे जाहीर करण्यात आले आहे की मी इराण सोडले आहे. हे त्यांनी मला अशासाठी ऐकवले की त्यांच्या बोलण्यातले गांभीर्य माझ्या ध्यानी यावे.

ताण वाढतच होता. माझी भावनिक आणि मानसिक स्थिती कोणाला उमगणेच कठीण आहे. मृत्यू माझ्यापुढे ढळढळीत उभा होता. मला कसलीच आशा उरली नव्हती. मी अधिकृत कैदी नव्हतो. मी परागंदा झालेला होतो. माझा पत्ताच लागलेला नव्हता. मृत्यूदंड झालेल्या कैद्यापेक्षाही माझी स्थिती अगदीच वेगळीच होती. मरणाच्या दारात नेऊन उभ्या केलेल्या कैद्याला सुद्धा दयेची याचना करता येते, पत्र लिहिता येते, मृत्यूपत्र करता येते. सर्वसाधारण कैद्याला तुरुंगातून सुटण्याची आशा बाळगता येते. पण माझ्यासाठी मात्र मृत्यू 'अतिसमीप' उभा होता. मी देश सोडून गेल्याचे जाहीर झालेले होते. वेदना, दुःख...... जणू मी जिवंतपणीच गाडला गेलो होतो. शारीरिक आणि मानसिक ताणतणांवानी मला चिरडून टाकले, उद्ध्वस्त केले.

त्यांच्या तपासण्या सुरू झाल्या. मी सप्टेंबरमध्ये दोन दिवस अटकेत होतो. त्या काळाची जुनी तारीख ह्या कबुलीजबाबावर माझ्याकडून सक्तीने घालून घेतली. हळूहळू माझ्या लक्षात वेगळीच गोष्ट यायला लागली. त्यांना माझ्यामध्ये किंवा माझ्या तपासण्यामध्ये गम्य नाही. त्यांना मला स्टेजवर उभे करून माझी मुलाखत दाखवायची आहे. त्यांनी लिहून दिलेला मजकूर पाठ करून तसाच्या तसा मी टीव्ही कॅमेऱ्यासमोर म्हणून दाखवायचा होता. ह्या सगळ्याचे व्हीडिओ कॅमेऱ्यात ते चित्रण करीत होते. त्यांनी ह्या कैदेच्या काळातच सगळ्या खोट्या, बनवेगिरीच्या मुलाखती जबरदस्तीने चित्रित केल्या. इतर लेखकांबद्दल ह्या मुलाखतीत चर्चा होती, ती त्यांनी लिहून दिलेलीच होती आणि तद्दन खोटी होती.

अर्थात मुलाखतीचा बराचसा भाग हा हेरगिरीसंबंधातच होता. त्यांनी मला हे कबूल करायला लावले की मी मॅनव्हिले ह्या फ्रेंच सांस्कृतिक अधिकाऱ्यासाठी आणि गट्स ह्या जर्मन सांस्कृतिक अधिकाऱ्यासाठी हेरगिरी केली. इतकेच नव्हे तर मला ह्यासाठी त्यांच्याकडून पैसे मिळत होते, जर्मनीत जर्मन सरकार माझ्या पत्नीला पैसे देत होते, मॅनव्हिले आणि गटने माझ्या वृत्तपत्राला – अदिनाहला – तत्त्वप्रणालीत्मक सूचना

(Ideological instructions) दिल्या. हे सगळे कुभांड त्यांनी रचले आणि मला ते उच्चारून दाखवावे लागले.

ह्या मुलाखती खऱ्या वाटाव्यात म्हणून त्यांनी आणखी एक गोष्ट केली. त्यांनी मॅनव्हिले आणि गटबद्दल काही माहिती लिहून दिली. ती मला पाठ करायला लावली. उदा. गट्स हा श्रीमंत आहे, त्याचे घर प्रशस्त आहे, त्याला जुन्या वस्तू खूप आवडतात, त्याला ह्या ह्या व्यक्ती आवडतात, ह्या ह्या आवडत नाहीत इत्यादी मला कॅमेऱ्यासमोर बोलावे लागले. ही मुलाखत विश्वसनीय वाटण्याइतकी नीट होईपर्यंत ते मला मारहाण करीत असत.

ह्या मुलाखती असंख्य वेळा चित्रित केल्या गेल्या आणि प्रत्येकवेळी मी माफी मागावी, क्षमायाचना करावी असे त्यांचे म्हणणे असे. नंतर त्यांनी मला असेही सांगायला लावले की माझा अनेक स्त्रियांशी संबंध आहे. वस्तुत: ह्यापैकी कैक स्त्रियांना मी पाहिलेले देखील नव्हते. इतर लेखक एकमेकांच्या पत्नीबरोबर लैंगिक संबंध ठेवून आहेत असेही मी ह्या मुलाखतीत सांगावे अशी त्यांनी जबरदस्ती केली.

पण महत्वाचा मुद्दा हेरगिरी हा होता. तुम्ही असे विचाराल की ही मानहानी मी का पत्करली? मी त्यांच्या मागण्यांना मान का तुकवली? मला माझी सफाई द्यायची नाही पण प्रत्येक मुलाखतीनंतर मी मृत्यूच्या जवळजवळ जातोय हे मला जाणवत होते. विलक्षण शारीरिक आणि मानसिक ताण होता. मी अगदी विदीर्ण झालो होतो. जेवढ्या लवकरात लवकर ते हे काम संपवतील व मलाही संपवतील तेवढ्या लवकर माझी छळयातनातून सुटका होईल अशी माझी धारणा झाली होती. मी बऱ्याचदा ह्या चौकशांच्या कागदावरच त्यांना विनंतीपत्र लिहीत असे की त्यानी ताबडतोब मला ठार मारावे किंवा मला अशी काही गोष्ट द्यावी की मी स्वत:लाच संपवू शकेन.

भयाण एकाकीपणा, सततच्या चौकशांमुळे होणाऱ्या शारीरिक आणि मानसिक यातना, वेड लागणाच्या किंवा कोलमडून पडण्याच्या स्थितीचा अगदी कडेलोट ह्या सगळ्यातून असे काही क्षण येत की माझी विचारशक्ती काम करीत नसे. त्यांच्या मनात काय आहे ह्याचा मला थोडासा अंदाज यायला लागला.

अजूनही कार्यान्वित असलेल्या ह्या कटामुळे अनेक गोष्टी त्यांना साधायच्या आहेत पहिली गोष्ट म्हणजे मायकॉन्स प्रकरणात जर्मनीला सामोरे जाणे सुलभ व्हावे, दुसरे म्हणजे स्वदेशातच मायकॉन्स प्रकरणाचे जे प्रतिकूल पडसाद उमटले होते त्यांना प्रतिउत्तर देण्यासाठी प्रचार करणे, तिसरा उद्देश माझ्यासकट सगळ्या बुद्धिमंताना लोकांच्या नजरेतून उतरविणे. बुद्धिमंताना घाबरवून टाकणे की जेणेकरून ते चूप बसतील. थोडक्यात जर्मनीला जाळ्यात पकडणे, मॉयकान्समधल्या हत्येचे परिणाम कमी करण्यासाठी प्रचार करणे, इराणमध्ये बुद्धिमंताना कमीपणा देणे, लेखकांचा दहशत बसविणे, माझे शारीरिक आणि नैतिक खच्चीकरण करणे ही त्यांची ध्येय होती. माझ्या जबरदस्तीने घेतलेल्या मुलाखतीमधून दुसरे, तिसरे व चौथे ध्येय साधणार होते. पण पहिले ध्येय जर्मनीला भेवडावून त्यांच्याकडून

या खटल्यातून सुटका करून घेणे त्यांना साधले नव्हते. अजूनही ते त्या गोष्टीच्या मागेच होते.

शहाच्या तुरुंगात मी आठ वर्षे काढली होती. त्याच्या कारकिर्दीत मला कैकवेळा पकडून तुरुंगात टाकण्यात आले. पण ह्या ४७ दिवसातल्या फक्त ५ मिनिटात सुद्धा मी जे दुःख आणि पीडा सहन केली त्याची तुलना ती आठ वर्षे एकत्र केली तरी होऊ शकणार नाही.

माझ्या पासपोर्टवरचा नोंदीचा शिक्का जर्मन सरकारकडून मान्य करून घेणे ही त्यांची खरी डोकेदुखी होती. ह्यासाठी त्यांना माझ्या पासपोर्टवरचा तो शिक्का उघडपणे लोकांना दाखवणे भाग होते म्हणून ते पुढच्या उद्योगाला लागले.

त्यांनी मला सांगितले की ते मला थोड्या काळाकरिता सोडणार आहेत आणि मी त्यांनी सांगितल्याबरहुकूम वागायचे आहे. मी मान्य केले. मी सध्या ज्या स्थितीत होतो त्यापेक्षा मृत्यू किंवा पुन्हा कैद मला काहीही परवडण्यासारखे होते. मेहदाबाद विमानतळावर त्यांनी मला पुन्हा हजर केले. माझे पुनरागमन झाले म्हणून पत्रकार परिषद आयोजिली. मी पत्रकारांना दिलेली मुलाखत प्रसिद्ध झाली. बीबीसीला व फ्रेंच रेडिओला देखील मी मला पढवल्याप्रमाणेच सांगितले. २० डिसेंबरला माझी सुटका झाली खरी पण मी होतो पहाऱ्याखालीच!

मला अटक होईल, मला ठार मारतील व मी आत्महत्या केली असे म्हणतील किंवा ते मला दुसरी मुलाखत द्यायला लावतील किंवा दुसरे काहीही...... की ज्याचा विचार सुद्धा मला आता करता येत नाही. सध्या त्यांचा महत्त्वाचा प्रश्न आहे हम्बुर्गचा शिक्का. तो मान्य झाला रे झाला की ते लगेच म्हणायला मोकळे होतील की सारकुही त्याच्या घरगुती प्रश्नांबद्दल उगाचच बोलत होता – तो होता खरोखरीच एक हेर.

मी अगदी मोडून गेलो आहे. उद्ध्वस्त झालो आहे. निराश झालो आहे. माझ्या ह्या कथानकापुढे जॉर्ज ऑरवेलचे '१९८४' अगदीच बुळबुळीत ठरेल. मलाच कळत नाही आणखी काय लिहावे ! शेवट समोर दिसतोच आहे.

समजा हे पत्र कुणाला मिळेलच तर त्याने ते माझ्या बायकोकडे पाठवावे. मला अटक केल्याबरोबर पहिल्या तीन दिवसात किंवा माझ्या मृत्यूनंतर एक दिवसाने ते पोचेल एवढी व्यवस्था करावी. त्यायोगे ती ते छापून आणू शकेल. समजा नाहीच सापडले कुणाला– मी तर मरणारच आहे. खरे सांगायचे तर माझा अंत झाला आहे – डिसेंबर २० रोजीच !

**– नाना जोशी**

---

हृदय ज्यावेळी बोलते त्यावेळी त्यावेळी त्याविषयी आक्षेप उपस्थित करणे हे असभ्यपणाचे लक्षण आहे असे मनास वाटते.

**– मिलान कुंडेरा**

---





## ४) सोल्झेनित्सिन

सोल्झेनित्सिन हे आता तसे मागे पडले आहेत. काहीसे कालबाह्य ठरले आहेत. थोडक्यात सध्या ते फॅशनमध्ये नाहीत. म्हणूनच त्यांच्याबद्दल महत्त्वाची पुस्तके प्रसिद्ध होत असून त्याची दखल घेण्यात येत नसावी. १९७४ साली त्यांनी युरोपमध्ये प्रथम पाऊल टाकले, ते प्रचंड अशा प्रसिद्धीच्या झगमगाटात. जर्मनीत प्रवेश केल्यानंतर दुसरे एक महान लेखक, तेही नोबेल पारितोषिक विजेते-हाईनरिक बॉईफ (Heinrich Beff) यांनी त्यांचे स्वागत केले होते. अमेरिकेला प्रिय असलेल्या मोटारीच्या मॉडेलच्या भाषेत सांगावयाचे झाल्यास सोल्झेनित्सिन हे पास्टरनाक मार्क टू होते. नोबेल पारितोषिक विजेता लेखक. शिवाय सोव्हिएट युनियनच्या मृत्यू छावण्यात आठ वर्षे प्रत्यक्ष घेतलेला अनुभव, या सर्वच गोष्टीमुळे ते त्याकाळात निदान पाश्चिमात्य देशात तसे चलनी नाणे होत. ते तत्कालीन जनतेचे आशास्थान व आधारस्तंभ असतीलही. पण खुद्द सोल्झेनित्सिन तसे अस्वस्थच होते. ते आपल्या उपकारकर्त्यावरच तुटून पडत होते. त्यांचे वागणे हे खाल्ल्या घरचे वास मोजण्यासारखे आहे असे काही लोकांना तरी वाटले.

परंतु ते जे काही सांगत होते त्यात तसे काही चूक होते. याउलट त्यांचे म्हणणे, हे तसे अधिक न्याय्य व अचूक होते हे मागाहून सिद्ध झाले. सोल्झेनित्सिन त्यावेळी सांगत होते,"पाश्चिमात्य राष्ट्रे, ही कम्युनिस्टांच्या बाबतीत, नैराश्यजनक परिस्थिती निर्माण व्हावी इतकी बोटचेपी भूमिका घेतात. व्हिएटनाममधल्या परिस्थितीबाबत तावडतोब जर काही केले नाही तर त्या युद्धात महाभयानक असा उत्पात घडणार आहे. मानवाच्या दृष्टीपथात जे जे काही आहे, त्या त्या सर्वांचे रॉक संगीत पार निकाल लावून टाकील"...... इत्यादी. ही विधाने ऐकून पाश्चिमात्य देशात कुरकुर झाली नसती तरच नवल. सरतेशेवटी अमेरिकेतल्या वनराजीने पुरेपूर नटलेल्या व्हरमाँट राज्यात ते राहावयास गेले. या राज्यात, पूर्व किनाऱ्यावरील इतर राज्यांपेक्षा लोकवस्तीही विरळ आहे. ती इतकी विरळ आहे की अमेरिकेत असे गमतीने म्हणण्याचा प्रघात आहे की व्हरमाँट राज्यात माणसांपेक्षा गाईंची संख्याच अधिक आहे ! या राज्यात थंडीही नेहमीच कडाक्याची असते. थोडक्यात बर्फाळ,त्यामानाने निर्जन अशा प्रदेशात, काटेरी कुंपणामागे सोल्झेनित्सिन एकटेच आपले लिखाण करीत अनेक वर्षे राहात होते. त्यांच्याकडे तसे कोणी लक्षही देत नसे.

थोडक्यात ते बाद ठरलेले एकेकाळचे चलनी नाणे होते. हे असेच होईल असे भविष्य रशियन गुप्त पोलिस संघटनेचे प्रमुख आँद्रोपोव्ह यांनी सोल्झेनित्सिनना सोव्हिएट युनियनमधून हद्दपार करताना काढले होते.

सोल्झेनित्सिन रशियाला मायदेशी परतले आहेत. कवी हे मानवजातीसाठी सामाजिक कायदे करतात, अशा अर्थाची ओळ एका प्रख्यात इंग्लिश कवीने फार मागेच लिहिलेली आहे. सोव्हिएट रशियात अगदी अलिकडच्या काळापर्यंत ही त्या इंग्लिश कवीची ओळ

अत्यंत गंभीरपणे विचारात घेतली जात असे. परंतु सध्या कायदे पसार करणाऱ्या आमदार-खासदारांना सोव्हिएट युनियनमध्ये फारच वाईट दिवस आले आहेत. याचा परिणाम सोल्झेनित्सिन मायदेशी परतल्यानंतर त्यांची दखल फारशी कोणी घेतली नाही व त्यांना प्रतिष्ठाही मिळाली नाही.

याउलट त्यांची खरे म्हणजे चेष्टाच होते आहे. या सर्वाला सोल्झेनित्सिनच कारण आहेत असे वाटते. त्यांच्या मते 'सोल्झेनित्सिन यांनी पुन्हा एकदा' खाल्ल्या घरचे वासे मोजायला सुरुवात केली आहे.' अशी अनेकांची भावना आहे. या आपल्या भावनेच्या समर्थनार्थ ते अनेक घटनांकडे बोट दाखवितात. उदा. ड्यूमा या रशियन विधानसभेतल्या सदस्यांशी त्यांनी अत्यंत उर्मटपणे वर्तन केले; इतक्या उर्मटपणे की, तो उर्मटपणाचा सदैव आदर्श ठरावा.

सोल्झेनित्सिन हे आपले अलिकडचे लिखाण फार जुन्या काळच्या रशियन भाषेत करतात. त्याचा परिणाम असा होतो की विद्यमान रशियनांना ते लिखाण जवळ जवळ समजतच नाही. या सर्व लिखाणात रशियन राज्यक्रांतीत अंतर्भूत असलेल्या प्रत्येक दणक्याचे वर्णन आहे. विद्यमान रशियन भाषा ही दिवसेंदिवस रानटी होत चालली आहे, असे ते सांगतात.

रशियन भाषेची ही जी अवनती होते आहे त्याविरुद्ध ते एकट्यानेच लढा देत आहेत; असा त्यांचा दावा आहे. सोल्झेनित्सिन हे आजकाल 'जुन्या' रशियन भाषेत लिहीत असल्याकारणाने, परदेशी भाषात त्यांचे भाषांतर होणे, हे दिवसेंदिवस कठीण झाले आहे. ते काहीही असो, रशियन ही ज्याची मातृभाषा नाही अशा एका साहित्य समीक्षकाने वेगळेच मत नोंदविले आहे. हे समीक्षक सांगतात की सोल्झेनित्सिन यांच्या अलिकडच्या लिखाणाचे ते फारच मोठे चहाते आहेत. हे त्या समीक्षकाचे मत ऐकल्यानंतर, त्यांचा रशियन मित्र त्यांना म्हणाला,"त्या लिखाणाचे वाचक फक्त दोन ! एक तू, आणि सोल्झेनित्सिन यांच्या 'सासूबाई' !" सोल्झेनित्सिन हे घट्ट व मठ्ठ असे स्लाव्ह अभिमानी आहेत, म्हणूनच विद्यमान युगात ते एकाकी आहेत.

खरे म्हणजे ते पाश्चिमात्य देशात ख्यालीखुषालीत तब्बल वीस वर्षे हद्दपारीत होते. पण EVAN DENISOVICTEH इव्हान डेनीसोव्हिच आणि कॅन्सर वॉर्ड यासारख्या जगतमान्य कादंबऱ्या लिहिणाऱ्याच्या बुद्धीला ही आरामाची वीस वर्षे तितकीशी अनुकूल ठरलेली दिसत नाहीत.

सोल्झेनित्सिन गेल्या वर्षी आपल्या मायभूमीस परतल्या दिवसापासून त्यांची एकसारखी चेष्टा होतेच आहे याचा उल्लेख वर आलाच आहे, ते रशियात कोठेही जावोत त्यांचा उपहासच होतो. त्याची काही बोलकी उदाहरणे- रशियन स्टेट ड्यूमासमोर त्यांचे एक व्याख्यान झाले. येथे एक गोष्ट खास करून लक्षात ठेवली पाहिजे. या ड्यूमाच्या सभासदांपैकी अनेकजण पूर्वीच्या रशियन कम्युनिस्ट पक्षात पदाधिकारी होते. या सर्व सभासदांनी जणू कट केल्यासारखे वर्णन केले. सगळ्यांनीच आपल्याला किती प्रचंड कंटाळा



अनुक्रमणिका

आला आहे याचे प्रदर्शन केले. अनेकांनी व्याख्यात्याकडे पाहून तुच्छतेचे उद्‌गार काढले. काहीजण आपल्या समोरील डेस्कवर डोके टेकून चक्क झोपी गेले. रशियन वृत्तपत्रात सोल्झेनित्सिन यांचे वर्णन एक संदर्भहीन ठरलेला, इतिहासजमा झालेला, अरेरावी पंडित असे करण्यात येते. काहीजण, आयातुल्ला खोमिनीच्या भेटीला आलेला रिप व्हन विंकल असेही त्यासंबंधात सांगतात. गेल्या वसंत ऋतूत ओल्गा चेकोवसकाया या पत्रकर्तीने लिटरातुरनाया गाझेटा (LITERATURNAYA GAZETA) या साप्ताहिकातच सोल्झेनित्सिन यांना एक खुले अनावृत्त पत्र लिहिले.

हे पत्र त्या साप्ताहिकाच्या पहिल्या पानावर प्रसिद्ध करण्यात आले होते. त्यात ओल्गाबाईंनी त्यांना असा प्रश्न केला होता की चेचन्यातल्या युद्धाबद्दल इतके दिवस 'गप्प' का बसला आहात. हा असा सवाल उपस्थित करणे हे लबाडीचे द्योतक होते, अथवा त्या पत्रकर्तीचे अज्ञान त्या सवालाद्वारा प्रकट होत होते. वास्तविक सोल्झेनित्सिन यांनी चेचन्या प्रश्नाविषयीचे आपले मत केव्हाच जाहीर केलेले आहे. आरग्यूमेन्टी इ फाक्टी (AURUMENTI I FAKTI) नावाचे एक साप्ताहिक आहे. या साप्ताहिकाचा खप चांगला कोटीच्या घरात आहे.

या साप्ताहिकाला दिलेल्या मुलाखतीत सोल्झेनित्सिन यांनी या युद्धाबद्दल निषेध व्यक्त केला असून चेचन्याला स्वातंत्र्य देण्यात यावे अशी मागणी केली होती. अगदी अलिकडेपर्यंत सोल्झेनित्सिन हे दूरचित्रवाणीवर दर आठवड्याला किमान पंधरा मिनिटे कोणत्या ना कोणत्या प्रश्नावर विचार व्यक्त करण्यासाठी येत असत. टॉक शोचे (A TALK SHOW) कायमचे यजमान, असे यांच्याबद्दल कुत्सितपणे बोलले जात असे. थोडक्यात या ठिकाणीदेखील उपहास व चेष्टा यांनी त्यांची पाठ सोडली नव्हती.

सरतेशेवटी सोल्झेनित्सिन यांचा कार्यक्रम कोणी पाहात नाही या सबबीखाली दूरचित्रवाणीच्या सरकारी अधिकाऱ्यांनी हा कार्यक्रमच रद्दबातल ठरविला. थोडक्यात आपल्या स्वतःच्या देशात भविष्यवेत्ता होणे हे एकंदरीत कठीण, त्याहीपेक्षा एकदा देशत्याग केल्यानंतर स्वगृही येऊन परत वास्तव्य करणे हे दुप्पटीने कठीण.

आता एक गोष्ट सत्य आहे. सोल्झेनित्सिन हे स्वतःच असे चमत्कारिक वागतात, की त्यांच्याबद्दल प्रेमाने बोलणे तसे कठीणच. कम्युनिस्ट रशियन राज्यकर्त्यांबरोबर, ते राज्यकर्ते ऐनभरात असताना, ज्या लोकांनी जाहिरपणे मतभेद व्यक्त केले त्यापैकी आँड्री साखाराव हे आणखी एक थोर गृहस्थ. त्यांच्याशी तुलना करता सोल्झेनित्सिन यांची एकंदर वागणूक चांगलीच विक्षिप्त. ते मान्यवर ठरलेली तत्त्वे साफ धुडकावून लावतात, आणि अगदी तारस्वरात ते जाहीर करतात.

पुन्हा ते करताना ते कसलेही मार्दव दाखवित नाहीत. याउलट ते कमालीची असहिष्णुता प्रकट करतात. सोल्झेनित्सिन यांचा वागण्याचा खाक्या त्यांच्या लोकप्रियतेत खासच भर टाकीत नाही. आधुनिक लोकशाही व्यवस्थेबद्दल ते साशंक आहेत. पाश्चिमात्य संस्कृतीत





अनुक्रमणिका

'पॉप' संस्कृतीला ते शेणखत आहे असे सांगून त्याची रेवडी उडवितात. ते फार महत्त्वाची व्यक्ती आहेत हे जरी खरे असले, तरी त्यांच्यासारख्याने ही अशा प्रकारची विधाने करावीत हे हास्यास्पद आहे. त्यांची दाढीदेखील काहींना पसंत नाही ! ती डोस्टोएवस्कीच्या दाढीसारखी दिसते असे ती नापसंती व्यक्त करणाऱ्यांचे सांगणे आहे. थोडक्यात सोल्झेनित्सिन आवडू नयेच यासाठी ही अशी अनेक कारणे पुरेशी आहेत. त्यात आणखीही शेकडो वाजवी अशा कारणांची भर घालता येईल. इतके असूनही ते आदरणीय अशीच व्यक्ती आहेत. या विधानाच्या समर्थनार्थ अनेक कारणे देता येतील.

मायकेल स्कॅमेल यांनी इ. स. १९८४ साली सोल्झेनित्सिन यांचे चरित्र लिहिलेले आहे. सध्यातरी हे चरित्र प्रमाण ग्रंथ मानला जातो. या ग्रंथात सोल्झेनित्सिन हे किती थोर व आदरणीय लेखक आहेत यासंबंधी सज्जड पुरावा उपलब्ध आहे. स्कॅमेल यांनी आपल्या मूळ चरित्र ग्रंथाला एक पूरक ग्रंथ लिहिला आहे. या ग्रंथाचे नाव– दि सोल्झेनित्सिन फाईल– सिक्रेट सोव्हिएट 'डॉक्युमेंटस रिव्हील वन मॅनस फाईट अगेंस्ट दि मानोलिथ' (सोल्झेनित्सिन दप्तर – गुप्त सोव्हिएट कागदपत्रातून, चिरेबंदी हुकुमशाही राजवटीविरुद्ध एका माणसाने दिलेल्या लढ्याचे होणारे दर्शन) हा ग्रंथ फारच अप्रसिद्ध प्रकाशकाने प्रसिद्ध केला आहे, जो कोणी हा ग्रंथ वाचून पाहिल, त्याला सोल्झेनित्सिन हे किती वरच्या श्रेणीचे वीर पुरुष आहेत हे समजून येईल.

त्याच्याबरोबर क्रेमलिन आणि के. जी. बी. (रशियन गुप्त पोलिस संघटना) या दोघांनाही सोल्झेनित्सिन विरोधाने कसे पछाडले होते, तेही या कागदपत्रावरून समजेल. अन्य कोणतेही टॉक – शो संचालक, अथवा अन्य कोणतेही लेखक आधुनिक इतिहासाला वळण देण्याबाबत सोल्झेनित्सिन जितके परिणामकारक ठरले तेवढे ते ठरलेले नाहीत हे या कागदपत्रावरून सिद्ध होते.

येल्तसिन यांनी २३ जून १९९२ रोजी एक अध्यक्षीय फतवा काढला. मानवी हक्कांची पायमल्ली आणि कोट्यवधी लोकांचा छळ ज्या हुकुमांच्या व वैधानिक कायद्यांच्या आधारे करण्यात आला त्यांच्या प्रसिद्धीवर तोवर जी बंधने होती ती या फतव्याने दूर केली होती. या फतव्यांमुळे सोल्झेनित्सिन या लेखकासंबंधी रशियन सरकारच्या दप्तरखान्यात जे प्रचंड कागदपत्र जमा झाले होते, ते सर्व प्रथमच आमजनतेसमोर आले. या कागदपत्रात रशियन कम्युनिस्ट पक्षाच्या पॉलिटब्युरोचे सभासद, सोल्झेनित्सिन या माणसाबद्दल कोणत्या प्रकारचा वेडगळ संशय बाळगून होते, ते सर्वजण एकंदरीतच भितीने किती पछाडलेले होते, ते त्या सभासदांच्याच शब्दात या कागदपत्रातून वाचता येते.

या कागदपत्राद्वारे आणखी एका मुद्दा सिद्ध होतो. तो म्हणजे सोल्झेनित्सिन या लेखकावर रशियन राज्यकर्ते व लेखक किती बारीक नजर ठेवून होते हे दिसून येते. सोल्झेनित्सिन यांच्या लिखाणामुळे आपली सत्तेवरची पकड कशी ढिली होणार आहे, हे त्या नेत्याइतके दुसऱ्या कोणासही, तितके चांगले समजले नव्हते. जगात सर्वत्र सोव्हिएट

युनियन ही चिरेबंदी व भक्कम अशी राजवट आहे, असा बोलबाला होता. त्याचवेळी या विद्यमान रशियन राजवटीचा इतिहास किती काळाकुट्ट आहे; आणि या राजवटीत अंगभूत अशी अस्थिरता आहे, असे गेली अनेक वर्षे सोल्झेनित्सिन लिहीत होते.

ब्रेझनेव्ह आणि त्याच्या साथीदारांना इ. स. १९६४ सालीच वन डे इन लाईफ ऑफ इव्हान डेनीसोव्हिच या लघुकादंबरीच्या प्रकाशनाने प्रस्थापित व विद्यमान रशियन राजवटीला केवढा धोका उत्पन्न केला आहे याची पूर्ण कल्पना होती. म्हणूनच ही कादंबरी प्रकाशित होण्यास ज्या माणसाने परवानगी दिली त्याचे अधिकारपद काढून घेऊन, त्याला पक्षातून हाकलवून देण्यासाठी त्या सर्वांनी जबरदस्त खटपट केली होती. हा मनुष्य निकीता क्रुश्चेय असल्याकारणाने, त्यांना आपला संकल्प सिद्धीस नेण्यात यश आले नाही.

ब्रेझनेव्ह आणि त्याचे साथीदार, सोल्झेनित्सिन या माणसाचे काय करायचे, या विषयावर अनेक वर्षे चर्चा करीत होते, हे या कागदपत्रावरून समजते. या लेखकाला फूस लावून आपलासा करता येईल का ? या लेखकाचे तोंड व लेखणी या दोघांनाही ताबडतोब पायबंद घालता येईल का ? आपणास त्याच्याविरुद्ध आघाडी उघडून यशस्वी होता येईल का ? किंवा याला खरे म्हणजे तुरुंगातच टाकले पाहिजे, इत्यादी, इत्यादी...... प्रश्नांची चर्चा ते करीत होते असे दिसते.

रशियन कादंबऱ्यात प्रख्यात ठरलेली पात्रे, जे जे काही करतात, ते ते सारे हे सर्व कागदपत्र एकत्र वाचले असता, त्यात आहे असे आढळून येते. उदा. लेटमेटॉव्ह ज्या प्रकारचे नैतिक धाडस दाखवितो, त्या प्रकारची उदाहरणे, या 'सोल्झेनित्सिन समासात' आहेत. गोगोलच्या साहित्यात नोकरशहा ज्या प्रकारची हास्यास्पद धडपड करताना दिसतात त्या प्रकारची धडपड या कागदपत्रातूनही दिसते. सोल्झेनित्सिनवर दबाव आणण्यासाठी, के. जी. बी. संघटनेने त्यांच्या पहिल्या पत्नीचा वापर कसा केला, रशियन कम्युनिस्ट पक्षाचे नेतृत्व किती क्रूरपणे वागले.

या सर्वांचा अगदी बारीकसारीक तपशीलांनी भरलेला वृत्तांत या कागदपत्रात सापडतो. सर्वात महत्त्वाची एक गोष्ट आहे. ती म्हणजे, गुप्त पोलिसांचा ससेमिरा एकसारखा आपल्या पाठीमागे आहे हे समजल्यानंतर सोल्झेनित्सिन आपले दैनंदिन व्यवहार जागरुकतेने करणार हे उघड आहे. पण कोणतीही व्यक्ती दिवसाचे चोवीस तास अशा जागरुकतेने दैनंदिन व्यवहार करणे केवळ अशक्य आहे. ती काही थोडा वेळ तरी बेसावध असणे क्रमप्राप्तच आहे. कारण तो मनुष्यस्वभाव आहे.

अशा बेसावध क्षणी सोल्झेनित्सिन हा लेखक काय बोलत होता, कसा विचार करीत होता, तेही या कागदपत्रात ऐकावयास व वाचावयास मिळते. हा लेखक आपली त्याबाबतीत कधीही निराशा करीत नाही, या दस्तऐवजात आरंभीलाच काही कागदपत्र आहेत. मॉस्को शहरातील एका ब्लॉकमध्ये घडणारे संभाषण ध्वनिमुद्रित करण्याची व्यवस्था रशियन गुप्त पोलिसांनी केली होती. ते संभाषण जसे बोलले गेले त्याच स्वरूपात व शब्दात आपणास

वाचावयास (व ऐकण्यासही) मिळते. हे संभाषण बरेच काही सांगून जाणारे आहे. हे संभाषण घडले तो काळ वाचकांनी आठवून पाहावा. त्यावेळच्या सोव्हिएट युनियनमध्ये राज्यकर्त्यांबरोबरच्या मतभेदांची परिसीमा काय असेल – तर सुधारित अशा समाजवादाची मागणी करणे.

या ठिकाणी आणखी एक गोष्ट लक्षात ठेवणे जरूरी आहे. झेकोस्लोवाकियातील 'प्राग वसंत ऋतू चळवळ' म्हणून जी चळवळ ओळखली जाते ती या संभाषणानंतर तब्बल तीन वर्षानंतर आली होती. सोल्झेनित्सिन भोजनप्रसंगी गप्पागोष्टी करीत होते. ते या गप्पांच्या ओघात लेनिन या 'सापा'संबंधी भाष्य करताना म्हणतात, 'कोणतीही नितिमत्ता व तत्त्वे यांचा आदर न करणारा हा मनुष्य.' या संभाषणात, ते ज्या काळात संभाषण करीत होते, त्यानंतर काही दशके उलटल्यानंतर काय होईल याविषयी भविष्यही वर्तवितात. तत्कालीन सोव्हिएट सरकार हे सर्वसामान्य जनतेपासून किती अलग पडलेले आहे; म्हणूनच ते कसे नाश पावणार आहे, हे त्यांनी त्या संभाषणाच्या ओघातच सांगितले होते.

ते सांगत होते "या सरकारला काहीही भवितव्य नाही. एखादी तत्त्वप्रणाली, विचारप्रणाली, ध्येयनिष्ठा, अथवा रशियन अर्थव्यवस्था, अथवा परराष्ट्र धोरण अथवा जागतिक कम्युनिस्ट चळवळ, अथवा सर्वसामान्य रशियन जनता, यांच्याशी दुवा साधणारी साखळी वा धावता पट्टा या राज्यकर्त्यांकडे नाही. या धावपट्ट्यांवर नियंत्रण ठेवणारे, त्यांना दिशा देणारे, जे काही घटक होते, ते एकतर नादुरुस्त आहेत, अथवा निकामी ठरले आहेत. हे राज्यकर्ते आपल्या मेजाजवळ बसून त्यांना जे काही हवेहवेसे वाटते, त्यासंबंधी निर्णय घेतीलही. तथापि हे अगदी स्पष्ट आहे, ते कार्यक्षम नाहीत, उलट निकामी आहेत. तुला हे समजेल का ? तुला हे दिसते का ? खरोखरीच मी अगदी प्रामाणिकपणे सांगतो व माझी एकंदरीत अशी धारणा आहे की, त्या सर्व राज्यकर्त्यांना अर्धांगवायूचा झटका आलेला आहे."

आणि हे भाष्य एवढ्यावरच थांबत नाही. सोल्झेनित्सिन हे पराकोटीचे कडवे रशियन राष्ट्रवादी आहेत. रशियन साम्राज्यातील एका सेंटीमीटर भूमीचाही त्याग करण्याची त्यांची इच्छा नाही. परंतु हेच सोल्झेनित्सिन सोव्हिएट युनियनचे विभाजन होणे अपरिहार्य आहे आणि ते योग्यच आहे असे सांगतात. ते टाळता येणार नाही असेही ते बजावतात. अर्थात हे सारे ते कडवे राष्ट्रवादी असल्याकारणाने तत्कालीन रशियन राज्यकर्त्यांना ते सांगतात की, "सोव्हिएट प्रज्यासत्ताकातील बिगर सोव्हिएट प्रज्यासत्ताकापासून आपणास फारकत करून घ्यावीच लागणार आहे; हे उदारमतवादी रशियन लोकांना समजत नाही; याचेच मला आश्चर्य वाटते. युक्रेन या प्रजासत्ताकाच्या बाबतीत सर्व काही संपुष्टात आलेले आहे, त्या प्रजासत्ताकाला सोव्हिएट युनियनमधून बाहेर पडण्यास परवानगी दिलीच पाहिजे असे मला त्या उदारमतवाद्यांना सांगायचे आहे.

परंतु बाल्टिक, कॉकेशस या विभागासंबंधी काही प्रश्न कसे निर्माण होतात.....

यानंतर पहिला दिवस उजाडल्यानंतर, तुम्हाला ज्या कोणाला सोव्हिएट युनियनमधून बाहेर पडावयाचे असेल तर या परमेश्वरकृपेने किंवा त्या परमेश्वरासाठीच, तुम्ही मेहरबानी करून सोव्हिएट युनियनच्या बाहेर पडा !"

रशियन कम्युनिस्ट पक्षाच्या 'पॉलिटब्युरो' या प्रचंड ताकदीच्या समितीच्या सदस्यांचे आवाज व मते, या सर्व दस्तऐवजात पुन्हा पुन्हा ऐकावयास (वाचावयास) मिळतात. ऐकावयास / वाचावयास असे म्हटले याचे कारण मुळात ती संभाषणे ध्वनिमुद्रित झाली होती. मागाहून त्यांचे टंकलेखन होऊन, ती मुद्रित करण्यात आली. अशा मार्गाने ती या दस्तऐवजात समाविष्ट झाली आहेत. मूळ ध्वनिफितीही उपलब्ध आहेत. पण भारतासारख्या दूरवरच्या लोकांना ती संभाषणे फक्त वाचता येतील. सामान्यपणे ती ऐकावयास मिळणे शक्य नाही. हे प्रचंड राजकीय ताकदीचे सदस्य कधी कधी वाङ्मयीन समीक्षक बनतात. अनेक वेळा आपल्या आयुष्यात ते पोलिसच असत. या सोल्झेनित्सिन समाजातील कागदपत्रात ते साहित्य समीक्षक व पोलीस या दोन्ही भूमिकात वारंवार भेटतात. हे असे सामर्थ्यशील व सर्वज्ञ सभासद कधी सोल्झेनित्सिन यांच्या साहित्याचा, बोलण्याचा नेमका अन्वयार्थ काय आहे, याबद्दल कधी निरुपण, तर कधी त्यावर टीका– टिप्पणी, तर कधी मल्लिनाथी करताना दिसतात.

या लेखकाला चांगले शासन करून अद्दल घडविली पाहिजे या भूमिकेत ते आलेले आहेत. थोडक्यात हे 'मान्यवर' सभासद, आपल्याला उपलब्ध असतील त्या सर्व मार्गांचा अवलंब करून, सोल्झेनित्सिनला धाकदपटशाचे भय दाखवितात, तर काही वेळा त्यांच्याबद्दल उपरोधाने बोलून, त्यांना वाकुल्या दाखवितात. परंतु यातील प्रलोभन, हुलकावणी व धाकदपटशा– एकही मार्ग यशस्वी होत नाही.

भारतीय संदर्भ वापरून सांगावयाचे झाल्यास, सोल्झेनित्सिन असे सांगत नाहीत की "मला देण्यात आलेले हे पैसे मी खरे म्हणजे घेता कामा नयेत, पण मला गरज असल्याकारणाने, ते मी कनवटीस लावीत आहे." ते सरळ त्या प्रलोभनास नकार देतात. पॉलिटब्युरोने वापरलेल्या क्लृप्त्यांपैकी एकही त्यांच्या मनोधारणेत बदल करीत नाही.

या ठिकाणी आपण एका चमत्कारिक पण तितक्याच निर्णायक अशा ठिकाणी आलो आहोत. पाश्चिमात्य जगतातील लोकांना आणि भारतातील न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे यांना अभिप्रेत असलेले, एक शालीन असे राजकीय आदान – प्रदान; मुलत: गृहित धरलेले असते. या जगातील या दोन (पाश्चिमात्य – भारत) विभागातून आलेल्या जनतेला व समीक्षकांना सोल्झेनित्सिन प्रवृत्तीचे लोक हे तसे त्रासदायक व भुणभूण करणारे वाटतात. याचे कारण एकच आहे. या अशा प्रवृत्तीच्या व्यक्तित्वाच्या केंद्रस्थानी अशी काही मूल्ये आहेत की त्यांना वर उल्लेखिलेल्या पाश्चिमात्य व भारतातील पं. नेहरूंच्या मूल्यांत स्थानच नाही. सोल्झेनित्सिन हे कोणतीही तडजोड न स्वीकारणारे एकांडे शिलेदार आहेत.

रशियन कम्युनिस्ट पक्षाच्या पॉलिटब्युरोला सोल्झेनित्सिन यांचे हे गुण व स्वभाव फारच

अस्वस्थ करणारे व त्रासदायक होते. (गंमत म्हणून असा विचार मनात येतो. भाई श्रीनिवास सरदेसाई व भाई डांगे यांच्या मनात असे विचार कधी आले होते का ?) पण त्याचबरोबर सोल्झेनित्सिन यांचे हे गुण भितीदायक व आव्हान देणारे वाटत होते.

सोव्हिएट युनियनमधल्या त्यामानाने सधन लोकांची, शहराबाहेर, सुट्टीला वा अन्य विश्रांतीचा दिवस घालविण्यासाठी वास्तू असते. तिला डाचा हे नाव आहे. सोल्झेनित्सिन यांचाही डाचा आहे. या त्यांच्या डाचाची रशियन सरकारच्या हुकूमावरून अगदी कानाकोपऱ्यात जाऊन तपासणी झाली. या तपासणीनंतर, सोल्झेनित्सिन यांनी के. जी. बी. संघटनेचे प्रमुख आँद्रापोव्ह यांना लिहिले......

"आपल्या संघटनेतील नोकरांची बेकायदेशीर वागणूक, मी गेली अनेक वर्षे गप्प बसून शांतपणे सहन केली आहे. त्यांच्या 'विद्यमान' रशियन कायद्यानुसारही बेकायदेशीर कृत्यांची यादी येणेप्रमाणे. एक माझ्या सर्व पत्रव्यवहाराची तपासणी, त्यानंतर त्या पत्रव्यहारातला अर्धा अधिक भाग जप्त करणे, मग माझ्याशी जे पत्रव्यवहार करतात त्यांना हुडकून काढणे, व त्या मागोमाग ते ज्या ठिकाणी काम करीत असतील तेथे जाऊन त्यांचा छळ करणे. प्रत्येक राज्यातील अधिकारी व सहकारी संस्था माझ्या घरावर आणि अवतीभवती पाळत ठेवून असतात. मला जे कोणी भेटावयास येतात, त्यांच्यावरही पाळत ठेवण्यात येते.

मी कोणाशीही दूरध्वनीवर संभाषण केले, तरी ते ध्वनिमुद्रित करण्यात येते. माझ्या राहात्या घराच्या छताला भोके पाडण्यात येतात. मी शहरात राहातो, त्या जागेत आणि ग्रामीण भागातील माझ्या घरात होणारी संभाषणे ध्वनिमुद्रित करण्यासाठी यंत्रे ठेवण्यात आलेली आहेत. आपल्या मंत्रीमंडळाकरवी, काही व्याख्यानाचे हॉल, रशियन सरकारी अधिकाऱ्यांना खास उपलब्ध करून देण्यात येतात. या हॉलच्या मंचावरून हे अधिकारी माझी येथेच निंदानालस्ती करणारी मोहिम सातत्याने चालवितात..... परंतु कालच्या गुप्त पोलिसी धाडीनंतर मी इत:पर गप्प व शांत राहाणार नाही."

'गुलाग आर्चिपेलागो' हा सोल्झेनित्सिन यांचा सर्वोत्कृष्ट ग्रंथ. तसाच तो तत्कालीन राजवटीच्या दृष्टीने अत्यंत धोकादायक असा ग्रंथ. रशियन गुप्त पोलिसांनी इ. स. १९७१ साली, अगदी खणून वर काढला. यानंतर तीन वर्षांनी म्हणजे इ. स. १९७४ साली सोल्झेनित्सिन यांना फ्रँकफूर्टला जाणाऱ्या विभागात जबरदस्तीने ढकलून हद्‌पार करण्यात आले. रशियन कम्युनिस्ट पक्षाने हा निर्णय घ्यावा यासाठी पक्षाचे मन वळविण्यात आँद्रापोव्ह हे सरतेशेवटी यशस्वी झाले होते.

सोल्झेनित्सिनना हद्‌पार केल्यानंतरही के. जी. बी. संघटनेचे लक्ष त्यांच्यावर होतेच. त्यासाठी खास हेरांची नेमणूक करण्यात आली होती. या हेरांनी सोल्झेनित्सिन यांना नानाप्रकारे त्रास दिला. समाजाच्या दृष्टीने बाद व चुकीचे ठरलेले चक्रम गृहस्थ आहेत असे लोकास वाटावे यासाठी अनेक प्रकारच्या, सोल्झेनित्सिन यांची बदनामी करणाऱ्या बातम्या पसरविण्यात आल्या. या सर्वांचा पाडाव करून सोल्झेनित्सिन यशस्वी झाले.

* * *



अनुक्रमणिका

सोल्झेनित्सिन हे जुन्या म्हणूनच विद्यमान पिढीला दुर्बोध वाटणाऱ्या रशियन भाषेत लिहितात याचा उल्लेख वर आला आहेच. तसे असले तरी, अन्य कोणा रशियन लेखकाचे साहित्य वाचण्यापेक्षा काही समीक्षक तरी सोल्झेनित्सिन यांचे लिखाण वाचणेच पसंत करतात. या आपल्या पसंतीची कारणेही ते देतात– त्यातले एक कारण येणेप्रमाणे : अनेक वर्षे लाखो रशियन तुरुंगात होते. सोल्झेनित्सिन यांनी आपला ऐन उमेदीचा काळ या तुरुंगातल्या असंख्य रशियन माणसांच्या सहवासात घालविलेला आहे. शिवाय ते प्रतिभावान साहित्यिक आहेत. या सर्वांचा परिणाम सोल्झेनित्सिन यांना रशियन जनतेची नैतिक प्रकृती कशा प्रकारची आहे याचे चांगले ज्ञान होण्यात झालेला आहे.

म्हणूनच परराष्ट्र वकिल अथवा बँकर्स (BANKERS) म्हणून काम करणाऱ्या लोकांपेक्षा सोल्झेनित्सिन यांना भविष्यकाळात काय घडणार आहे, याची अधिक अचूक अशी अटकळ आहे. ते आता पराकोटीचे विकेंद्रीकरणवादी झाले आहेत. त्यांच्या मते रशियाला अजूनही आशा आहे. पण रशिया यशस्वी होण्यासाठी सध्याची जी कमालीचे केंद्रीकरण झालेली व्यवस्था आहे, ती पार जमिनदोस्त करून टाकण्यास सुरुवात झाली पाहिजे असे ते सांगतात.

त्यांच्या मते, प्रत्येक गोष्टीचेच शक्य असेल तेथे विकेंद्रीकरण करा, सामान्य जनतेला आपल्या जबाबदारीची जाणीव करून द्या, ती जबाबदारी पार पाडण्याचे शिक्षण द्या. हे झाले म्हणजे मग रशियन जनतेला पुन्हा एकदा 'महान देशाची' प्राप्ती होईल. त्यांच्या घरात रशियन गुप्त पोलिसांनी सर्वत्र (अगदी स्नानगृह, प्रसाधनगृहात सुद्धा) त्या ठिकाणचा बारीकसा ध्वनीसुद्धा नोंदवून घेण्याची व्यवस्था केलेली होती. याचा उल्लेख यापूर्वी आला आहेच. सोल्झेनित्सिन शहराबाहेरील घरात राहात होते. आपल्या मित्रावरोबर मद्यपान करता करता, गप्पागोष्टी चालल्या असताना ते म्हणाले, "अत्यंत घृणास्पद अशा कम्युनिस्ट राजवटीची संपूर्णतः इतिश्री झाल्यानंतर युक्रेनला सोव्हिएट संघातून बाहेर पडण्यासाठी प्रोत्साहन दिले पाहिजे."

सोल्झेनित्सिन यांना सामान्य रशियन माणसाच्या मनात काय विचार होते याची उपजत जाण होती, व ती किती वरच्या पातळीवरची व प्रकारची होती, याची ते उद्‌गार साक्ष आहेत. या त्यांच्या सामर्थ्याची प्रचिती झालेली आहेत. म्हणूनच अनेक साहित्य समीक्षक त्यांच्यावर विश्वास टाकतात. मॉस्कोमध्ये; जे चेचेन (CHECHEN) विभागातून लोक येतात त्यांनी प्रवेश परवाना घ्यावा, बिगर रशियन माणसाला रशियात प्रवेश करताना जसा प्रवेश परवाना (VISA) तसाच चेचेन लोकांनी घेण्यासाठी कायदा करावा असे सोल्झेनित्सिन यांचे सांगणे आहे.

हा असा कायदा केला म्हणजे मग सूडबुद्धी प्रकट करणाऱ्या अनेक– सध्या मॉस्कोमध्ये तळ ठोकून असलेल्या गुन्हेगारी टोळ्या व त्यात सामील झालेले जे सभासद असतील त्यांना मॉस्कोतून हद्दपार करता येईल. या विधानाची विरचना (de construction)



अनुक्रमणिका

आवश्यक आहे. सोव्हिएट राज्यकर्त्यांनी चेचन्या राष्ट्रीकांना व त्या विभागातील लोकांना नेहमीच सापत्नभावाने वागविले होते. 'खबऱ्ये' आणि 'चमचे' त्याजबरोबर रशियन कम्युनिस्ट पक्षाच्या वतीने गुंडगिरी करणारे लोक, यांच्या मदतीशिवाय रशियन सरकारला ती सापत्नभावाची वागणूक देता आली नसती.

म्हणूनच या अशा प्रकारच्या व्यक्तींची रशियन कम्युनिस्ट राजवटीत चलती होती, व तेच मॉस्कोत ठाण मांडून बसत (भारतीयांनी दिल्लीत कोण ठाण मांडून बसते याचे स्मरण करावे. म्हणजे मग सोल्झेनित्सिन यांचा मुद्दा फारच स्पष्ट होईल) आणखीही एका गोष्टीसाठी वर उल्लेखिलेल्या साहित्य समीक्षकांना सोल्झेनित्सिन यांचे लिखाण वाचावेसे वाटते. त्यांच्या मते पाश्चिमात्त्य देशात (व भारतातही) राजकीय शहाणपण दर्शविणारे उद्‌गार व निरीक्षणे ऐकायला मिळावीत म्हणून इत:पर लेखकांकडे लक्ष देत नाही. (मराठी माणूस विजय तेंडुलकरांकडे कोठे लक्ष देतो !) रशियात परिस्थिती अगदी वेगळी आहे.

एखाद्याचा छळ असा करावयाचा की तो त्यात मृत होणार नाही ! अशा प्रकारचा छळवाद करण्याची रशियन कम्युनिस्ट पक्षाची जी प्रवृत्ती आहे तिलाही एक जमेची बाजू आहे. काळ्या ढगाची रूपेरी कडा हा जो सोल्झेनित्सिन दस्तऐवज आहे, त्याचे आणखी एक वैशिष्ट्य आहे. ही घटनांची नोंदवही सोल्झेनित्सिन यांच्या बाजूने अथवा त्यांचे समर्थन करणारी नोंदवही नाही. त्यांचा जे कोणी छळ करणारे होते, त्यांच्या समर्थनार्थ त्या घटना नोंदविण्यात आल्या होत्या ! सोल्झेनित्सिन मॉस्कोला परतल्यानंतर आपल्याशी संबंधित असलेल्या 'रूमालांची' (ऐतिहासिक दस्तऐवज) मागणी के. जी. बी. या गुप्त पोलिसी संघटनेकडे करता येईल.

खरे म्हणजे या रूमालांची संख्या तशी चांगलीच प्रचंड आहे; कारण ख्रुश्चेव ते येल्तसिन एवढ्या चांगल्या चाळीस वर्षाचा कालखंडातल्या या नोंदी आहेत. सोल्झेनित्सिन यांची इव्हान डेनीसोव्हिच ही कादंबरी ही स्टॅलिनने निर्माण केलेल्या श्रमछावण्या (CONCENTRATION CAMPS) विषयी आहे. ही प्रसिद्ध करण्यास ख्रुश्चेव ह्यांनी परवानगी दिली. ती प्रसिद्ध झाल्याबरोबर रशियन गुप्त पोलिसांचे महत्त्वाचे 'लक्ष्य' हा कादंबरीकार ठरला.

ही कादंबरी प्रकाशित करण्याला परवानगी दिल्यावरून खरे म्हणजे ख्रुश्चेव यांनाच अटक व्हायची. पण ते ख्रुश्चेव असल्याकारणाने बचावले. ते बचावले ते तात्पुरते. परंतु त्या दिवसापासून सोल्झेनित्सिन यांच्यामागे गुप्त पोलिसांचा ससेमिरा लागला तो कायमचाच. पोलिसांनी त्यांच्या 'डाचा' या ग्रामीण भागातील घरातील प्रत्येक हालचालीची नोंद घेतली. त्यांचे जे कोणी निकटचे परिचित होते, त्यांच्या अगदी सर्वसामान्य स्वरूपाच्या संभाषणाचा अहवालही गुप्त पोलिसांना पेश करावा लागे.

परराष्ट्रातील पत्रकाराजवळ, त्यांनी परदेशात घेऊन जावे यासाठी काही देण्यात आले, तर ते केव्हा, कोठे व कसे देण्यात आले, याची नोंद गुप्त पोलिस घेत असत. थोडक्यात

त्यांना प्रत्येक गोष्टीबद्दल सर्व माहिती असे. सोल्झेनित्सिन एकदा स्विझर्लंडला गेले होते. तेथेही रशियन गुप्त पोलिसांनी आपली पाळत चालूच ठेवली होती. रशियात सोल्झेनित्सिनना जो अनुभव येत होता तोच तेथेही आला. (रशियात आपले हृदय मागे ठेवून आलेल्या पं. नेहरूंची कन्या इंदिरा गांधी ह्यांनी आणीबाणी जाहीर केल्यानंतर अनेक परदेशस्थ भारतीयांना हे असे अनुभव आले होते !)

कम्युनिस्ट हंगेरीतील लोक, त्या देशातील अगदी सामान्य व गरीब मनुष्यही कम्युनिस्ट राजवटीतील पोलिसांचा 'खबऱ्या' आहे असे सांगत, तेव्हा ते संशय पिशाच्याने पछाडलेले लोक आहेत असे अनेक उदारमतवादी (?) (यात अनेक भारतीयही होते) सांगत. पण कम्युनिस्ट राजवटीची पडझड झाल्यामुळे, ती वस्तुस्थिती होती हे सिद्ध होणे सुलभ झाले. (आता आमची उदारमतवादी मंडळी असे सांगतात की ते खबऱ्ये होते पण लोकांना वाटते तितक्या प्रमाणात नव्हते) ही 'खबऱ्ये' पद्धती कशा प्रकारे काम करीत होती हे कम्युनिस्ट पूर्व जर्मनीतील जे कागदपत्र आता प्रसिद्ध झाले आहेत, त्यावरून चांगले समजून येते.

त्या समाजातील जवळजवळ प्रत्यकेजण प्रत्येकाबद्दल गुप्त पोलिसांना 'खबर' देत असे. सोल्झेनित्सिन यांचा रशियन इतिहासाचा चांगलाच अभ्यास आहे. तसेच सोव्हिएट राजवटीबद्दलचा त्यांचा अनुभव महाभयानक होता. रशियन इतिहासाचे त्यांना जे ज्ञान होते, त्या ज्ञानाच्या प्रकाशात, आपल्याला आलेल्या अनुभवांचा अन्वयार्थ लावण्याचा ते प्रयत्न करीत होते. एक लेखक या भूमिकेतून लावण्याचा प्रयत्न करीत होते. म्हणूनच सर्वसामान्य माणसाचे एकवेळ सोडून द्या, पण सोल्झेनित्सिनसारख्या लेखकाबद्दल जेव्हा रशियन गुप्त पोलिस 'खबर' जमा करतात तेव्हा त्या 'खबरी' कागदपत्रांची संख्या बेसुमार असणार हे ओघानेच आले. शेकडो रिमे कागद ही माहिती नोंदवून ठेवायला खर्ची पडला आहे. एका रशियन समीक्षकाने म्हटले आहे की अफगाणिस्थानच्या युद्धाबद्दल जेवढे कागदपत्र रशियन दप्तरखान्यात आढळतात, त्यापेक्षा सोल्झेनित्सिन संबंधीच्या कागदपत्रांच्या रूमालांची (ऐतिहासिक दस्तऐवज) संख्या कितीतरी पटीने जास्त आहे !

या प्रचंड संख्येच्या कागदात तसे काहीही हाती लागत नाही. याला अपवाद जरूर आहेत. सोल्झेनित्सिन हे त्या काळात जे बोलले, त्यांनी जे काही लिहिले ते सारे येथे नोंदविलेले आहे. अनेक ठिकाणी त्यांची वाक्ये जशीच्या तशी नोंदविलेली आहेत. उदा. इ. स. १९७० ते १९७६ हा कालखंड. त्यावेळपासून सोव्हिएट रायटर्स युनियन (सोव्हिएट लेखक संघ) या संघटनेच्या सदस्यांना आणि त्या संघाच्या परिषदा भरत त्यावेळेस त्या परिषदेच्या प्रतिनिधींना सोल्झेनित्सिन वारंवार पुढील गोष्टीसंबंधी अगदी स्पष्ट शब्दात लिहीत असत.

रशियन लेखकांचा छळ कसा होत आहे, त्या संबंधात सोव्हिएट लेखकांचा संघ निषेधाचा साधा शब्द कसा उच्चारित नाहीत, याबद्दलची त्यांनी लिहिलेल्या पत्रातील तपशीलवार माहिती आपणास वाचावयास मिळते. प्रख्यात इंग्लिश लेखक जॉर्ज ऑरवेल

यांच्याप्रमाणे सरळ, स्पष्ट, वेळप्रसंगी गावरानपणे परखड अशा शब्दांत त्यांनी सोव्हिएट रायटर्स युनियनची हजेरी घेतलेली त्या पत्रातून दिसून येते. सायबेरिया या विभागात अनेक वांशिक (ETHENIC) टोळ्या वस्ती करून आहेत.

त्यातल्या एका अत्यंत छोट्या टोळीतल्या, प्रस्थापित सोव्हिएट सरकारचे लांगूलचालन करणाऱ्या एका नगण्य लेखकाने सोल्झेनित्सिन यांच्याविरुद्ध तक्रार केली ! त्याच्या पाठोपाठ अनेक अतिसामान्य रशियन लेखकांनी तक्रार केली. रशियात त्याकाळात घडत असे त्याला अनुसरून एक प्रतिक्रियांची धारावाही चालू झाली. या लेखकांच्या (?) तक्रारी पाठोपाठ रशियन खाण कामगारांनी सोल्झेनित्सिनविरुद्ध आपला आवाज उठविला, या सर्व तक्रारींचे पर्यवसान सोल्झेनित्सिन यांना रशियातून हद्दपार करण्यात झाले.

हे घडल्यानंतर एक महत्त्वाची गोष्ट झाली, ती नमूद करणे आवश्यक आहे. भारतातल्या अनेक लेखकांना, व्यक्तींना व अनेक सुमार पत्रकारांना प्यारा असलेला स्टॅलिन व त्याची राजवट आता इतिहासजमा झाली होती. म्हणूनच सोल्झेनित्सिन यांच्या या हद्दपारीविरुद्ध रशियातही काही लोकांनी जाहीरपणे निषेध नोंदविला, स्टॅलिनच्या राजवटीत असे करावे हे कोणाला शक्य झाले नसते, याचे कारण असा कोणाच्या मनात विचार आला तर त्याचे, बाहेरच्या जगात कोणालाही गंधवार्ता न लागता, त्या व्यक्तीचे 'शारीरिक विसर्जन' झाले असते. या जाहीरपणे निषेध नोंदविणाऱ्यांत अनेक रशियन लेखक होते.

याच लेखकांकडे भविष्यकाळात रशियन लोकांनी गंभीरपणे लक्ष दिले. हे लेखक काय सांगत होते याची त्यांनी मोठ्या जाणीवपूर्वक नोंद घेतली. इतर जे कोणी तत्कालीन 'महान रशियन लेखक' होते त्यांच्याकडे विद्यमान रशियन जनता ढुंकूनही पाहात नाही. हीच घटना लेखकाला हद्दपार करणे पोलंड वा हंगेरीत त्यावेळी घडली असती, तर रशियात घडले तसे घडले नसते.

त्या दोन्ही देशात अत्यंत खालच्या श्रेणीतल्या लेखकांनाही भविष्यकाळाबद्दलची जाण अधिक चांगली होती. परंतु सोल्झेनित्सिन यांचा आपण विचार करतो, तेव्हा आपणापुढे रशिया हा देश आहे. 'गुलामी मनोवृत्ती' हा तेथल्या तत्कालीन सोव्हिएट 'समाजवादी' राज्यव्यवस्थेचा एक अविभाज्य भागच होता. भारतात अशा परिस्थितीत काय घडले असते, हे इंदिरा गांधींनी जाहीर केलेल्या आणीबाणीनंतर माहीत झालेले आहे.

आपणाकडेही पं. नेहरूंनी जाहीर केलेल्या 'समाजवादी' धर्तीच्या राज्यव्यवस्थेकडे आपण आगेकूच करीत होतो! ते काहीही असो, या सोल्झेनित्सिन 'रूमालातील' कागदपत्रांतून एकच गोष्ट सिद्ध होते. ती म्हणजे इ. स. १९७९ साली, सोल्झेनित्सिन ह्यांना फक्त हद्दपार करावे या ठरावाला रशियन कम्युनिस्ट पक्षाच्या पॉलिटब्युरोने एकमुखी संमती दिली होती. या रूमालातील कागदपत्रातून पॉलिटब्युरोमध्ये या प्रश्नाची काय चर्चा झाली ह्याची तपशीलवार नोंद आहे. सोल्झेनित्सिन संबंधीचे अधिक कागदपत्र प्रसिद्ध होतील तेव्हा जगाला कितीतरी अधिक उद्बोधक गोष्टींबद्दल माहिती होईल.



अनुक्रमणिका

## ५) वोल सोयिन्का

'केन सारो विवा' ह्या नायजेरिअन लेखकाच्या हत्येबद्दल आम्ही आपणास मागे सांगितलेच आहे. (तपशील अंक २) आजच्या नोंदीत अशाच दुसऱ्या लेखकाबद्दल !

'वोल सोयिन्का' ह्या नायजेरिअन नोबेल पारितोषिक विजेत्याला नायजेरिअन सरकारने मृत्युदंड ठोठावला आहे. ही बातमी वाचताच साऊल बेलो, नदिन गार्डिमर, टोनी मॉरिसन, विस्लावा झिंम्बोरस्का, सिमस हीनी, झेसस्लाव्ह मिलोझ, केन झावूरो ओइ, आणि डेरेक वॉलकॉट ह्या आठ नोबेल पारितोषिक विजेत्यांनी 'न्यूयॉर्क रिव्ह्यू ऑफ बुक्स' या नियतकालिकाला एक पत्र लिहिले. त्या पत्राचा हा मुक्त अनुवाद.

**'आम्ही सोयिन्काबरोबर आहोत.'**

पत्रास कारण की आम्ही एक भयानक बातमी ऐकली. परत एकदा नायजेरिअन सरकार आमच्यासारख्याच एका नोबेल पारितोषिक विजेत्याला मृत्यूच्या दिशेने प्रवास करायला लावीत आहे. हा नोबेल पारितोषिक विजेता आहे – वोल सोयिन्का!

१९९५ मध्ये ह्याच सरकारने 'केन सारो विवा' ह्या आमच्या लेखकमित्राची अशीच कायदेशीर (?) हत्या केली होती आणि कायद्याला धाब्यावर बसवले होते. म्हणूनच आज सोयिन्काच्या खटल्याची सुनावणी म्हणताच आम्हाला त्याच्या जीविताच्या सुरक्षिततेविषयी अपार काळजी वाटते आहे. आज सोयिन्का अज्ञातवासात आहे. जे देश मुलभूत मानवी हक्क मानतात, त्यांनी त्याला योग्य ते संरक्षण देण्याची गरज आहे. कारण जे ढोंगी सरकार कायद्याचे आणि मानवतेचे साधे नियमही पाळू शकत नाही. त्याच्यामुळे देशाबाहेरही सोयिन्काचा जीव सुरक्षित राहील, ह्याबद्दल आम्हाला शंकाच आहे.

आम्ही त्याच्याबरोबर एकोप्याने, एकजुटीने आहोत. त्याच्या आग्रहाप्रमाणे इतर सर्व लेखक – पत्रकार ज्यांना सरकारी दमनसत्रात, गळचेपीत पकडलेले आहे, तुरुंगात ठेवलेले आहे, मारहाण केली जात आहे त्या सर्वांबरोबरही आम्ही एकीने राहाणार आहोत.

सगळ्या नायजेरिअन जनतेसाठी काम केल्यामुळे ज्याचा जीव धोक्यात आहे. त्या आमच्या नाजेरिअन लेखक बंधूच्या बाजूने आम्ही सगळे लेखक बोलत आहोत.

लोकशाही नागरिकत्वाचे हक्क ज्या नायजेरिअन जनतेला नाकारले गेले आहेत, त्या जनतेबरोबर सोयिन्कासह आम्ही आहोत. सोयिन्का आणि त्याचे सहबंदी ह्यांनी आपला जन्म

धन्य केला. जो मनुष्य राष्ट्राचा अत्यंत नेक सुपुत्र आहे, अशा सोयिन्काला नायजेरिअन सरकारने राष्ट्रद्रोही ठरवलेले आहे.

**पेन अमेरिकन सेंटर**
**न्यूयॉर्क सिटी**

**साऊल बेलो आणि सात**
**इतर नोबेल लॉरिएटस्**

हे पत्र प्रसिद्ध होताच इ. अगवेइजीर आणि अे. अबुबकर ह्या न्यूयॉर्कमधील नायजेरिअन राजदूतांच्या, नायजेरिअन माहितीखात्याच्या अधिकाऱ्यांनी पुढील खुलासा प्रसिद्धीसाठी पाठवला –

"आपल्या २४ एप्रिलच्या आवृत्तीत प्रसिद्ध झालेल्या 'आम्ही सोयिन्काबरोबर आहोत' ह्या पत्राने आम्हाला खूप वाईट वाटले, आमची निराशा झाली. आठ मान्यवर लेखकांनी वोल सोयिन्काबरोबर जो सहानुभाव व्यक्त केला आणि आणि त्याची साथ करण्याची इच्छा प्रकट केलेली आहे ती भावनेच्या आहारी जाऊन आणि अविवेकाने केली आहे असे आम्हाला वाटते. ह्या लेखकांना त्यांच्या लेखन कामगिरीमुळे नोबेल पारितोषिके मिळालेली आहेत. त्यांच्यासारख्या एकाच्या बेकायदा वागणुकीची ते डोळे बंद ठेवून भलावण करीत आहेत. फार मोठी माणसे देखील कधी कधी चकतात ती अशी !

डिसेंबर '९६ ते फेब्रु' ९७ मध्ये नायजेरिआत भयानक बॉम्बस्फोट झाले आणि दहशतवाद्यांच्या कारवायांना ऊत आला. त्यामध्ये अनेक निष्पाप नागरिक मारले गेले. महत्त्वाच्या सार्वजनिक आणि खाजगी मालमत्तेचे अपरिमित नुकसान झाले. ह्या सगळ्याला सगळे जगच साक्षी आहे. श्री. सोयिन्कानी व्यक्तिश: असे म्हटलेले आमच्या नोंदीमध्ये आहे की ह्या बॉम्बस्फोटांबद्दल किंवा निष्पाप नागरिकांच्या जीवित हानीबद्दल त्यांना 'ना खेद ना खंत'. ह्या गोष्टी सगळ्यानाच ठाऊक आहेत. ह्या घडलेल्या घटना सगळ्यानाच ठाऊक आहेत. त्यामुळे त्या ह्या नोबेल पारितोषिक विजेत्यांना ठाऊक असल्याच पाहिजेत. आज सोयिन्काच्या कृत्यांचा बचाव करताना पर्यायाने – अजाणतेपणे का होईना – ते दहशतवाद्यांना माफी देत आहेत.

अमेरिकेच्या एफ. बी. आय (FBI) सारखाच आमचा नायजेरिअन 'गुन्हे अन्वेषण विभाग' आहे. 'आल्कोहोमा स्टेट बॉम्बस्फोटांची' व इतर तशाच दहशतवादी कारवायांची चौकशी एफ. बी. आय. करीत आहे. तशीच चौकशी आमच्या ह्या विभागाने केली आहे. कसून केलेल्या चौकशीतून ह्या घातपातामागचे गुन्हेगार कोण ह्याचा त्यांनी शोध लावला आहे. श्री. सोयिन्का आणि इतर काहींचा ह्या घटनांशी असलेला संबंध आता उघड झाला आहे. अर्थातच कायद्याच्या तरतुदीची अंमलबजावणी करणे क्रमप्राप्त झाले आहे. श्री. सोयिन्का आणि त्यांचे साथीदार कटवाले ह्यांना नायजेरिआच्या कायद्यानुसार जाहीर कोर्टासमोर उभे करणे



अनुक्रमणिका

आवश्यक ठरले आहे. स्वत:च्या पसंतीचा वकील देऊन ह्या खटल्यात श्री. सोयिन्का स्वत:ची बाजू मांडू शकतात.

सुव्यवस्था राखणे, दहशतवाद्यांपासून नागरिकांचे संरक्षण करणे हे नायजेरिअन सरकारचे कर्तव्यच आहे. सरकारचे कायदे मोडणाऱ्यांवर योग्य स्वरूपाचे खटले भरणे – मग भले ते नोबेल पारितोषिक विजेते का असेनात – हेही आमच्या सरकारचे कर्तव्यच आहे.

**नायजेरिअन माहिती खाते,** **इ. अगबेइजीर**
**नायजेरिअन राजदूतांचे ऑफिस,** **अे. अबुबकर**
**न्यूयॉर्क सिटी.**

वरील खुलासा हातात पडताच पेन अमेरिकन सेंटरचे अध्यक्ष श्री. मायकेल स्कॅम्मेल ह्यांनी तो सोयिन्काकडे पाठविला. सोयिन्काचे उत्तर पुढीलप्रमाणे –

'पत्रलेखक सर्वश्री. अे. अबुबकर आणि इ. अॅगबेइजीर ह्या न्यूयॉर्कला असलेल्या नायजेरिअन माहितीखात्याच्या अधिकाऱ्यांकडून फक्त एकच गोष्ट विचारून घ्या की त्यांना ही माहिती कुठून मिळाली. छापील स्वरुपात की इलेक्ट्रॉनिक माध्यमात – सोयिन्का असे म्हणाल्याचा पुरावा आहे की त्याला नायजेरिआचे निष्पाप नागरिक बॉम्बवर्षावात मेले असले तरी त्याची खेदखंत वाटत नाही तेवढे ते दाखवा म्हणावे.

ज्यांना 'सत्य' ह्या शब्दाचा अर्थच माहीत नाही, तथाकथित कायद्याच्या चौकटीत बसवून केलेल्या हत्या जे त्यांच्या कर्तव्यापोटी पोपटासारखे बोलून योग्य मानतात, त्यांचे हे म्हणणे अगदी त्याच धर्तीचे आहे. मी कदाचित त्यांना थोडी मदत करू शकेन. बीबीसीवर एका प्रश्नाला मी दिलेल्या उत्तरासंबंधी ते बोलतायत का? मी म्हटले होते –

"अबाच्याच्या काळातल्या हिंसाचाराला मी नावे ठेऊ शकत नाही. त्याचे राज्य खालसा करण्यासाठी ह्या गोष्टी आवश्यकच होत्या."

पूर्वकल्पनांनी भारलेली त्यांची ही डोकी माझ्या ह्या वक्तव्याचा संबंध निष्पाप नागरिकांच्या मृत्यूशी जोडतायत का? असे असेल तर २८ नोव्हेंबर १९९३च्या 'न्यूयॉर्क टाइम्स मॅगेझिन'मध्ये बुद्धीस्ट जगाचा आध्यात्मिक नेता असलेले दलाई लामा काय म्हणतात ते त्यांनी जरा नीट वाचावे.

प्रमाणशीर हिंसाचार आणि शिस्तबद्ध युद्धे ह्या गोष्टी लामांना मान्य आहेत. पण म्हणून त्यांचा संदर्भ निष्पाप लोकांच्या मृत्यूशी जोडला गेल्याचे मी अजून ऐकलेले नाही. चीनमधल्या किंवा तिबेटमधल्या दहशतवादाशी किंवा फंदफितुरीशी त्या मुलाखतीचा संबंध अजूनतरी जोडला गेलेला नाही. 'मी स्वत:ला पोपपेक्षा अधिक पवित्र समजत नाही.'

मला अबाच्याच्या कोर्टापुढे माझी कैफियत मांडायची संधी दिली गेली. भरवशाच्या नायजेरिअन प्रतिनिधींनी इतका दुबळेपणा दाखवावा आणि इतकी चमत्कारिक, इतकी

विक्षिप्त गोष्ट व्यक्त करावी ह्यामुळे मी – त्यांच्याच एक नायजेरिअन बंधू अगदी संकोचून गेलो आहे. लोकशाहीविरुद्ध अशी जी आपली भूमिका आहे ती आपण गोंधळून न जाता चालू ठेवू या.

आबाचाची दहशतवादी राजवट आम्हाला मान्य नाही. ही राजवट दररोज, नायजेरिअन लोकातील ओगोमी या समूहाविरुद्ध 'मिलटरी मिशन्सची' (दलाई लामाकडून उसना घेतलेला शब्द) कारवाई करते. हे सारेच घृणास्पद आहे. आबाचाची तथाकथित न्यायालये, ही त्याच्या राजवटीसारखीच बेकायदेशीरपणाचा अंगरखा घातलेली आहेत. या अशा खुनी उचल्याच्या या न्यायलय या साधनासमोर, केवळ नायजेरीय जनतेच्या डोक्याशी तो आपली बंदूक धरून उभा आहे, हे लक्षात आल्यावर आपला बचाव करणे हे सर्वस्वी चुकीचे आहे. तसे करणे म्हणजे एका मूलभूत बीभत्सतेला सफाई व झळाळी देण्यासारखे आहे.

नायजेरियामध्ये परत जेव्हा कायद्याचे राज्य प्रस्थापित होईल तेव्हा अबाच्या आणि त्याचे हुजरे त्यांच्या माणुसकीला काळिमा लावणाऱ्या गुन्ह्याचा जाब देतील — ते जे काही सांगतील किंवा सांगणार नाहीत त्यावर ते जाब देतील तो अवलंबून नसेल तर ते रोज जे काही करीत आहेत आणि त्यांच्याविरुद्ध रोजच्या रोज जे गुन्हे नोंदवले जातायत ते गुन्हे जगापुढे सिद्ध होतील आणि जे न्यायाधीश भिणार नाहीत किंवा खरीदले जाऊ शकणार नाहीत अशा न्यायाधीशांपुढे हे खटले चालतील.

**एमरॉय युनिव्हर्सिटी**
**अटलांटा, जॉर्जिया.**

**वोल सोयिन्का**
**नायजेरीय**

**– नाना जोशी**

---

सोव्हियट कम्युनिस्ट साम्राज्यशाहीने आजवर जे अनन्विय अत्याचार केले, ते सर्व तसे 'अंधाराचा' फायदा घेऊन केले होते. कोट्यवधी लिथुलियन नागरिकांना आपल्या मायभूमीतून हुसकावून लावून हद्पार करण्यात आले, लक्षावधी पोलिश लोकांचा खून, क्रिमियामधील तार्टर लोकांचा पार उच्छेद, हे सारे गुन्हे सुबुद्ध जाणकार माणसांच्या स्मरणात नक्कीच असतील. पण या गुन्ह्यांचे छायाचित्रण झालेले नसल्याकारणाने, त्या संबंधीचा दस्तऐवजी स्वरूपाचा पुरावा अस्तित्वात नाही. थोड्याच दिवसांनी अथवा कालांतराने (जनतेची स्मरणशक्ती तशी अधुरीच असते) हे सारे गुन्हे या बनावट कथा आहेत असे जाहीर करण्यात येईल. परंतु सोव्हियट कम्युनिस्ट साम्राज्यशाहीने झेकोस्लोवाकीयावर केलेल्या स्वारीबाबत मात्र तसे नाही. याचे कारण त्या स्वारीबाबतची असंख्य छायाचित्रे आणि चित्रपट उपलब्ध आहेत. हा सारा दस्तऐवजी स्वरूपाचा पुरावा जगातील अनेक दप्तरखान्यात सुरक्षित आहे. **–मिलान कुंडेरा**



अनुक्रमणिका

# पाश्चिमात्य कादंबरीचे मानकरी

## फ्रांस्वा राब्ले

**–विष्णू सदाशिव ब्रह्मे**

गर्भार मादाम ग्रांदगौइसे (Grand gouiser) एवढा काही अरबटचरबट मांसाहार करते की तिला रेचक देण्याची पाळी येते. ते एवढं जालीम असतं की गर्भवेष्टनाचे तीनतेरा होतात. गार्गात्वाचा गर्भ तिच्या नसात शिरतो, सर्वांगात फिरतो आणि तिच्या कानावटे बाहेर पडतो. प्रारंभीच्या ओळींपासून पुस्तकानं आपला हात दाखवला आहे : इथं सांगण्यात आलेली कथा गंभीर नाही : म्हणजे असं, इथं सत्यनिष्ठ (शास्त्रीय वा प्राक्कथानिष्ठ) विधानं नाहीत; वास्तवात गोष्टी जशा असतात, घडतात तशा त्या वर्णन करण्याची हमी नाही, आश्वासन नाही.

या जगावेगळ्या जन्मकहाणीचा जनक आहे फ्रांस्वा राब्ले (१४९४– १५५३) (Francois Rabelais). फ्रेंच फिजिशियन, मानवतावादी आणि साहित्यिक. जन्म शीनाँजवळील दव्हिन्येर येथे. वडील श्रीमंत जमीनदार, व्यवसायानं वकील. १५२१ मध्ये राब्लेनं फ्रान्सिस्कन मठात प्रवेश केला. या काळात त्यानं ग्रीक भाषेत काव्यरचना केली. ती भाषा पाखंडी ठरवून सॉरबॉननं (Sorbonne) तिच्यावर बंदी घातली तेव्हा राब्लेच्या फ्रांसिस्कन वरिष्ठांनी त्याची ग्रीक पुस्तकं वगैरे जप्त केली.

ती त्याला परत करण्यात आली तेव्हा मायझेचा बिशप जो फ्रवा देस्तिसाक याच्या पुढाकारानं थोडाफार सहिष्णू असलेल्या बेनेडिक्टन पंथाच्या मठात तो दाखल झाला होता. बिशप देस्तिसाकचा सचिव म्हणून त्यानं काम केलं. १५२८ मध्ये वरिष्ठांची परवानगी न घेता त्यानं जोग्याची वस्त्रं उतरवली, मठाला रामराम ठोकला आणि वैद्यकीय शिक्षणासाठी तो पॅरिसला गेला. तिथं एका अज्ञात विधवेशी त्याचा शरीरसंबंध जुळून आला. तिनं त्याच्या दोन अनौरस मुलांना जन्माला घातलं. सॉरबॉननं मनाई केलेली असतानाही फाशी देण्यात आलेल्या एका गुन्हेगाराचं त्यानं शवविच्छेदन केलं आणि रोष ओढवून घेतला. १५३७ मध्ये माँपेल्ये विद्यापीठातून वैद्यकशास्त्रातील डॉक्टरेट ही पदवी संपादन केली.

लीआँ (Lyon) येथील सरकारी हॉस्पिटलात काही काळ डॉक्टरकी केली. पॅरिसचा बिशप झां द्यू बेले याचा डॉक्टर म्हणूनही काम केलं. स्त्रियांमधील हिस्टेरियाचं मूळ, गर्भावरील नाविन्यपूर्ण उपचार यासारखे वैद्यकीय शोध त्याच्या नावावर आहेत. पण वैद्यकीय शास्त्रापुरतंच त्याचं ज्ञानक्षेत्र मर्यादित नव्हतं. त्याच्या ज्ञानलालसेला कुठलाही विषय वर्ज्य

नव्हता. धर्मशास्त्र, कायदा, राजकारण, युद्धशास्त्र, वनस्पतिशास्त्र, हिब्रू, ज्यांचा ठावठिकाणाही त्या काळात ज्ञात नव्हता अशी आदिवासी जमात यासारख्या विविध विषयात त्याला उत्तम गती होती. तत्कालीन समाज आणि समाजजीवन याविषयीचं त्याच्याएवढं ज्ञान असणारा अन्य कोणी फ्रांसमध्ये शोधूनही सापडला नसता. उच्चभ्रूंच्या भाषेएवढीच खेडुतांच्या बोली भाषेतली त्याची जाणकारी वादातीत होती. त्याचं शब्दभांडार विपुल. त्यानं बहुधा शब्दकोश गिळलेला असावा असं म्हटलं जात असे. शिवाय डझनभर परकीय भाषा त्याला अवगत होत्या. पुरातत्त्वशास्त्र आणि वैद्यकशास्त्र यावर त्यानं लॅटिनमधून केलेल्या लिखाणामुळं तो नावारूपाला आला. पण तो विश्वविख्यात झाला तो त्यानं फ्रेंचमध्ये लिहिलेल्या उपहासप्रधान कादंबरी मालिकेमुळे.

राब्लेनं या पुस्तकाचे 'लिव्ह्र'चे स्वत: भाग पाडलेले होते ते असे – 'गार्गांत्वा' (Gargantua) (१५३४), 'पाँताग्रुएल' (Pantagruel) (१५३२ – ३३), 'त्येर लिव्ह्र' (Tiers Livre) (१५४६),'Quart लिव्ह्र' (पहिली अकरा प्रकरणं १५४८, उर्वरित भाग १५५२), 'सांक्येम लिव्ह्र' (Cinquieme Livre) (१५६४) हा शेवटचा भाग त्याच्या निधनानंतर प्रकाशित झाला. यापैकी पहिल्या दोन भागांचं इंग्रजी भाषांतर १६५३ मध्ये व उरलेल्या भागाचं १६९३ – ९४ मध्ये प्रसिद्ध झालं. इंग्रजी साहित्यावर त्याचा प्रभाव पडला. जोनाथन स्विफ्ट (१६६७ – १७४५), लॉरेन्स स्टर्न ( १७१३ – १७६८), सॅम्युएल बटलर (१८३५ – १९०२), जेम्स जॉइस (१८८२ – १९४१) यांच्या लिखाणामधून हा प्रभाव जाणवतो.

'पाँताग्रुएल' हा कादंबरी मालिकेतील दुसरा भाग राब्लेनं प्रथम लिहिला. 'पाँता' हा All चा ग्रीक भाषेतील समानार्थी शब्द. आणि ग्रुएल म्हणजे हॅगरन भाषेत thirsty. पाँताग्रुएल म्हणजे All thirsty one सदैव तहानलेला, पिपासू. लोकांच्या घरात मीठ शिंपडत हिंडणारा हा राक्षस फ्रेंच भाषिकांना परिचित होता. डॉक्टरांनी त्याचं नाव घशाच्या खवखवीला – जी तहानेला कारणीभूत होते – दिलं होतं. या कादंबरीत पिणं हे पुनरावर्ती रूपचिन्ह सातत्यानं वाचकांसमोर येतं. या काळात १५३२ मध्ये फ्रांसमध्ये कधी नव्हे एवढं पाण्याचं दुर्भिक्ष्य होतं. ही योगायोगाची गोष्ट. आणखीन एक योगायोग म्हणजे याच वर्षी आर्थर राजासाठी मेरलिननं लिहिलेल्या 'जायंट गार्गात्वा' चं प्रकाशन. राक्षसावर रचलेला त्यांचा हा कुलवृत्तांत फ्रांसमध्ये एवढा लोकप्रिय झाला होता. राब्ले सांगतो की मुद्रकांनी गेल्या नऊ वर्षात 'बायबल'ची जेवढी विक्री केली नसेल त्याहून कितीतरी अधिक विक्री त्यांनी या पुस्तकाची अवघ्या दोन महिन्यात केली.

ही कहाणी राब्लेसमोर होती, पण त्याच्या प्रतिभेच्या परीसस्पर्शानं तिला एक नवं रूप, नवं परिमाण लाभलं. अतिशयोक्ती हा त्याच्या आवडीचा अलंकार. जोडीला अचाट

कल्पनाशक्ती आणि बेफाम विनोदबुद्धी. या साऱ्यांचा कलात्मक वापर करून मूळ आदिम कथेचा ओघवत्या कथनशैलीत त्यानं विस्तार केला. गार्गात्वा आणि युटोपियाची राजकन्या बोदेबेक (Badebec) यांच्या पाँताग्रुएल हा पुत्र. जलदुर्भिक्ष्य – शापित शुक्रवारी तो जन्माला येतो. जन्म होताक्षणीच हे बालक इतर बालकांप्रमाणे अँ अँ करून रडला नाही, तर मोठ्या आवाजात ते म्हणालं, 'मला प्यायला द्या! मला प्यायला द्या! मला प्यायला द्या!' जणू काही अवघ्या जगाला आपल्याबरोबर पिण्यासाठी आमंत्रित करीत होता.

आणि एवढ्या आवेगानं की त्याचा आवाज 'बूझ' (आकंठ ढोसणारे) आणि 'बिब्बर्स' (तब्यतीनं पिणारे) या प्रदेशात ऐकू जातो. बाप त्याचं नाव ठेवतो पाँताग्रुएल आणि भविष्यवाणी वर्तवतो की त्याचा पुत्र दिपसाँदावर (Dipsode) (तहानलेले लोक) राज्य करील. त्याची अफाट ताकद, तिला साजेसा त्याचा प्रचंड आहार, पॅरिसमधील त्याच शिक्षण, सदैव उल्हसित असणाऱ्या पार्नुज्यशी (Panurge) त्याची भेट व जुळून आलेली गाढ मैत्री, सॉरबॉन येथील विद्वत्तापूर्ण वादविवाद, तहानलेल्या लोकांच्या आक्रमणाचा यशस्वीरित्या बिमोड करून युटोपियाचं त्यानं केलेलं रक्षण, अधोलोकीची साहसी यात्रा इत्यादींचं काहीसं विस्कळीत तरीही उत्कंठावर्धक चित्रण राब्लेनं केलं आहे. विलक्षण झपाट्यानं त्यानं ही कादंबरी पूर्ण केली. 'आल्कोफ्रिबास नास्ये' (Alcofribas Nasier)(सार काढणारा) या टोपणनावानं ती ऑक्टोबरमध्ये प्रसिद्ध झाली. लिऑंच्या जत्रेत ती हातोहात खपली. त्या पाठोपाठ काढलेली दुसरी आवृत्तीही मिळेनाशी झाली. यातील अश्लील साहसं आणि कर्म, सॉरबॉनवरील उपहासपूर्ण टीका सॉरबॉनच्या सोवळ्या नजरेला खुपली. पण त्यावर बंदी घालणं, ती जप्त करणं मात्र जमलं नाही. त्यावर अश्लीलतेचं शिक्कामोर्तब करण्यावरच त्यांना समाधान मानावं लागलं.

'पाँताग्रुएल'च्या याशानं राब्लेला हुरूप आला. इस्पितळातील कामं, प्रवास हे व्याप मागं असूनही त्यानं 'गार्गात्वा' लिहून हातावेगळी केली. दुसऱ्या भागानंतर प्रसिद्ध झालेल्या या पहिल्या भागात पाँताग्रुएलचे वडील गार्गात्वा यांची जीवनकहाणी आहे. त्याचा जन्म आणि तारुण्य, जन्मग्राम व पॅरिस येथील शिक्षण – जुन्या पद्धतीचं पंडिती शिक्षण आणि नवविचारांचं मानवतावादी शिक्षण, त्याची रोमहर्षक साहसं, तत्कालीन शिक्षणपद्धती, राजकारण, लढाया आणि चर्चा या वादग्रस्त विषयांच्या अनुषंगानं त्यावर केलेला औपरोधिक हल्ला. राब्ले जन्मभर कॅथॉलिक राहिला असला तरी क्वचित प्रसंगी तो कट्टर प्रोटेस्टंट वाटावा अशी भूमिका घेताना आढळतो. ही कादंबरीही 'आल्कोफ्रिबास नास्ये' या टोपणनावानंच प्रसिद्ध झाली.

त्यानंतर एक तप उलटलं आणि 'त्येर लिव्र' हा तिसरा भाग प्रकाशित झाला. यात पाँताग्रुएल हा विचारी आणि विनोदीवृत्तीचा राजकुमार आहे तर पार्न्युज्य एक फटाकडा

सोंगाड्या, एका स्वतंत्र परगण्याचा उधळ्या गव्हर्नर. लग्न करायचं की नाही हा पार्न्युज्यापुढे असतो. तो प्रश्न सोडविण्यासाठी त्यानं केलेल्या धडपडीवरच कथानक वव्हंशी केंद्रित झालेलं आहे. या संदर्भात तो धर्मशास्त्रवेत्ते, तत्त्वज्ञ, कायदेपंडित, डॉक्टर्स, अगणित धर्मगुरू यांच्याशी सल्लामसलत करतो. विवाहाला नवऱ्यामुलाच्या आईवडिलांची संमती असणं महत्त्वाचं असतं हे पाँताग्रुएलच्या मनावर ठसवण्यासाठी राब्ले त्याच्या बापाला, गार्गांत्वाला मर्त्यलोकातून भूलोकी आणतो आणि त्याला पुत्रासमोर भाषणबाजी करायला लावतो.

अर्थात पोपला हे अमान्य आहे. त्याच्या मते पाद्र्यानं लावलेला विवाहविधी परमेश्वराच्या लेखी पुरेसा आहे. राब्लेला जुन्या करारातील पितरांच्या संमतीची गरज भासत होती, त्याला भीती वाटत होती की परमेश्वरानं आईवडिलांना बहाल केलेला अधिकार पोप हिरावून घेऊन स्वत:ची मक्तेदारी प्रस्थापित करील. त्या काळात उमराव आणि ऐपतदार लोक विवाह ही एक शृंगारिक युती आहे असं न समजता तो केवळ राजकीय, व्यावहारिक स्वरूपाचा शरीरसंबंध आहे असं मानत असत. पार्नुज्याच्या मते विवाहातील एकमेव निश्चितता म्हणजे 'ककोल्ड्री' – छिनालगिरी या भागावर लेखक म्हणून राब्लेचं नाव व त्याखाली 'वैद्यकशास्त्राचा डॉक्टर' असं छापण्यात आलं होतं. फ्रांसचा अधिपती पहिला फ्रांसिस याची बहीण मार्गरिट हिला तो अर्पण केलेला होता. राजाश्रयही त्याला लाभलेला होता. तरीही सॉरबॉनच्या रोषाला ती कादंबरी बळी पडली. त्यावर जप्ती लादण्यात आली. त्यात त्यांना तसा पाखंडीपणा आढळला नाही, पण soul आणि ars-oul यासारखे त्याचे उपमर्दकारक, अनादरशील श्लेष त्यांना खुपले होते.

'Quart लिव्ह्र' या चौथ्या भागात पाँताग्रुएलच्या देशोदेशीच्या प्रवासाचे वर्णन आहे. पार्नुज्याच्या अवघड समस्येवरील तोडग्यासाठी तो कथेमधील 'दैवी बाटली'च्या शोधात निघालेला असतो. एका प्रदेशात तर एवढा गारठा असतो की शब्ददेखील गारठून जातात.

"इकडे आहेत, इकडे, इकडे काही जे अद्याप विरघळलेले नाहीत," पाँताग्रुएल उद्गारला. नंतर त्यानं डेकवर आमच्यासमोर मूठभर गारठलेले शब्द फेकले, जे वेगवेगळ्या रंगाच्या बिलोरी मिठाईगत दिसत होते. आम्ही पाहिले, काही शब्द तांबुस किंवा रंगेल दुटप्पी, काही हिरव्या छटांचे, काही नीलवर्णीय, काही काळसर आणि काही असेच हरतऱ्हेचे. आमच्या हातात आम्ही त्यांना थोडी ऊब दिली तेव्हा बर्फागत ते वितळले आणि आम्ही प्रत्यक्षात त्यांना ऐकलं,अर्थात आम्हाला त्याचा अर्थ कळू शकला नाही कारण ते आदिम भाषेतील होते. तथापि, त्यात एक अपवाद निघाला. फ्रियर जॉननं जेव्हा तो उचलला तेव्हा त्यानं एखाद्या चेस्टनसारखा आवाज केला. तो निखाऱ्याक्र फेकून द्यावा तसा त्यानं स्फोट केला आणि आमची पाचावर धारण बसवली. "तो होता त्याच्या हातातील एक तोफेचा बार" फ्रियर जॉन म्हणाला.

पार्नुज्यानं आणखीन काही त्याला द्यायला पाँताग्रुएलला सांगितलं. पण पाँताग्रुएल उत्तरला की, केवळ प्रेमिक त्यांचे शब्द देतात.

'सांक्येम लिव्ह्र' या शेवटच्या भागात प्रवासी इप्सित स्थळी पोचतात. 'ओरॅकल' ठामपणे सांगते : 'हसणं नव्हे तर पिणं हीच मानवाची वास्तविक भूमिका आहे. 'पिणं' या संकेतगर्भ शब्दाला आता एक नवा अर्थ प्राप्त होतो. 'पिणं' या पुनरावर्ती रूपचिन्हाचा उलगडा होतो. पाँताग्रुएलच्या प्रचंड आकाराचा, त्याच्या कधीच शमल्या न जाणाऱ्या पिपासेचा अर्थबोध होतो. 'रेनेसांस'च्या या काळात प्रत्येक विद्वानाला, जिज्ञासूला सदैव तहान लागलेली असते, ज्ञानाची, प्रबोधनाची. हा अखेरचा भाग राब्लेच्या निधनानंतर नऊ वर्षांनी लोकांसमोर आला. याच्या कर्त्याविषयी मतभिन्नता आहे.

या कादंबरी – पंचकातील पहिले दोनच भाग पाश्चात्त्य साहित्यात अभिजात म्हणून मानले जातात. आधुनिक पाश्चात्त्य कादंबरीचा पाया रचण्याचा मान राब्लेला देण्यात येतो तो या दोन भागांच्या त्याच्या लेखन कर्तृत्वामुळे. लॅटिन, ग्रीक भाषेत लिखाण करणं विद्वत्तेचं, मानाचं समजलं जात असे. फ्रेंचमध्ये लिहिणं कमी लेखलं जात असे. राब्लेला लॅटिन, ग्रीक भाषा चांगल्या अवगत होत्या. त्या भाषेत त्याचं लिखाण प्रसिद्धही झालं होतं. असं असूनही त्यानं फ्रेंचमधून साहित्य निर्माण केलं ते त्या भाषेवरील निष्ठेपायी. त्या भाषेला साहित्यिक दर्जा मिळवून देण्यात त्याचा वाटा सिंहाचा. बाजारहाटामध्ये बोलली जाणारी भाषा वापरण्यास तो कचरला नाही. अर्वाच्य भाषा त्यानं साहित्यकृतीत वर्ज्य मानली नाही. आपल्या कादंबरीचा पहिला भाग त्यानं अर्पण केला आहे – "अत्यंत नामवंत पिणारे आणि तुम्ही, मौल्यवान गर्मी जडावलेले, तुम्हाला अन्य कुणालाही नाही. . . ." ॲरिस्टॉटल सर्वच गोष्टीत सर्वेसर्वा मानला जात असे तेव्हाचा तो काळ. त्यानंच सांगून टाकलं होतं की, सर्व प्राण्यांमध्ये फक्त माणसालाच हास्याचं वरदान लाभलं आहे आणि 'गार्गात्वा'च्या प्रारंभीच राब्लेनं आपला विषय जाहीर केला होता.

It teaches little, except how to laugh
The best of arguments; the rest is chaff,
Viewing the grief that threatens your brief span
For smiles, not tears, make the better autogaraph,
Because to laugh is natural to man.

आणि निखळ विनोदी साहित्यकृती वाचकांच्या हाती दिली. गार्गात्वाला त्याच्या आईच्या कानावाटे जगाच्या रंगमंचावर सोडून दिलं.

नुकतंच कुठं फुलपाखरात रूपांतर होणारा किडा, रंगीबेरंगी पंख पसरून उडू पाहणारा. राब्लेच्या कादंबरीचं स्वरूप या किड्यागत होतं. तिचा पसारा प्रचंड. गतकालीन अद्भुत

कहाण्यांचा वारसा सांगणारा पाँताग्रुएल तर तोवर अज्ञात असलेल्या कादंबरी या वाङ्मय प्रकारचा झेंडा फडकावत येणारा अग्रदूत पार्नुज्य. नव्या कलाविष्काराच्या या असामान्य क्षणानं राब्लेच्या पुस्तकाला थक्क करून टाकणारी श्रीमंती बहाल केली आहे. त्यात सारं काही आहे : संभाव्य आणि असंभाव्य, रूपक, उपहास, थोर्थोराबरोबर सामान्य माणसं, दंतकथा, चिंतन, वास्तव आणि अद्‌भुत प्रवास, व्यासंगी वादविवाद, निखळ शाब्दिक नैपुण्याची विषयांतरे, वैविध्यपूर्ण विश्व आणि ते रंगवण्यात घेतलेलं आल्हाददायी स्वातंत्र्य– एकोणिसाव्या शतकाचा वारसा घेतलेल्या आजच्या कादंबरीकाराला हेवा वाटावा असं.

गार्गांत्वा विद्यापीठात शिक्षण घेण्यासाठी पॅरिसला येतो. त्याला आढळून येतं की त्या शहारातील लोकं जात्याच,एवढी मूर्ख, अजागळ, बिनडोक आहेत की एखादा गारुडी, घंटा बांधलेलं खेचर, विधवा – विक्या, सार्वजनिक चौकातील सारंगीवाला तुफान गर्दी जमवू शकेल तेवढी एखादया चांगल्या धार्मिक प्रवचनकारालाही जमवणं शक्य होणार नाही. या गर्दीपासून सुटका करून घेण्यासाठी गार्गांत्वा नोत्रदामच्या आसऱ्याला जातो, त्या कॅथिड्रलच्या मिनारावर चढून जातो. तिथून मोठ्या आवाजात ललकारतो :

"माझा असा होरा आहे की हे लफंगे माझ्याकडून आदर सत्कार करून घेण्याची आणि लाभ उठवायची अपेक्षा करीत असतील, हो ना? आणि ते अगदी रास्त आहे. मी त्यांना देणार आहे एक द्राक्षासव "पार – रीस – तुम्हाला हसवेल असं." आणि तो आपल्या विजारीची बटणं खोलतो आणि मूत्रविसर्जन करू लागतो. राक्षसच तो प्रचंड. त्याच्या लघवीचा झोतही प्रपातागत. लघवीच्या कडूचार प्रलयानं तो त्यांना ओलंचिंब करून टाकतो. या पुरात Two hundred sixty thousand four hundred eighteen (2,60,000,418) बुडतात. यात स्त्रिया आणि लहान मुलं यांची मोजदाद नाही. काहीजण पराक्रमी लघवी करणाऱ्यापासून चपळाईनं निसटतात आणि घामानं निथळत, खोकत, थुंकत, धापा टाकत विद्यापीठाच्या एका उंचावरील स्थळी पोचतात. बरेच जण शिव्यांची लाखोली वाहतात, काहीजण रागानं चवताळून दात ओठ खातात. तर काही पोट धरून खदखदा हसत राहातात. 'ही मंडळी' हसणं ओसरल्यानंतर त्यांच्या शहराचं नाव पॅरीस (पार रीस : हास्य) ठेवायचं असा निर्णय घेतात.

त्या वेळेपर्यंत ते Leutitia या नावानं ओळखलं जात होतं, स्ट्रॅबोच्या म्हणण्यानुसार libiii, ग्रीकमध्ये 'सफेत.' तिथल्या बायांची सफेत ढुंगणं हे त्यामागील कारण. गार्गांत्वा आपली ही महनीय कामगिरी बजावून झाल्यानंतर तिथल्या घंटांकडे त्याचं लक्ष जातं. त्यांच्या मधुर नादावर तो फिदा होतो. त्या घंटा तो काढतो आणि आपल्या बापाकडे माल चढवून पाठवत असलेल्या आपल्या घोडीच्या गळ्यात बांधतो.



अनुक्रमणिका

पानुर्ज्य ही राब्लेनं निर्माण केलेली एक अविस्मरणीय व्यक्तिरेखा. पाँताग्रुएलचा हा जिवश्चकंठश्च मित्र. चतुर, डावपेच लढवण्यात कुशल, व्यासंगी, चतुरस्त्र व्यक्तिमत्त्व. तो एका बाईच्या प्रेमात पडतो. काहीही करून तिला गटवायची हा त्याचा निश्चय. पण ती त्याची डाळ शिजू देत नाही. एक दिवस तिच्यामागून तो चर्चमध्ये जातो. तिथं 'मास' चालू असतो आणि पार्नुज्य भयंकर अर्वाच्य भाषेत आपल्या हृदयीचे गूज तिला ऐकवतो. (आजच्या अमेरिकेत, 'शाब्दिक बलात्कार' या आरोपाखाली अशा इसमाला कोर्टात खेचण्यात येईल) ती त्याचं काही ऐकून घेण्यास तयार नाही हे पाहून तो तिच्यावर सूड उगवतो. माजाला आलेल्या कुत्रीच्या जननेंद्रियांचे बारीकबारीक केलेले तुकडे तिच्या झग्यावर फेकतो. ती चर्चच्या बाहेर पडून रस्त्यावर येते मात्र, अवतीभवतीचे कुत्रे (राब्ले सांगतो Six Hundred Thousand and Fourteen) तिच्या दिशेनं धाव घेतात, हुंगतात आणि तंगड्या वर करून तिच्यावर चिळकांडी सोडतात.

पार्नुज्यची बुद्धीही तल्लख. पाँताग्रुएल त्याला विचारतो की त्यानं एवढं कर्ज करून ठेवलं आहे की त्यातून तो मोकळा कसा काय होणार? त्यावर तो उत्तरतो,"मी निर्माता आहे, तू म्हणशील, कशाचा निर्माता? शंका आहे? पाहा त्या साऱ्या झकास, देखण्या धनकोंना ! खरोखरीच धनको – आणि आकाश कोसळून पडलं तरी त्यांना सोडणार नाही– झकास आणि देखणे प्राणी असतात. दररोज सकाळी, जेव्हा मी माझ्या भोवताली नेहमीचेच धनको पाहातो तेव्हा माझी तबियत खूष होते असं नाही वाटत तुला? आणि ते सर्वजण माझी सेवा करायला एवढे विनम्र असतात, एका पायावर तयार असतात, आणि लवून मुजरे करणं म्हणजे किती? आणि त्यांच्यापैकी एकाकडे मी दुसऱ्याकडे पाहिलेलं असतं त्याहून अधिक प्रसन्न मुद्रेनं पाहातो. तेव्हा माझ्या ध्यानी येतं त्या रांडेच्याला वाटतं त्याला त्याचं देणं प्रथम मिळणार आहे . . . . हे आहेत माझी मेहेरनजर मिळवू पाहाणारे, माझ्यासाठी ताटकळणारे, माझ्यापुढे माथा झुकवणारे, माझं स्वागत करणारे, माझी विनवणी करणारे कायमचे अर्जदार. आणि या सुखापासून वंचित होण्यास कोण मागेल?"

कादंबरीतील काही प्रसंग तर 'ब्लॅक कॉमेडी'शी नातं जोडणारे आहेत. चवथ्या पुस्तकामधील हा प्रसंग. अथांग दरिया. पाँताग्रुएलच्या गलबताची मेंढ्यांचा व्यापर करणाऱ्यांच्या गलबताशी गाठ पडते. त्यातील एका व्यापाऱ्याची नजर पार्नुज्यवर पडते. मांडचोळणा नाही, चष्मा हॅटला आवळून बांधलेला असा त्याचा अवतार पाहून त्याची खिल्ली उडवण्याची त्या व्यापाऱ्याची इच्छा बळावते. तो पार्नुज्यपाशी जातो, लंब्या चौड्या गप्पा मारतो. संभाषणाच्या ओघात त्याला हिणवण्याची संधी तो वाया दवडत नाही.

कहर म्हणजे तो त्याला 'ककोल्ड'– ज्याची बायको दुसऱ्याला लागू आहे असा– म्हणून संबोधतो. पार्नुज्य त्याला प्रत्युत्तर करीत नाही. तो त्या व्यापाऱ्याकडून एक मेंढरू विकत घेतो

आणि ते समुद्रात भिरकावतो. बाकीची मेंढरं त्याच्या वृत्तीला अनुसरून त्या मेंढरापाठोपाठ समुद्रात उड्या घेतात. व्यापाऱ्यांचं धाबं दणाणतं. मेंढरांची लोकर, शिंगे धरून त्यांना वाचवण्याच्या प्रयत्नात तेही समुद्रात खेचले जातात. पार्नुज्य एक वल्हं उचलतो. त्यांना वाचण्यासाठी नव्हे तर पुन्हा गलबतावर चढण्यास त्यांना अटकाव करता यावा म्हणून, एवढंच नव्हे तर हे कार्य करीत असताना तो फर्ड प्रवचन देतो.

भूलोकीच्या दारुण दैन्याचं तो वर्णन करतो आणि परलोकी लाभणाऱ्या फायद्याचं, तिथल्या मौजमजेचं सुरेख चित्र रंगवतो. सांगतो : मृत हे जिवंतांपेक्षा अधिक भाग्यवान आहेत. असं असूनही माणसांबरोबर राहाणं त्यांना पसंत असेल तर जोनाप्रमाणं (Jonah) त्यांनी एखाद्या देवमाशाबरोबर मिटिंग आयोजित करावी. (समुद्रात फेकून देण्यात आलेल्या अश्रद्ध जोनाला एक देवमासा गिळंकृत करतो आणि तीन दिवसांनी इजा न करता त्याला किनाऱ्यावर आणून फेकतो अशी जुन्या करारामध्ये आख्यायिका आहे.)

व्यापारी आणि त्यांची मेंढरं यांचा शेवट काय झाला हे सांगणे न लगे. पार्नुज्यच्या या कृत्याबद्दल भला फ्रेअर ज्याँ (Frere Jean) त्याचं अभिनंदन करतो, पण त्या व्यापाऱ्याला आगाऊ पैसे देऊन फुकटच पैसे खर्च केल्याबद्दल दोष देतो. पार्नुज्य सांगतो : "परमेश्वरकृपेने, माझ्यापाशी पन्नास हजार फ्रँक आहेत, केवळ असल्या मौजमजेखातर !"

हा प्रसंग उद्धृत करून ख्यातनाम कादंबरीकार मिलान कुंडेरा (१९२९) म्हणतो :'हा प्रसंग अवास्तव आहे, अशक्य कोटीतील आहे; निदान त्याला तात्पर्य तरी आहे का? व्यापाऱ्यांच्या कंजुषीबद्दल राब्ले तुच्छता दर्शवतो का? ज्यांच्या शिक्षेमुळं आपण खूष व्हावं की पानुर्ज्यच्या क्रौर्याची घृणा यावी म्हणून तो करतो? की धार्मिक प्रवचनातील क्लृप्त्यांची, त्यातील बिनडोकपणाची खिल्ली तो उडवत होता? ओळखा पाहू ! प्रत्येक उत्तर हा एक अक्कलहीन सापळा आहे.'

ऑक्टॅव्हिओ पाझ (OCTAVIO PAZ) सांगतो :"होमर आणि व्हर्जिल (७०– १९ खिस्तपूर्व) यांच्यामध्ये विनोद नाही; ॲरिस्टो (१४७४– १५३५) ती उणीव भरून काढतो असं वाटतं, पण सर्व्हांटिसचा (१५४७– १६१६) उदय होतो आणि विनोद आकाराला येतो." पुढं तो असं म्हणतो :"आधुनिक वृत्तीचं (Spirit) विनोद हे एक मोठं नावाजण्याजोगं संशोधन आहे." एक मूलभूत विचार : विनोद प्राचीन काळापासून चालत आलेला नाही; तो एक *शोध* आहे. कादंबरीच्या जन्माशी जखडलेला. विनोद म्हणजे हास्य नव्हे, खिल्ली नव्हे, तर हास्यतत्त्वाच्या विवक्षित उपजाती (Species).

पाझ सांगतो त्या (आणि ही किल्ली आहे विनोद जाणून घेण्याची) 'ज्याला स्पर्श करतात त्या साऱ्यांना संदिग्ध करून टाकतात' मेंढ्यांच्या व्यापाऱ्यांना जलसमाधी घ्यायला लावताना पार्नुज्य मृत्यूनंतरच्या जगाची स्तुतीस्तवनं गातो. या अपूर्व खेळापासून ज्या



अनुक्रमणिका

माणसांना मजा अनुभवता येत नाही त्यांना कादंबरीच्या कलेसंबंधीची एकही गोष्ट कदापी कळून येणार नाही.'

आपल्या पुस्तकांबाबत राब्लेनं वाचकांना सल्ला दिला आहे : 'कुत्र्याचं उदाहरण अनुसरून, तुम्ही शहाणेसुरते असायला हवं, हुंगण्यात, वास घेण्यास आणि या सुरेख आणि चमचमीत पुस्तकाचं मूल्यमापन करण्यात, आवश्यकता आहे ती पाठलागातील चपळाईची आणि हल्ला करण्यातील धिटाईची. त्यानंतर काळजीपूर्वक वाचनानं आणि सततच्या चिंतनानं, तुम्ही हाड फोडायला हवं. मज्जा भरपूर मज्जा (marrow) चोखू शकाल.'

१ मार्च १५५२ रोजी राब्लेच्या पुस्तकांवर बंदी घालण्यात आली. ही बंदी घालण्यात आन्द्रे Tiraqueau (१४८० – १५५८) याचा पुढकार होता. आन्द्रे हा राब्लेचा जुना मित्र, तरुणपणातील त्याचा साथी, मानवतावादाचा पुरस्कार करणारा सहकारी. हास्याची त्याची तहान प्रदिप्त करणं अतिशय कठीण असल्याचं राब्लेला आढळून आलं असणार. वर्षभरातच त्याची इहलोकीची यात्रा संपली. ती कशी संपली याबाबत खात्रीलायक माहिती उपलब्ध नाही. काहींच्या मते तो तुरुंगात मेला, तशा अख्यायिकाही आहेत. आणि त्याचा अखेरच्या उद्गाराबाबत बऱ्याच हकिकती आहेत. पण त्यातील अत्यंत भावणारे उद्गार नमूद केले आहेत त्याचा कल्पक इंग्रजी भाषांतरकार Pierre Motleux (१६६३– १७१८) यानं : "बहुधा मला एखादं उच्चपद मिळणार आहे, पडदा बाजूला सारा, फार्स रंगवला जात आहे."

---

तिला असे वाटत होते की, अशा प्रकारचे रानटी संगीत मान्य असलेल्या राजवटी, फक्त कम्युनिस्ट देशातच वरचष्मा ठेऊन आहेत. परंतु परदेशात गेल्यानंतर तिला असे आढळून आले की, संगीताचे गोंगाटात होणारे परिवर्तन ही पृथ्वी नामक ग्रहावर सध्या होत असलेली प्रक्रिया आहे. या प्रक्रियेच्या मदतीने, सर्वस्वी कुरूप अशा एका ऐतिहासिक अवस्थेत मानव समाज प्रवेश करीत आहे. ही सर्वस्वी अशी कुरूपता प्रथम एका गोष्टी-करवी भावू लागली. ती म्हणजे कानावर सातत्याने आदळणारे सर्वसाक्षी असे कुरूप आवाज. मोटारगाड्या, मोटार सायकल, इलेक्ट्रिक गिटार, ड्रिल, कर्णे, भोंगे इत्यादी दृष्य स्वरूपातील सर्वसाक्षी कुरूपता, त्याच्या पाठोपाठ येतेच.

–मिलान कुंडेरा



अनुक्रमणिका

# प्रेमपुजारी डी. एच. लॉरेन्स

श्रीकृष्ण कामत

## चौदा

गेल्या चार वर्षात फ्रीडा आपल्या मुलांना भेटलेली नव्हती. त्यांच्या ओढीनं ती इंग्लंडला आली होती. तिचा मुलगा मॉंटी (वय वर्ष बावीस) आता ऑक्सफर्डमध्ये होता. आईबरोबर त्याची वागणूक काहीशी घुमीच होती. आपली आई आपल्याला सोडून गेली याचा एल्झाला (वय वर्ष वीस) अद्याप विसर पडलेला नव्हता. पण अठरा वर्षांच्या वार्बराला मात्र आईबद्दल विलक्षण कुतूहल होतं. ती आईच्या वळणावर गेली म्हणून लहानपणी घरच्या लोकांकडून तिला बोलणी खावी लागत असत. लॉरेन्स आणि फ्रीडा सिसिलीमध्ये असताना, बार्बरानं त्यांना एक दिलचस्प पत्र पाठवलं होतं. त्यावेळी ती ग्रेट मापेल्सहेट येथील तिच्या काकाकडे राहात होती. आल्जेब्राच्या तासाला नग्नचित्रे रेखाटून तिनं वर्गातून फिरवल्यामुळं 'सेंट पॉल्स स्कूल' मधून तिची हकालपट्टी करण्यात आली होती.

आता ती लंडनमधील 'स्लेड स्कूल ऑफ फाईन आर्ट' मध्ये शिकत होती. तिची आणि फ्रीडा यांची गट्टी जमायला वेळ लागला नाही.

फ्रीडा काही दिवस कॉटबरोवर राहिली. प्रारंभी त्या दोघांमध्ये एकमेकांविषयी अविश्वासाची भावना असली तरी काही दिवसांनी त्यांच्या तारा जुळल्या. तिथून ती हॅम्पस्टेड येथील एका जुनाट घरात राहायला गेली. तिच्या वरच्या मजल्यावर कार्सवेल पतिपत्नी राहात होते. हे घर कॅथरीनच्या भावाचं होतं. तो सर्वात वरच्या मजल्यावर राहात होता. डोरोथी ब्रेट्ट जवळपास राहात होती. फ्रीडाला भेटायला ती येत असे. फ्रीडानं बोलण्यामधून तिला ध्वनित केलं की ती आणि लॉरेन्स कायमचे विभक्त होण्याची शक्यता आहे. या काळात एक व्यक्ती फ्रीडाला भेटण्यासाठी वरचेवर येत असल्याचं ब्रेट्टच्या नजरेनं टिपलं. ती व्यक्ती, जॉन मिडलटन मरे. ब्रेट्ट स्वत: मरेशी जवळीक साधून होती. यावरून पुढं लॉरेन्स तिला टोमणेही मारायचा.

परंतु तिच्याशी संग करावा एवढं काही आकर्षण मरेला तिच्याबद्दल वाटत नव्हतं. मरेचं वास्तव्य ब्रेट्टच्याच घरात होतं. कॅथरीन मॅन्सफिल्डच्या मृत्यूच्या आघातामधून तो अद्याप सावरलेला नव्हता आणि ऐकून घेणारा भेटला तर आपलं दु:ख त्याला ऐकवत होता. स्त्रियांना त्याचं आकर्षण नेहमीच वाटत असे आणि सोबती म्हणून फ्रीडाला तो पसंत होता. शिवाय, ती एकटी आहे यास्तव तिच्याकडे लक्ष द्यावं असं लॉरेन्सनं लिहिलं होत लंडनमधील हे दिवस फ्रीडाला सुखासमाधानाचे होते.



अनुक्रमणिका

दरम्यान फ्रीडाविना लॉरेन्स बेचैन आणि एकाकी झाला होता. लॉस एन्जल्झला त्यानं महिना काढला. या महिन्याभरात त्यानं सांता मोनिका, सांता बार्बरा आणि पाप स्प्रिंग्ज या स्थळांना भेटी दिल्या. मेरिल्ड आणि गोट्श्चे या डॅनिश चित्रकारासमवेत लोम्पोकच्या गावात जाऊन खग्रास सूर्यग्रहण पाहिलं. एव्हाना लॉस एंजल्झला तो पुरता विटून गेला. त्यानं डॅनिश चित्रकारांना सुचवलं, सर्वांनी मिळून मेक्सिकोला जायचं. मेरिल्डनं नम्रपणे नकार दिला. गोट्श्चे ग्वादालजारच्या प्रवासाला निघाले.

हा प्रवास खडतर होता. रेल्वेगाड्या रखडत धावत होत्या, मध्येच थांबत होत्या. डोंगराळ रस्त्यावरून फोर्ड गाड्या हिसके देत देत मार्ग आक्रमित होत्या, घोडे आणि तट्टू यावरची रपेट नाकी नऊ आणत होती. काही काळ एका सर्कसची सोबत त्यांना होती. रात्रभर सिहांचं गरजणं त्यांना बेजार करीत होतं. प्रवासाची दगदग, शीण असूनही लॉरेन्सचं फावल्या वेळात लेखन चालू होतं. मजल दर मजल करीत ते दोघं ग्वादालाजारला पोचले. गोट्श्चेचा प्रवासखर्च लॉरेन्सनं सोसला होता.

२२ ऑक्टोबरला गोट्श्चेनं नोंद केली आहे : 'तो (लॉरेन्स) सांगतो फ्रीडाशिवाय चपालाला जाणं त्याला रुचणार नाही. (तिची ओढ त्याला लागलेली आहे)..... त्याचा सध्याचा दिनक्रम, फक्त सकाळीच तो लिहायला बसतो, आणि उरलेला दिवस तो बाकड्यावर पडून असतो वा बाजारात भटकत असतो.'

त्यानंतर तीन दिवसांनी त्यानं नोंद केली : 'सध्या मी लॉरेन्सला शक्य होईल तेवढं टाळत आहे, कारण सर्व गोष्टी विचारात घेता, त्याचं डोस्कं आता फिरलेलं आहे.' स्थायिक होता येईल असं रांच शोधण्याचा त्यांनी प्रयत्न केला, पण मनाजोगतं रांच त्यांना आढळून आलं नाही. गोट्श्चे सांगतो : 'लॉरेन्ससारख्या माणसाबरोबर दीर्घकाळ राहाणं महाकठीण. त्याला शांत करण्यासाठी फ्रीडाची खरंच नितांत गरज आहे.' त्याच्या लक्षात आलं होतं की फ्रीडा आपल्याला कायमची सोडून गेली या विचारानं लॉरेन्स धास्तावलेला आहे. एकट्यानं दिवस काढणं त्याला अशक्य झालं. तिला त्यानं लिहिलं की त्याचं म्हणणं तिनं मानावं आणि त्याच्याकडे अमेरिकेत यावं. पण तशी शक्यता नव्हती.

इतक्या वर्षांच्या लॉरेन्सबरोबरच्या झगड्यात गमावलेलं आत्मभान पुन्हा मिळवण्याची गरज तिला भासत होती. आणि एव्हाना ती मरेच्या प्रेमात पडली होती. मरेही तिच्या भावनांना प्रतिसाद देत होता. तिच्या बरोबरच्या या सलगीचं या काळात त्यानं स्वत:शी समर्थन केलं होतं ते असं : फ्रीडानं त्याला स्पष्ट केलं होतं की लॉरेन्सबरोबरचे तिचे संबंध संपुष्टात आले आहेत. पुढील काळात त्यानं उद्‌गार काढले; लॉरेन्सच्या मेक्सिकन मूडचा ताप तिनं खूप सोसला आणि वस्तुत: 'तिनं त्याला सोडलेलं होतं. तिनं ठरवलं होतं, या पुढं त्याच्याशी इमान राखण्याचं काही कारण नव्हतं. यात तिचं काही चुकलेलं नव्हतं.'

सप्टेंबरमध्ये फ्रीडा आपल्या आईला भेटायला बादेन-बादेनला निघाली तेव्हा मरेनं तिच्या सोबत प्रवास करायचं ठरवलं. त्यासाठी त्यानं निमित्तही शोधून काढलं. त्याचा मित्र

कवी टि. एस्. इलियट याची पत्नी व्हिव्हीएन हिचा मानसिक तोल ढळला होता. तिच्या उपचारासाठी फ्रीबर्ग येथील एका तज्ज्ञाचा सल्ला घेऊन येतो असं सबळ कारण त्यानं पुढं केलं होतं.

मरे आणि फ्रीडा यांनी फ्रीबर्गपर्यंत एकत्र प्रवास केला. या प्रवासात त्यांच्या सलगीनं कुठवर मजल मारली होती हे निश्चितपणे सांगणं कठीण आहे. मरे मान्य करतो की ती दोघं एकमेकांच्या प्रेमात पडली होती, पण तो असाही दावा करतो, सर्वार्थानं प्रेमिक होण्याचं त्या दोघांनीही कटाक्षानं टाळलं. तो सांगतो, फ्रीडाची इच्छा होती की त्या दोघांनी फ्रीबर्गला एकत्र राहावं, आणि माझी तशीच खूप इच्छा होती. एकत्र झोपावं, एकमेकांच्या बाहुपाशात जाग यावी. ही कल्पना म्हणजे पृथ्वीवर स्वर्ग अवतरावा अशी वाटत होती.

मेक्सिकोमधील लॉरेन्सची तिच्याबरोबरची वागणूक भयानक होती. त्यांच्यामधलं काहीतरी तुटलं गेलं होतं. म्हणून मी विचार केला, फ्रीडाला स्वीकारण्यास मी मोकळा आहे, किंवा वाटलं, मी तिला जवळ केलं आहे, पण ऐन क्षणी, मी तसं काही केलं नाही.

फ्रीबर्गला मरेनं आपल्याबरोबर राहावं हे फ्रीडाचं आमंत्रण त्यानं अव्हेरलेलं असलं तरी या नकाराचा अर्थ असा नव्हे की ते तत्पूर्वी प्रेमिक नव्हते. कॉट आणि कॅथरीन कार्सवेल यांचं म्हणणं की फ्रीडा-मरेचे तसे संबंध होते. फ्रीडा इंग्लंडला परतल्यानंतर, मरेबरोबर तिनं प्रवास केला यावरून कॉटनं तिला फैलावर घेतलं होतं.

पुढील काळात फ्रीडा आणि मरे यांच्यामध्ये झालेल्या पत्रव्यवहारामधून त्या दोघांमधील सुखद सलगी जाणवते, पण त्यावरून ठोस निष्कर्ष काढणं दुरापास्त आहे. २७ मे १९४६ रोजी मरेनं फ्रीडाला लिहिलं आहे : 'जेव्हा मी म्हणतो ती (त्याची चौथी पत्नी मेरी गॅम्बल) मला ज्ञात असलेल्या कुठल्याही स्त्रीपेक्षा तुझं स्मरण करून देते तेव्हा, माझ्या लाडके, मी तुला हरभऱ्याच्या झाडावर चढवत नाही हे तू जाणतेसच. असो, ज्याला मी निष्पाप ईव्हचं ज्ञान म्हणतो त्याचं शिक्षण केवळ तूच मला जवळजवळ दिलं होतंस, ते ज्ञान तिच्या संगतीत मला आता पूर्णपणे लाभलेलं आहे.' तथापि, लॉरेन्सच्या निधनानंतरच्या, वर्षभराच्या काळात मरे काही काळ फ्रीडाचा प्रियकर होता आणि 'तुझ्या शेजारी मी पडून असतानाचे ते स्वर्गीय क्षण' या काळाशी संबंधित असण्याची शक्यता आहे.

१९५१ मध्ये, फ्रीडा तेव्हा बहात्तर वर्षाची होती, मरेनं तिला पाठवलेल्या पत्रात १९२३ मधील त्या दोघांनी एकत्र केलेल्या प्रवासाची स्मृती जागवली होती. 'तू तेव्हा मला असं काही दिलंस ज्याची मला आत्यंतिक गरज होती. त्यानं एक नवीन जग माझ्यापुढं खुलं केलं. आणि काही वेळेला विस्मयानं मी विचार करतो, जर्मनीला आपण एकत्र केलेल्या त्या प्रवासाचा आणि आपल्या दोघांनाही एकमेकांची नितांत गरज होती, लॉरेन्झोशी ती बेईमानी ठरली असती असं समजण्यात (किंबहुना, विचार करण्यात) मी मूर्खपणा तर केला नव्हता ना' हे पत्र बरंचसं संदिग्ध आहे; फ्रीडानं त्याला जे दिलं होतं ते. त्याला हवं असलेलं ज्ञान याहून अधिक काही नसावं; तो नकार दिल्याचं सूचित करतो तो कायम स्वरूपाचे संबंध

जोडण्याच्या संदर्भातील असावा.

१९५३ च्या जुलैमध्ये बायन्नेरचं 'जर्नी विथ जीनियस' मरेच्या हाती पडलं. त्यात मेक्सिकोमध्ये लॉरेन्स आणि फ्रीडा यांचं वैवाहिक जीवन पार ढासळलं होतं याचे अगणित पुरावे त्याला आढळून आले, तेव्हा फ्रीडाचं आमंत्रण स्वीकारण्याचा धीटपणा आपण दाखवू शकलो नाही याची चुटपूट लागून राहिली. तो सांगतो, लॉरेन्स पतीपत्नीमधील संबंधाची त्याला नीट कल्पना असती तर कदाचित त्यानं ती जोखीम पत्करली असती. एव्हाना मेरी गॅम्बलबरोबर त्याचं लग्न झालेलं होतं, त्यांचं वैवाहिक जीवन सुखासमाधानाचं होतं. 'आणि, माझ्या अंतर्यामी, माझी खात्री आहे, मी आणि तू, तू आणि मी आम्हा दोघांमध्येही असंच घडून आलं असतं, जर का १९२३ मध्ये मला तेवढं धैर्य असतं.'

मरेबरोबरची फ्रीडाची सलगी वाढत होती आणि ग्वादालजारमध्ये फ्रीडाच्या विरहानं लॉरेन्सचा जीव तळमळत होता. त्यानं खेदानं आपल्या सासूला लिहिलं होतं की फ्रीडाच्या ध्यानी येत नाही की पुरुषानं नवरा असायला हवं, त्याचबरोबर थोड्याफार प्रमाणात हिरोही असायला हवं, आणि जर 'माझ्यावर प्रेम करणं फ्रीडाला अवघड जात असेल तर तिनं त्यापासून विश्रांती घ्यावी.' त्यानं ठरवून टाकलेलं होतं की तिच्याकडून कधीही प्रेमाची अपेक्षा करायची नाही, ती गरज त्याला नाही. तिच्याकडून त्याला अपेक्षा आहे ती बळाची; जगाशी दोन हात करण्याचं बळ.

१९२२ च्या ऑगस्टमध्ये लॉरेन्स न्यूयॉर्कला होता तेव्हा मॉली स्किन्नरनं ऑस्ट्रेलियन आदिवासींवरील 'द हाऊस ऑफ एल्लीस' या तिच्या कादंबरीचं हस्तलिखित त्याच्याकडे पाठवून दिलं होतं. त्यानं ते वाचावं आणि त्यावरील सूचना कळवाव्यात अशी तिनं विनंती केली होती. त्यानं ती काळजीपूर्वक वाचली. २ सप्टेंबरच्या पत्रात त्यानं तसं तिला लिहिलं आणि कळवलं, एवढा चांगला "स्टफ" आहे तीत. पण विस्कळीत आहे, एकसंघपणा नाही. मला भीती आहे, आहे त्या स्वरूपात तुला प्रकाशक मिळणार नाही. तरीही ती तशीच वाया जावी हा विचारही मला खपत नाही.

त्याची गुणवत्ता मला एवढी आवडलेली आहे. पण रचनाकौशल्य तुझ्यामध्ये नाही. तुला पसंत असेल तर मी तिच्यावर काम करीन आणि तिची पुनर्रचना करीन, आणि त्यातून पुस्तक तयार करीन. असं केलं तर आपल्या दोघांची नावं येतील किंवा टोपणनाव घेता येईल. मला जर तू मुक्त हस्त दिलास तर त्यातून संपूर्ण पुस्तक कसं तयार करता येईल ते मी पाहीन. तुझ्या कृतीत कुठल्याही प्रकारे ढवळाढवळ करावी असं तुला वाटत नसल्यास, मी दुसऱ्या कुठल्यातरी प्रकाशकाला दाखवीन, पण तो स्वीकारील याबद्दल मी साशंक आहे.'

मॉलीनं आनंदानं तारेनं लॉरेन्सला संमती दर्शवली, लिहिलं की त्याला जे योग्य वाटेल ते करण्यास तो मोकळा आहे. आणि तिच्या कादंबरीच्या पुनर्लेखनाच्या कामी तो लागला.

न्यूयॉर्क – ग्वादालजारमार्गावर त्यानं तिच्यावर काम केलं. ग्वादालजारमधील हॉटेल गार्सियामध्ये बैठक मारून १४ नोव्हेंबरला ती कादंबरी पूर्ण केली. तिला नाव दिलं, 'द बॉय इन द बुश' आणि १५ नोव्हेंबरला हस्तलिखित लंडनमधील त्याचा एजंट कार्टिस ब्राऊन याच्याकडे पाठवून दिलं. मॉलीला नाव आवडलं पण जेव्हा तिनं पाहिलं की तिचं पुस्तक त्यानं बव्हंशी बदलून टाकलं आहे तेव्हा तिला रडू कोसळलं. ३ मार्च १९२४ च्या पत्रात त्यानं तिला लिहिलं. 'शेवटच्या दोन प्रकरणांबाबत तू थोडीफार धुसफूस करशील. पण, एखादा पुरुष खरोखरीच काळजी घेत आहे, आणि दोन स्त्रियांची काळजी घेत होता, तर मग अचानक त्यातील एकीला त्यानं बाजूला का सारावं? दोघींनाही जवळ बाळगण्याच्या इच्छेहूनही त्यातील एकीशी सारे संबंध तोडून टाकणं मला अधिक अनैतिक वाटतं.' याच वर्षी डी. एच. लॉरेन्स आणि एम. एल. स्किन्नेर यांच्या नावानं ती प्रसिद्ध झाली. त्यावर फार अनुकूल अभिप्राय आले आणि या पुस्तकाचं मानधन मॉली स्किन्नेरला मिळेल याची खबरदारी त्याने त्याचं निधन होईपर्यंत घेतली.

फ्रीडा जर्मनीला जाऊन आल्यानंतर मरे, कॉट आदी लॉरेन्सचे मित्र तिच्या खनपटीला बसले, हट्टाला पेटल्यागत तिला म्हणाले की तिनं तार करून लॉरेन्सला इंग्लंडला बोलवावं. त्यांच्या अट्टाहासाला बळी पडून तिनं तशी तार केली. पण ती पाठवल्यानंतर तिला पस्तावल्यासारखं झालं : तिनं पुढं केलेल्या दाव्यानुसार, मेक्सिकोला जाऊन तिनं त्याला मिळायला हवं असं तिला वाटत होतं म्हणून की तो आल्यानं आपल्याला हवं तसं आयुष्य जगणं अशक्य होणार याची चिंता तिला वाटली म्हणून? उत्तर देणं तेवढं सोपं नाही. लॉरेन्सच्या थंडपणानं तिच्या रागाचा पारा चढवला होता. १९२३ च्या डिसेंबरमध्ये तिन कॉटला लिहिलं : 'मला भेटायला त्याला आवडेल असं का नाही म्हणत तो? नेहमीचीच दु:खं आणि यातना ! *बेजार* होते मी !'

वैवाहिक जीवनाच्या बखेड्यामधील स्वत:ची बाजू तिनं कॉटसमोर परखडपणे मांडली, 'तू म्हणतोस लॉरेन्सनं माझ्यावर प्रेम केलं आहे, पण त्याहूनही कितीतरी पटीनं मी त्याच्यावर प्रेम केलं आहे.' लॉरेन्स ही अधिक महत्त्वाची व्यक्ती आहे हे त्याच्या विषयीचं जगाचं मत मान्य करायला तिचं मन राजी होतं, पण त्याच्या आयुष्यातील आपलं महत्त्वपूर्ण योगदान जगानं अमान्य करावं हे तिला खटकत होतं.

तिथं लॉरेन्सनं शरणागती पत्करली. तिच्यावर तो एवढा अवलंबून होता की तिच्या सान्निध्यावाचून दिवस काढणं त्याला अशक्य होतं. ८ नोव्हेंबर १९२३ च्या मेबलच्या पत्रात त्यानं कळवलं की इंग्लंडला परत जाण्याचं त्यानं ठरवलेलं आहे, 'या प्रदीर्घ झगड्यात मी पुन्हा एकवार पड खाईन.' त्यानं बोटीचं तिकीट काढलं, गोट्श्चेचंही डेन्मार्कचं तिकीट काढून दिलं, फ्रीडाला आपण येत असल्याचं कळवलं. त्याचं पत्र हाती पडताच फ्रीडानं मार्क गेर्टलेरच्या स्टुडियोत धाव घेतली, हर्षानं त्याला ओरडून म्हणाली. "तयार हो – लॉरेन्झो येत आहे !"



अनुक्रमणिका

२२ नोव्हेंबरला लॉरेन्स एस. एस. टोलेडो बोटीवर चढला. वाटेत हॅवानाला दोन दिवसांचा मुक्काम करून बोट प्लायमाऊथला पोचली. तिथून लॉरेन्सनं लंडनची ट्रेन पकडली. डिसेंबरच्या सुरुवातीला तो वॉटर्लू स्टेशनवर उतरला. त्याला भेटायला फ्रीडा, मरे आणि कॉट स्टेशनवर गेले. मरे सांगतो की लॉरेन्स ट्रेनमधून उतरल्यावर त्याच्या चेहऱ्यावरील 'हिरवट फिकटपणा' त्याला जाणवला. पण तो समजत होता तसं ते आजारपणाचं लक्षण नव्हतं. मरे असंही सांगतो की लंडनचं दर्शन त्याला सुखावह वाटलं नव्हतं. लॉरेन्सनं खेदानं उद्गार काढले, "माझ्या नजरेसमोर नकोसं वाटतं हे." वस्तुतः, फ्रीडा आणि मरे यांच्यामध्ये निर्माण झालेलं नवं नातं त्याच्या नजरेनं हेरलं होतं. लॉरेन्स हॅम्पस्टेड येथील कॅथरीन कार्सवेलच्या भावाच्या घरी राहायला गेला. फ्रीडा तिथं राहात होती. कॅथरीननं नमूद केलं आहे फ्रीडा आणि मरे यांच्यामधली जवळीक लॉरेन्सला खुपली होती. अशा प्रकरणात फ्रीडा कोणत्या थराला जाऊ शकते याची पुरेपूर कल्पना लॉरेन्सला असल्यामुळं त्या दोघांमधल्या जिव्हाळ्याचं स्वरूप त्याच्या ध्यानी न येतं तरच नवल !

मरेच्या भेटीच्या वेळी त्याच्या मनावर ताण किती पडत असणार याची कल्पना त्याच्या 'द बॉर्डरलाईन' कथेवरून येते. १९२४ मध्ये त्यानं ही कथा लिहिली. आन्स्थ्रुथेर हा पिंगट केसाचा लष्करी अधिकारी या कथेचा नायक, लॉरेन्सचं प्रतिनिधित्व करणारी त्याची बायको, जर्मन बॅरनची मुलगी. ॲन्स्थ्रुथेरच्या निधनानंतर ती एका पत्रकाराशी लग्न करते. या पत्रकारात मरेची अतिशय वाईट स्वभाव वैशिष्ट्ये ठळकपणे दिसून येतात. सूड उगवण्यासाठी आणि त्याच्या प्रतिस्पर्ध्याकडून त्याच्या विधवेला जेवढं लैंगिक सुख मिळत नसेल त्याहून अधिक सुख देण्यासाठी नायक भूत होऊन परततो.

भेटवस्तूंची पार्सलं उघडूनही झाली नसतील – लॉरेन्सवर औदासिन्याची अवकळा पसरली. ७ डिसेंबरला त्यानं बायन्रेरला लिहिलं, 'बिच्चारा डी. एच. एल. पुरेपूर दुःखी, जणू काही तो त्याच्या थडग्यात आहे.' लॉरेन्सवरील आपल्या प्रेमाखातर फ्रीडाला दूर करून 'मोठा त्याग' आपण केला अशी बढाई मरेनं पुढं मारली असली तरी त्यानं फ्रीडावर टाकलेल्या मोहिनीच्या खुणा लॉरेन्सच्या नजरेला पडत होत्या. मरेबद्दल चीड येण्याला आणखीनही एक कारण होतं. लॉरेन्सच्या लिखाणाला भरपूर वाव मिळावा म्हणूनच 'अडेल्फी'च्या संपादकाची धुरा आपण सांभाळत आहोत, त्याचा 'लेफ्टनंट' म्हणूनच आपण वागत आहोत असं मरे ऐकवत असला तरी प्रत्यक्षात लॉरेन्सच्या लिखाणाला तो फारशी प्रसिद्धी देत नव्हता. 'ऑन कमिंग होम' हा त्याचा लेखही मरेनं साभार परत केला होता.

लॉरेन्सच्या लिखाणाचं आपल्याला किती कौतुक आहे असं त्यानं तोंड भरून फ्रीडाला सांगितलं होतं तरी आजवरची लॉरेन्सच्या पुस्तकावरील त्याची परीक्षणं चीड आणणारी होती. 'द लॉस्ट गर्ल'वरील त्याच्या परीक्षणाचं शीर्षक होतं : 'द डिके ऑफ मि. लॉरेन्स' (१९२०). 'वुमेन इन लव्ह' ची संभावना त्यानं 'मानवाला न साजेशी आणि पशूतुल्य' अशा शब्दात केली होती.

लॉरेन्सच्या वर्तुळात एव्हाना डोरोथी ब्रेट्टचं स्वागत होऊ लागलं होतं. ख्रिसमसला तिनं हॅंपस्टेड येथील तिच्या छोट्या घरात लॉरेन्स,फ्रीडा, मरे, कॉट आणि गेर्टलेर यांना भोजन दिलं. लॉरेन्स पतिपत्नी मधूनमधून तिच्या घरी जाऊ येऊ लागले. १९२४ च्या जानेवारीत असांच एक दिवस लॉरेन्स आणि फ्रीडा तिच्या खोलीत बसले होते. नित्याप्रमाणं संभाषणाची सूत्र लॉरेन्सच्या हाती होती. आपण बोलायचं आणि बाकीच्यांनी ऐकून घ्यायचं हे लॉरेन्सला प्रिय. आताही तो स्वत:च बोलत होता. आपल्याला केवळ श्रोत्याची भूमिका करावी लागत आहे हे पाहून फ्रीडा कातावली. तिनं आवाज उठवला. त्याच्यावर सरळ आरोप केला की, स्वत:ला देवपदी चढवण्याची त्याची इच्छा आहे. लॉरेन्स बिथरला. विस्तव सारखा करण्यासाठी वापरली जाणारी लोखंडी सळी त्यानं उचलली आणि काही कपबश्यांचा चक्काचूर करून त्यानं धमकावलं,"फ्रीडा, लक्षात ठेव,पुन्हा तू माझ्यासमोर अशी बोललीस तर चहाची भांडी नाही, तुझं टाळकं फोडेन मी." नंतर कसंबसं हसला आणि ब्रेट्टचा हात हाती घेऊन म्हणाला, "फ्रीडानं माझं डोकं असं फिरवायला नको होतं."

जानेवारीच्या शेवटच्या आठवड्यात लॉरेन्स आणि फ्रीडा पॅरिसला रवाना झाले. ५ फेब्रुवारीला त्यानं पॅरीस सोडलं आणि ते बादेन – बादेनला पोचले. पंधरा दिवसांच्या मुक्कामानंतर त्यांनी इंग्लंडची वाट धरली. इंग्लंडला पोहोचल्यावर त्यानं २९ फेब्रुवारीला फ्रेडरिक कार्टर या चित्रकार मित्राला लिहिलं की,पुढच्या बुधवारी तो न्यूयॉर्कला जायला निघणार आहे. मला युरोपचा आत्यंतिक उबग आला आहे. लॉरेन्स प्रमाणेच फ्रीडाच्याही मनातून युरोप पार उतरलं होतं. लंडनबद्दलचं आकर्षणही पुरतं ओसरलं होतं.

आपली मुलं आपल्याला दुरावली आहेत हे तिला समजून चुकलं होतं. मरेबद्दल ओढ वाटेनाशी झाली होती. लॉरेन्स आपल्याकडे परत येण्याइतपतं ताकद आपल्यात आहे हे तिला एव्हाना कळलेलं होतं. तिच्यावाचून तो जगू शकणार नाही हेही ती जाणून होती. ती बेचैन झाली होती. या बेचैनीमधून सुटका करून घेण्याचा एकच मार्ग तिला दिसत होता. लॉरेन्सबरोबर ताओसला जाणं. १०फेब्रुवारीला तिनं बादेन – बादेनमधून मेबलला लिहून कळवलही होतं. एप्रिल अखेरपर्यंत ताओसला येण्याची माझी इच्छा आहे. मी तिथला वसंत ऋतू पाहिलेला नाही. आणि मला तो बघायचा आहे. आणि मला कळत नाही, एकमेकांचं हित जपणारे आपण, आपण एकमेकांच्या शेजारी का राहू नये?

ताओसला जाण्याचा निर्णय पक्का झाला मात्र, लॉरेन्सच्या अंगात उत्साह संचारला. त्या खुशीत 'कॅफे रॉयल'मध्ये त्यानं भोजन समारंभ आयोजित केला. एक सुशोभित खोली त्यानं भाड्यानं घेतली. मरे, कॉट, कार्सवेल पतिपत्नी, मेरी कान्नान, मार्क गेर्टलेर यांना आमंत्रणं गेली. सर्वजण जमले. लॉरेन्सना 'टोस्ट' देऊन झाल्यानंतर लॉरेन्सनं 'पोर्ट' मागवली. हे पेय त्याच्या प्रकृतीला मानवणारं नव्हतं. त्यानं ते मागवलं. प्रत्येकाचं ग्लास भरल्यानंतर त्यानं एकेकाला विचारलं, 'मेक्सिकोला त्याच्याबरोबर यायची तयारी आहे का?'

तिथं 'राजानिम' ची स्थापना करण्याचा त्याचा इरादा आहे. फ्रीडा दूरवरून पाहात

होती, तुच्छतेनं. गेर्टलेरनं गुळमुळीत उत्तर दिलं. कॉट आणि डोनल्ड कार्सवेल यांनी येण्याचं आश्वासन दिलं. मेरीनं कोरडा नकार दिला. डोरोथी ब्रेट्टनं तयारी दर्शवली. मरेनंही होकार दिला. कॅथरीन कार्सवेलपाशी पैसे नव्हते. शिवाय प्रापंचिक जबाबदाऱ्यांमधून मोकळीक घेणं तिला शक्य नव्हतं. तिनं तसं स्पष्ट सांगितलं. सर्वांना चढलेली होती. कॉट तर पेल्यांचा चक्काचूर करीत ओरडला, "इथं असलेल्या वा नसलेल्या कुठल्याही स्त्रीला लॉरेन्सची थोरवी कळणं केवळ अशक्यच आहे."

या प्रसिद्ध 'लास्ट सपर'च्या घटनास्थळी उपस्थित असलेल्या बऱ्याच जणांनी त्याविषयी लिहिलेलं आहे. पण त्यावेळी उच्चारल्या गेलेल्या महत्त्वाच्या उद्‌गाराबाबत मरे आणि कॅथरीन यांच्यात एकवाक्यता नाही. मरे दावा करतो की तो म्हणाला होता – 'माझं तुझ्यावर प्रेम आहे लॉरेन्झो. पण मी तुला दगा देणार नाही असं वचन मला देता येणार नाही.' तर कॅथरीन त्याचे उद्‌गार नमूद करते ते असे – 'मी तुला दगा दिला आहे. दोस्ता मी कबुली देतो त्याची. . . गतकाळात मी तुझ्याशी दगाबाजी केली आहे. पुन्हा नाही करणार तशी. बघशीलच तू. पुन्हा कधीही नाही.'

मरेच्या मनात असलेला विश्वासघात फ्रीडाशी संबंधित होता की लेखक म्हणून लॉरेन्सची बाजू पुरेशा नेटानं घेतलेली नाही याची खंत त्याला वाटत होती, तिच्याशी निगडित होता याविषयी ठाम निष्कर्ष काढणं अवघड आहे. पण एवढं बाकी खरं की, त्याच्या उद्‌गारानंतर लागलीच लॉरेन्सचा तोल जाऊन तो पडला. त्याचं डोकं टेबलावर आपटलं. त्यानं ओकारी केली. आणि त्याची शुद्ध हरपली. मरे आणि कॉटनं टॅक्सीत घालून त्याला घरी पोचवलं. त्याला उचलून त्यांनी त्याच्या खोलीवर नेलं. त्याच्या खडबडाटानं कॅथरीनच्या भावाला जाग आली. त्यानं खाली जिन्याकडे पाहिलं.

सेंट जॉन आणि सेंट पीटर (किंवा सेंट थॉमसही असेल) त्याच्या स्वामींचा गलितगात्र देह उचलून नेत असलेले त्यानं लख्खपणे पाहिलं. दुसऱ्या दिवशी लॉरेन्स उठला तोवर त्याची विनोदबुद्धी जागी झाली होती. तो कॅथरीनला म्हणाला की, मूर्खासारखा वागला तो. आपल्या सर्वांचं केव्हा ना केव्हातरी पतन व्हायलाच हवं. त्यानं हानी होणार नाही जोवर आपण ते प्रथम मान्य करतो आणि नंतर विसरून जातो.

येशू आणि त्याचा विश्वासघात करणारा यहूदा ईस्कर्योत यांच्यामधील संबंधाबाबत मरेनं काही ग्रह करून घेतले होते. त्यावरून लॉरेन्स त्याला वारंवार सुनावत असे की चिखल असल्यागत त्यानं हे खूळ त्याच्या मनातून स्वच्छ पुसून टाकावं. येशूशी आपली तुलना केलेली लॉरेन्सला खपत नसे. येशूला ज्यानं जाणलं होतं असा एकमेव शिष्य आणि एक भग्न हृदयी प्रियकर हे यहुदाचं रूप स्वत:मध्ये पाहाणारी मरेची वृत्ती त्याला रोगट वाटत असे.

मरेला राजानिम मध्ये स्वारस्य नव्हतं. त्यानं म्हटलं आहे, 'मी त्याच्याबरोबर गेलो असतो ते त्याच्याविषयी वाटणाऱ्या व्यक्तिगत प्रेमापोटी. आणि मी त्याला तसं सांगितलंही

होतं. त्याचा अट्टाहास नाही. त्यात व्यक्तिगत असं काही असता कामा नये. उद्देश व्यक्तीनिरपेक्ष असायला हवा.' मरेला जाणवत असे की लॉरेन्सचं व्यक्तिमत्त्व दुभंगलेलं आहे. एकदा तो लॉरेन्सला म्हणाला, "तू खरोखरी जसा आहेस हे तू नेहमीच अमान्य करतोस" त्यावर लॉरेन्स उदगारला, "आय ॲम सॉरी .... आय ॲम सॉरी."

५ मार्च १९२४ रोजी लॉरेन्सांनी इंग्लंडचा किनारा सोडला तेव्हा डोरोथी ब्रेट्ट ही एकमेव सदस्या त्यांच्याबरोबर बोटीवर होती.

गारांच्या तुफानी वादळात लॉरेन्स, फ्रीडा, ब्रेट्ट न्यूयॉर्कला उतरले. हवामान प्रसन्न असलं तरी हे शहर लॉरेन्सच्या पसंतीला उतरलं नसतं. रात्री 'वाल्डोर्फ ॲस्टोरिआ'मध्ये त्यांनी थॉमस सेल्तझर बरोबर भोजन घेतलं. सेल्तझरचा प्रकाशन व्यवसाय उतरणीला लागला होता. ही चिंतेची बाब होती. लॉरेन्सांनी ब्रेट्टसह वर्तमान ट्रेन पकडली आणि ते सांताफेला पोचले. तिथून टपालाच्या गाडीमधून बर्फाच्छादित रॉकी माउंटन्स पार केले. आणि ११ मार्चला ताओसला आले. सुरुवातीचे काही दिवस ते मेबलच्या रांचवर राहिले. तिथं लॉरेन्सांना एक गेस्ट हाऊस देण्यात आलं. ब्रेट्टची व्यवस्था एका स्टुडिओत करण्यात आली. ते तिघंही मेबलच्या मुख्य घरात जेवणखाण करीत. एक दिवस संभाषणाच्या ओघात आपल्या मालकीचं १५ एकराचं एक रांच लॉरेन्सला भेट देण्याची इच्छा मेबलनं प्रदर्शित केली. ही भेट स्वीकारण्यास लॉरेन्स का कू करीत असलेला पाहून फ्रीडा पुढे सरसावली आणि तिनं मेबलच्या भेटीचा स्वीकार केला.

या मोबदल्यात 'सन्स अँड लव्हर्स'चं हस्तलिखित तिनं मेबलला भेट दिलं. हा सौदा मेबलच्या फायद्याचा होता. फ्रीडाला देण्यात आलेल्या रांचकडे आजवर दुर्लक्षच झालेलं होतं. हजारभर डॉलरलाही ते विकत घ्यायला कुणी तयार झालं नसतं. उलट लॉरेन्सची वाढती लोकप्रियता लक्षात घेता हस्तलिखित तीनचार हजारांचं होतं. (पुढं ए. ए. ब्रिल या आपल्या मनोचिकित्सकाचं बिल देण्यासाठी मेबलनं या हस्तलिखिताचा वापर केला.)

मेच्या प्रारंभी लॉरेन्स, फ्रीडा, ब्रेट्ट फ्लाइंग हार्ट रांचवर राहायला गेले. लॉरेन्सनं या रांचचं नाव बदललं. नवीन नाव ठेवलं लोबो (किंवा लांडगा) हे नावही पुढे रद्दबातल करून काचओवा असं त्याचं नामकरण करण्यात आलं. ३ जूनला त्यानं फ्रेडरिक कार्टरला लिहिलं – 'डेले मॉंटे रांचपासून जवळजवळ दोन मैलावर आम्ही आहोत. इथं आमचं टपाल मिळतं. जागा एका बाजूला आहे. सुरेख निसर्गदृश्य, समुद्र सपाटीपासून ८,५०० फूट उंचीवर. आमच्यापाशी लहानशी दोन लाकडाची घरं आहेत.

आणि एक छोटीशी केबिन. महिनाभर आम्ही निग्रोंगत राबत आहोत. एक घर पडलेलं होतं ते उभं करीत होतो. दुसऱ्याची साकारणी चालू होती. चार इंडियन आणि एक मेक्सिकन सुतार आम्ही या कामावर लावलेले होते. इंडियन आज ताओसला गेले. ताओस इथून १७ मैलावर आणि आम्ही एकटे उरलो आहोत. आणि एक मैत्रीण डोरोथी ब्रेट्ट, ती पेंटिंग करते आणि व्हायकाऊंट इशरची ती मुलगी आहे. आमच्यापाशी पाच घोडे आहेत. दूध आणि

होती, तुच्छतेनं. गेर्टलेरनं गुळमुळीत उत्तर दिलं. कॉट आणि डोनल्ड कार्सवेल यांनी येण्याचं आश्वासन दिलं. मेरीनं कोरडा नकार दिला. डोरोथी ब्रेट्टनं तयारी दर्शवली. मरेनंही होकार दिला. कॅथरीन कार्सवेलपाशी पैसे नव्हते. शिवाय प्रापंचिक जबाबदाऱ्यांमधून मोकळीक घेणं तिला शक्य नव्हतं. तिनं तसं स्पष्ट सांगितलं. सर्वांना चढलेली होती. कॉट तर पेल्यांचा चक्काचूर करीत ओरडला, "इथं असलेल्या वा नसलेल्या कुठल्याही स्त्रीला लॉरेन्सची थोरवी कळणं केवळ अशक्यच आहे."

या प्रसिद्ध 'लास्ट सपर'च्या घटनास्थळी उपस्थित असलेल्या बऱ्याच जणांनी त्याविषयी लिहिलेलं आहे. पण त्यावेळी उच्चारल्या गेलेल्या महत्त्वाच्या उद्‍गाराबाबत मरे आणि कॅथरीन यांच्यात एकवाक्यता नाही. मरे दावा करतो की तो म्हणाला होता – 'माझं तुझ्यावर प्रेम आहे लॉरेन्झो. पण मी तुला दगा देणार नाही असं वचन मला देता येणार नाही.' तर कॅथरीन त्याचे उद्‍गार नमूद करते ते असे – 'मी तुला दगा दिला आहे. दोस्ता मी कबुली देतो त्याची. . . गतकाळात मी तुझ्याशी दगाबाजी केली आहे. पुन्हा नाही करणार तशी. बघशीलच तू. पुन्हा कधीही नाही.'

मरेच्या मनात असलेला विश्वासघात फ्रीडाशी संबंधित होता की लेखक म्हणून लॉरेन्सची बाजू पुरेशा नेटानं घेतलेली नाही याची खंत त्याला वाटत होती, तिच्याशी निगडित होता याविषयी ठाम निष्कर्ष काढणं अवघड आहे. पण एवढं बाकी खरं की, त्याच्या उद्‍गारानंतर लागलीच लॉरेन्सचा तोल जाऊन तो पडला. त्याचं डोकं टेबलावर आपटलं. त्यानं ओकारी केली. आणि त्याची शुद्ध हरपली. मरे आणि कॉटनं टॅक्सीत घालून त्याला घरी पोचवलं. त्याला उचलून त्यांनी त्याच्या खोलीवर नेलं. त्याच्या खडबडाटानं कॅथरीनच्या भावाला जाग आली. त्यानं खाली जिन्याकडे पाहिलं.

सेंट जॉन आणि सेंट पीटर (किंवा सेंट थॉमसही असेल) त्याच्या स्वामीचा गलितगात्र देह उचलून नेत असलेले त्यानं लख्खपणे पाहिलं. दुसऱ्या दिवशी लॉरेन्स उठला तोवर त्याची विनोदबुद्धी जागी झाली होती. तो कॅथरीनला म्हणाला की, मूर्खासारखा वागला तो. आपल्या सर्वांचं केव्हा ना केव्हातरी पतन व्हायलाच हवं. त्यानं हानी होणार नाही जोवर आपण ते प्रथम मान्य करतो आणि नंतर विसरून जातो.

येशू आणि त्याचा विश्वासघात करणारा यहूदा ईस्कर्योत यांच्यामधील संबंधाबाबत मरेनं काही ग्रह करून घेतले होते. त्यावरून लॉरेन्स त्याला वारंवार सुनावत असे की चिखल असल्यागत त्यानं हे खूळ त्याच्या मनातून स्वच्छ पुसून टाकावं. येशूशी आपली तुलना केलेली लॉरेन्सला खपत नसे. येशूला ज्यानं जाणलं होतं असा एकमेव शिष्य आणि एक भग्न हृदयी प्रियकर हे यहुदाचं रूप स्वत:मध्ये पाहाणारी मरेची वृत्ती त्याला रोगट वाटत असे.

मरेला राजानिम मध्ये स्वारस्य नव्हतं. त्यानं म्हटलं आहे, 'मी त्याच्यावरोबर गेलो असतो ते त्याच्याविषयी वाटणाऱ्या व्यक्तिगत प्रेमापोटी. आणि मी त्याला तसं सांगितलंही





अनुक्रमणिका

होतं. त्याचा अट्टाहास नाही. त्यात व्यक्तिगत असं काही असता कामा नये. उद्देश व्यक्तीनिरपेक्ष असायला हवा.' मरेला जाणवत असे की लॉरेन्सचं व्यक्तिमत्त्व दुभंगलेलं आहे. एकदा तो लॉरेन्सला म्हणाला, "तू खरोखरी जसा आहेस हे तू नेहमीच अमान्य करतोस" त्यावर लॉरेन्स उदगारला, "आय ॲम सॉरी .... आय ॲम सॉरी."

५ मार्च १९२४ रोजी लॉरेन्सांनी इंग्लंडचा किनारा सोडला तेव्हा डोरोथी ब्रेट्ट ही एकमेव सदस्या त्यांच्याबरोबर बोटीवर होती.

गारांच्या तुफानी वादळात लॉरेन्स, फ्रीडा, ब्रेट्ट न्यूयॉर्कला उतरले. हवामान प्रसन्न असलं तरी हे शहर लॉरेन्सच्या पसंतीला उतरलं नसतं. रात्री 'वाल्डोर्फ ॲस्टोरिआ'मध्ये त्यांनी थॉमस सेल्तझर बरोबर भोजन घेतलं. सेल्तझरचा प्रकाशन व्यवसाय उतरणीला लागला होता. ही चिंतेची बाब होती. लॉरेन्सांनी ब्रेट्टसह वर्तमान ट्रेन पकडली आणि ते सांताफेला पोचले. तिथून टपालाच्या गाडीमधून बर्फाच्छादित रॉकी माउंटन्स पार केले. आणि ११ मार्चला ताओसला आले. सुरुवातीचे काही दिवस ते मेबलच्या रांचवर राहिले. तिथं लॉरेन्सांना एक गेस्ट हाऊस देण्यात आलं. ब्रेट्टची व्यवस्था एका स्टुडिओत करण्यात आली. ते तिघंही मेबलच्या मुख्य घरात जेवणखाण करीत. एक दिवस संभाषणाच्या ओघात आपल्या मालकीचं १५ एकराचं एक रांच लॉरेन्सला भेट देण्याची इच्छा मेबलनं प्रदर्शित केली. ही भेट स्वीकारण्यास लॉरेन्स का कू करीत असलेला पाहून फ्रीडा पुढे सरसावली आणि तिनं मेबलच्या भेटीचा स्वीकार केला.

या मोबदल्यात 'सन्स ॲंड लव्हर्स'चं हस्तलिखित तिनं मेबलला भेट दिलं. हा सौदा मेबलच्या फायद्याचा होता. फ्रीडाला देण्यात आलेल्या रांचकडे आजवर दुर्लक्षच झालेलं होतं. हजारभर डॉलरलाही ते विकत घ्यायला कुणी तयार झालं नसतं. उलट लॉरेन्सची वाढती लोकप्रियता लक्षात घेता हस्तलिखित तीनचार हजारांचं होतं. (पुढं ए. ए. ब्रिल या आपल्या मनोचिकित्सकाचं बिल देण्यासाठी मेबलनं या हस्तलिखिताचा वापर केला.)

मेच्या प्रारंभी लॉरेन्स, फ्रीडा, ब्रेट्ट फ्लाइंग हार्ट रांचवर राहायला गेले. लॉरेन्सनं या रांचचं नाव बदललं. नवीन नाव ठेवलं लोबो (किंवा लांडगा) हे नावही पुढे रद्दबातल करून काचओवा असं त्याचं नामकरण करण्यात आलं. ३ जूनला त्यानं फ्रेडरिक कार्टरला लिहिलं – 'डेले मॉंटे रांचपासून जवळजवळ दोन मैलावर आम्ही आहोत. इथं आमचं टपाल मिळतं. जागा एका बाजूला आहे. सुरेख निसर्गदृश्य, समुद्र सपाटीपासून ८,५०० फूट उंचीवर. आमच्यापाशी लहानशी दोन लाकडाची घरं आहेत.

आणि एक छोटीशी केबिन. महिनाभर आम्ही निग्रोंगत राबत आहोत. एक घर पडलेलं होतं ते उभं करीत होतो. दुसऱ्याची साकारणी चालू होती. चार इंडियन आणि एक मेक्सिकन सुतार आम्ही या कामावर लावलेले होते. इंडियन आज ताओसला गेले. ताओस इथून १७ मैलावर आणि आम्ही एकटे उरलो आहोत. आणि एक मैत्रीण डोरोथी ब्रेट्ट, ती पेंटिंग करते आणि व्हायकाऊंट इशरची ती मुलगी आहे. आमच्यापाशी पाच घोडे आहेत. दूध आणि

लोणी आणायला आम्ही घोड्यावरून डेल माँटेला जातो. नुकतीच तीन घोड्यांबरोबर माझी झटापट झाली. अंगात सैतानाचं वारं संचारल्यागत ते उधळले होते. . . . सगळं काही व्यवस्थित आहे. फक्त एक मेख आहे, वहाळावरून पाणी आणावं लागतं. . . .''

एवढ्या उंच जागेवरील खडकाळ भागात राहणं तसं खडतर होतं. पण या जिण्यावर लॉरेन्स खूष होता. हा विजनवास त्याला मनापासून आवडला होता. ब्रेट्टला घोड्यावरून रपेट करायला तो शिकवू लागला होता. नावाहो इंडियनाचे विधी, उत्सव यात तो रस घेऊ लागला होता. त्यानं गाय खरीदली होती, कोंबड्या पाळल्या होत्या. गाईचं दूध तो स्वत: काढत असे आणि छोट्या काचेच्या बरणीत ताक घुसळून लोणी काढत असे, स्वत:चा पाव बनवू लागला होता. फ्रीडाचाही रांचवर जीव जडला होता. वीकलींच्या घरातून पळून गेल्यानंतर आता पहिल्यांदाच तिचं स्वत:चं असं सुरक्षित घर तिला लाभलं होतं.

त्रिनिदाद आणि त्याची बायको रुफिना हे प्रामाणिक इंडियन तरुण जोडपं त्यांच्या चाकरीत होतं. फक्त ब्रेट्टची उपस्थिती तिला सलू लागली होती. ब्रेट्ट अगदी निरपेक्षपणे लॉरेन्सवर माया करीत होती आणि लॉरेन्सला एवढं महत्त्व दिलेलं फ्रीडाला खपणं शक्य नव्हतं. एक दिवस फ्रीडा ब्रेट्टला म्हणाली की लॉरेन्स जे काही म्हणेल त्याच्या नेमका उलटा पवित्रा ब्रेट्टनं घ्यायचा, ब्रेट्ट तशी वागली तर तिला अर्धा क्राऊन बक्षीस देण्यात येईल. फ्रीडाची ही 'ऑफर', अर्थातच, स्वीकारली गेली नव्हती.

ब्रेट्टनं, खरं तर, नव्या जागेत लॉरेन्साचं बस्तान बसवण्याच्या कामी मदत केली होती, घराची डागडुजी करायला हातभार लावला होता, वेळप्रसंगी दगड उचलून वाहिले होत आता ती उत्साहानं घरकामात भाग घेत होती, फ्रीडाच्या शेगडीसाठी लाकडं फोडत होती, व्हाळावरून पाणी भरून आणत होती. आणि एवढं करूनही तिच्या खानदानीपणावरून लॉरेन्सची खवचट बोलणी निमूट ऐकून घेत होती. आणि फ्रीडा इकडेतिकडे फिरत सिगारेटी फुंकत होती.

'लॉरेन्स अँड ब्रेट्ट' (१९५३) या पुस्तकात फ्रीडा आणि लॉरेन्स यांच्या नित्याच्या भांडणांचं, आदळाआपटीचं ब्रेट्टने चविष्टपणे वर्णन केलं आहे. अशा प्रसंगी क्रुद्ध लॉरेन्सचा तारस्वरातील कर्कश आवाज आणि उर्मट फ्रीडाचा थयथयाट ऐकण्या पाहाण्यात तिला गोडी वाटत होती. एक दिवस लॉरेन्सच्या देखत फ्रीडा तिला म्हणाली की, लॉरेन्स तिच्याहून बराच दणकट आहे, तो तसा वाटत नाही : 'काही वेळेला मला वाटतं तो मॅड आहे, त्याच्यावर रागाचा अंमल चढतो तेव्हा मला त्याची भीती वाटते.' ब्रेट्ट सांगते की त्यांचे बरेचसे भांडणतंटे हे मुख्यत्वे पुरुषी वर्चस्वावरून होत असत. लॉरेन्सला अजूनही मेबलचं आकर्षण वाटतं याचं वैषम्य फ्रीडाला वाटत असे आणि त्यावरून ती त्याला घालूनपाडून बोलत असल्याचं ब्रेट्टनं ऐकलं आहे.

लॉरेन्सच्या सहवासात ब्रेट्ट अतिशय खूष होती. ती आणि लॉरेन्स घोड्यावरून रपेट करीत, बहुधा मुक्यामुक्यानं. कारण अजूनही ती लाजरीबुजरी होती आणि तिच्या बहिरेपणाचं

भान लॉरेन्सला होतं. ती दोघंही बराच काळ एकत्र घालवत, एवढा की फ्रीडा त्यावरून लॉरेन्सवर खेकसत असताना तिच्या कानावर पडलं होतं. तिच्याशी बोलण्यात लॉरेन्सला, अर्थातच अजिबात स्वारस्य नव्हतं. त्याचं लिखाण हौसेनं ती टाईप करीत होती. 'द वूमन हू रोड अवे' या कथेपासून त्याचं लिखाण तिनं टाईप केलेलं होतं. तरीदेखील मेबलपेक्षा ती धोकादायक प्रतिस्पर्धी आहे अशा नजरेनं फ्रीडा तिच्याकडे पाहू लागली होती. आणि मेबललाही तिची रांचवरील उपस्थिती सलू लागली होती.

तिच्यामुळं लॉरेन्सला एकटा गाठून त्याच्याशी एकांतात बोलणं मेबलला अशक्य झालं होतं. संधी साधून वा काढून ती ब्रेट्टचा बहिरेपणा, कानाला लावायचं तिचं यंत्र यावरून तिची टर उडवण्यासही मागंपुढं पाहात नव्हती. एक दिवस मेबलचे केस कापताना ब्रेट्टची कात्री मेबलच्या कानाला लागली. ब्रेट्ट सांगते, मेबलनं अकस्मात तिचं डोकं हलवल्यामुळं कात्रीनं चुकून चावा घेतला होता. तर मेबल म्हणते, कान कातरला गेल्यावर उत्कंठित झाल्यागत ब्रेट्टला धाप लागली होती. तिनं मुद्दामहून आपल्या कानाचा तुकडा कापला होता. पुढं असंही सांगते की तिच्या परपीडक वृत्तीची आपल्याला एवढी गंमत वाटली की रागवायचंही भान आपल्याला राहिलं नाही.

लॉरेन्सचा आपल्यालाच सहवास लाभावा म्हणून फ्रीडा, मेबल आणि ब्रेट्ट एकमेकांवर धुसफुसत होत्या आणि त्या बायांकडे दुर्लक्ष करून लॉरेन्स 'सेंट मॉवर' लिहीत होता, क्वचित प्रसंगी संध्याकाळी दिवसभरात लिहिलेला मजकूर फ्रीडा आणि ब्रेट्ट यांना मोठ्यानं वाचून दाखवत होता.

कायओवा रांचवर मेबल आणि टोनी यांच्यासाठी एक केबिन खास राखून ठेवण्यात आली होती. तिथं ती दोघं फक्त एकदाच जाऊन राहिली होती. १९२४ च्या ग्रीष्मात एकट्या लॉरेन्सशीच बोलायची इच्छा असल्याचं सांगून मेबलनं त्याला आपल्या केबिनमध्ये बोलावून घेतलं होतं. स्फुंदत स्फुंदत तिनं त्याला विचारलं, तो तिच्याशी 'तसा' का वागतो? आपल्या मालकीच्या जागेवर टोनीनं साळिंदर गोळी घालून ठार मारलं होतं आणि ही गोष्ट लॉरेन्सला खपली नव्हती.

त्यानं टोनीला फैलावर घेतलं होतं. लॉरेन्सनं केलेली टोनीची कानउघाडणी स्वत:चा अपमान झाल्यागत तिला खुपली होती. म्हणून रडत ती त्याचा जाब विचारत होती. त्यावर लॉरेन्स उत्तरला होता, "काय आहे, ज्या एका विशिष्ट तऱ्हेनं तू चालतेस ना ते बघणंच मला असह्य होतं. आज सकाळी माझ्या खिडकीवरून तू जात असताना......." झालं, तिचा आक्रोश अधिकच वाढला होता. तिनं तिथून काढता पाय घेतला होता.

ताओसमध्ये मेबलचे काही तथाकथित कलाप्रेमी बगलबच्चे आश्रित होते. त्यातील एक होता क्लॅरेन्स थॉम्पसन. वय वर्षं बावीस. तो विद्यापीठाचा पदवीधर होता. दोन वर्षं त्यानं हार्वर्डला घालवलेली होती. त्याच्या नावावर काही लिखाणही जमा झालेलं होतं. तो उंचापुरा होता. उत्तम अंगकांती, उर्मट, समलिंगी संभोगाचं त्याला आकर्षण. लॉरेन्सवर तो फिदा झाला



अनुक्रमणिका

होता. मेबलच्या म्हणण्यानुसार, लॉरेन्स आणि क्लॅरेन्स यांनी एक बेत आखला होता, दोघांनी मिळून घोड्यावरून वाळवंटात रपेट करीत फिरायचं. तिनं ही गोष्ट जीव खालीवर करीत फ्रीडाच्या कानावर घातली तेव्हा फ्रीडा फक्त हसली होती. तिला खात्री होती, तसंच काही त्यांच्याकडून घडलंच तर आठवड्याच्या आत लॉरेन्स मान खाली घालून परत येईल. तिनं तसं मेबलला सांगितलंही.

१९२४ च्या मेमध्ये मेबलनं आपल्या मोठ्या स्टुडिओमध्ये नृत्याचा बेत आखला होता. असल्या नृत्यात लॉरेन्सला मजा वाटत नसे. तरीही चिक्कार ब्रँडी झोकलेल्या ब्रेट्टनं त्याला आपल्यासंगे नृत्य करण्याचा आग्रह केला होता आणि त्यानं नृत्य केलंही. परंतु त्यानंतर घडलेल्या घटनांबाबत ब्रेट्ट आणि मेबल यांच्या वृत्तांतात बरीच तफावत आहे. फक्त दोन गोष्टींबाबत एकवाक्यता आढळते : नाचत असताना ब्रेट्ट आणि लॉरेन्स आजूबाजूच्या लोकांवर आदळत होते, मेबल आणि क्लॅरेन्सवरही ते आदळले होते, आणि सगळ्यांना वुचकळ्यात टाकून फ्रीडा आणि क्लॅरेन्स एकमेकांसंगती कुठेतरी गायब झाले होते.

एकांतात असताना फ्रीडा आणि क्लॅरेन्स यांचं काय बोलणं झालं हे खात्रीलायकरित्या सांगणं कठीण आहे. पण मेबल तिच्या आत्मवृत्तात असा दावा करते की फ्रीडानं क्लॅरेन्सला सांगितलं होतं की मेबलला ठार मारण्याचा लॉरेन्सचा बेत आहे. दुसऱ्या दिवशी सकाळी लॉरेन्स, फ्रीडा आणि ब्रेट्ट कायओवाला जायला निघाले तेव्हा लॉरेन्सनं 'द वूमन हू रोड अवे'चं हस्तलिखित मेबलला भेट दिलं होतं. त्यावेळी मत्सराचा मागमूसही त्याच्या चेहऱ्यावर नव्हता. मेबलच्या वागणुकीमधील काही दोष त्याला निश्चितच खटकत असत.

५ जून १९२४ ला मेबलला पाठवलेल्या पत्रात त्यानं लिहिलं होतं : 'मला फक्त स्तब्ध बसून राहायची इच्छा आहे, शनिवारी संध्याकाळपर्यंत....... परमेश्वरापाशी माझी मागणी आहे. तुलाही स्वस्थ ठेवावं आणि वेळ आपल्या गतीनं पुढं सरकत जावा.' अधिकार आणि चैनबाजी यांचं वर्चस्व असलेलं मेबलभोवतालचं वातावरण, छचोर नृत्यं यांचा मनस्वी तिटकारा लॉरेन्सला होता, आणि तिचं व्यक्तिमत्त्व आणि जीवन जगण्याची तऱ्हा याविषयी खुनशी वैर त्याच्या मनात मूळ धरू लागलं होतं. तथापि, ऑगस्टमध्ये होपी सर्पाचं नृत्य पाहाण्यासाठी मेबल आणि टोनीबरोबर ॲरीझोनाला जाण्यात मेबल – लॉरेन्समधील वितुष्टानं वितुष्ट आणलं नव्हतं. या ट्रीपमध्ये लॉरेन्सबरोबर फ्रीडाही होती, ब्रेट्टला मात्र वगळण्यात आलं होतं. आणि काहीही कुरबूर न करता ती मागं राहिली होती. प्रवासात मोटार हाकताना टोनी गात होता आणि लॉरेन्स पतीपत्नी वितंडवाद घालत होती वा निसर्गदृश्य पाहून अचंबित होत होती आणि मेबल ममी असल्यागत मख्ख होती.

या सफरीनंतर मेबल तातडीनं डॉ. ब्रिलला भेटायला गेली होती. लॉरेन्सनं तिला लिहिलं होतं की बरं झालं, हां, डॉक्टरची गरज होती तिला. आणि आपल्या इच्छा काबूत ठेवायला तिनं शिकायला हवं. ती परतून आल्यानंतर लॉरेन्सची तिच्याशी ओझरती भेट झाली होती. एकमेकांशी ते मित्रत्वानं वागले होते. पण मेक्सिकोला गेल्यानंतर मात्र तिनं त्यांला पत्रातून

कळवलं होतं की तो 'इव्हील' आहे, दगाबाज आहे. पुढील वर्षी लॉरेन्स कायओवाला राहायला आल्यानंतरही त्यांची भेट झाली नाही. त्यानंतरही ते एकमेकांना कधी भेटले नाहीत. युरोपमध्ये लॉरेन्स गेल्यानंतर मात्र त्यांचा पत्रव्यवहार चालू झाला होता.

१० सप्टेंबरला, लॉरेन्सच्या एकोणचाळीसाव्या वाढदिवसाच्या आदल्या दिवशी, त्याच्या वडिलांचं वयाच्या अठ्याहत्तराव्या वर्षी निधन झालं. ही वार्ता ३ ऑक्टोबरच्या मरेच्या पत्रात कळवून त्यानं लिहिलं : 'मला दक्षिणेकडे जायचं आहे, तिथं कडाक्याची थंडी नसते, जिथं झडप घालण्यासाठी टपून बसलेल्या एखाद्या बर्फाळ चित्त्यागत गारठा कुणावर आक्रमण करीत नाही. उत्तरेचं काळीज थंड आहे आणि गारठ्याची बोटं म्हणजे मढ्याची बोटं!

अमेरिकेत लॉरेन्सची पुस्तकं बऱ्यापैकी खपत होती. मानधनाची रक्कमही चांगल्यापैकी मिळत होती. तुटपुंज्या पैशावर गुजराण करण्याचे दिवस एव्हाना संपले होते. ८ ऑक्टोबरच्या लॉरेन्सच्या डायरीतल्या नोंदीनुसार इंग्लिश बँकेमधील एकूण रक्कम, ३०३ पौंड. २३ रस्त्यावरील चौथ्या ॲव्हेन्यूवरील 'चेस नॅशनल बँक' २,२८५.२१ डॉलर. ११ ऑक्टोबरला लॉरेन्स आणि फ्रीडा पुन्हा एकवार मेक्सिको शहराकडे निघाले. यावेळी त्यांच्याबरोबर ब्रेट्ट होती. फ्रीडा सर्दीनं बेजार झाली होती. ब्रेट्टनं काहीशा खवचटपणानं नमूद केलं आहे की मेक्सिकोच्या वकिलातीमध्ये फ्रीडाला लॉरेन्सची आई समजण्यात आलं होतं. तिच मते, कारण फ्रीडाच्या देहाचा घेर.

हे त्रिकूट दोन आठवडे मेक्सिको शहरात राहिलं. ८ नोव्हेंबरला ते आणखीन दक्षिणेकडे सरकलं, ओआस्काला पोचलं. अंतर फार नसूनही दोन दिवसांचा प्रवास. ओआस्का एक छोटसं गाव, जवळपास तीस हजाराचं, दक्षिणेत एका बाजूला, हवामान अगदी हवं तसं बाजारात सर्वच गुलाब आणि व्हाओलेट्स बागा फुलांनी बहरलेल्या. प्रत्येक दिवशी उन्हही अगदी हवं तेवढं, मध्यान्ही काहीसा उष्मा. बरेचसे रहिवासी झाटोपेक इंडियन, बुटके पण अत्यंत ताठ आणि तरतरीत आणि चैतन्यमय : खरंच अतिशय भले. मधमाशांच्या पोळ्यागत गजबजलेलं मोठं मार्केट, जिथं गुलाबापासून घोड्याच्या नालापर्यंत कोणी काहीही खरेदी करू शकतो. मातीचे सुरेख रंगीत घडे, अगदी कमी किंमतीत........ बरेच रानटी इंडियन आहेत, ज्यांना कशाहीबद्दल काहीही माहिती नाही. त्यांना सांगण्यात आलं आहे की प्रत्येक "धनिक" हा शत्रू असतो, तेवढंच ते जाणतात.

पहिले आठ दिवस लॉरेन्स, फ्रीडा आणि ब्रेट्ट 'हॉटेल फ्रान्झिआ' मध्ये राहिले. त्यानंतर ब्रेट्ट फक्त या हॉटेलात राहिली आणि लॉरेन्स रिकार्ड्स या इंग्रज पाद्र्याच्या घरात राहायला गेला. इथल्या हवेत लॉरेन्सच्या घशाचा आणि छातीचा त्रास बराच कमी झाला. तब्येत सुधारल्यानंतर आपल्या रांचवर जायचं त्यानं ठरवलं. सगळं काही मनाजोगतं होतं फक्त रस्त्यातून त्याच्या बाजूनं जाणारे इंडियन त्याच्याकडे बोट दाखवून घोगऱ्या आवाजात पुटपुटत, "क्रिस्टो ! क्रिस्टो" – ख्रिस्त ! त्यांच्या या कुजबुजण्यानं तो आतल्या आत

धुसफुसायचा.

लॉरेन्सनं 'द प्लूड सर्पट'च्या पुनर्लेखनाला प्रारंभ केला. ब्रेट्ट त्यानं लिहिलेला मजकूर टाइप करण्यासाठी त्याच्या घरी दररोज येऊ लागली. दोघंही बराच काळ एकत्र असत. बऱ्याच वेळा दोघंही मिळून वाळवंटात जात. एखाद्या झुडपाच्या सावलीत बसून रेखाटनं काढत, लिहीत आणि फ्रीडा घरात जळफळत राही. आपल्या आयुष्यातील ब्रेट्टची लुडबूड तिला सहन होईना. एक दिवस ब्रेट्ट आणि स्थानिक ब्रिटिश कॉलनीतील सभासद यांच्याबरोबर लॉरेन्स प्यायला. घरी यायला त्याला उशीर झाला. त्याचं पाऊल घरात पडलं मात्र, फ्रीडाच्या तोंडाचा पट्टा सुरू झाला. त्याच्यावर ब्रेट्टवरून यथेच्छ तोंडसुख घेतलं आणि ठणकवून फर्मावलं की ब्रेट्टची तात्काळ हकालपट्टी करावी. इथं तिनं राहता कामा नये.

फ्रीडाचा मत्सर लॉरेन्सला मूर्खपणाचा वाटला. त्यानं तसं तिला सांगताच ती अधिकच खवळली. शेवटी लॉरेन्सनं तिचं सांगणं ऐकलं. ९ जानेवारी १९२५ ला त्यानं ब्रेट्टला लिहिलं – 'तू, फ्रीडा आणि मी याचा सुखद मेळ होण्याची आता लक्षणं नाहीत. चंबूगबाळं आटपून आपल्याला ताओसचा रस्ता धरण्यास सांगण्यात आलं ही बाब तिला निष्ठूर वाटली. काय करावं तिला सुचेना. ती निघत नाही ते पाहून फ्रीडा तिच्या हॉटेलात गेली आणि तिनं तिचा खरपूस समाचार घेतला. फणकाऱ्यानं म्हणाली की, लॉरेन्स आणि ती यांच्यामधलं नात, पाद्र्याच्या हाताखाली काम करणारा पगारी नोकर आणि प्रौढ कुमारिका यांच्यामधल्या संबंधासारखं आहे.

लॉरेन्स सांगतो, तिच्यासारख्या शतावरीच्या काडीगत असलेल्या स्त्रीच्या प्रेमात तो पडण्याची सुतराम शक्यता नाही. फ्रीडाचा तो चंडिकेचा अवतार पाहून ब्रेट्ट जानेवारी अखेर कायओवा रांचला राहायला निघून गेली.

त्यानंतर दोन आठवडे निघून गेले. दरम्यान ब्रेट्ट रांचवर पोचली आणि लॉरेन्सचं पत्र तिच्या हाती पडलं. या पत्राचा सूर तिला कठोर वाटला. त्यानं लिहिलं होतं की ती गेल्यामुळे त्याला आता खूप बरं वाटत आहे. तिचा सहवासच त्याच्या प्रकृती अस्वास्थ्याला कारणीभूत होता. 'तुझी मरेबरोबरची मैत्री आत्मिक होती. तू त्यात काम खेचून आणलास. आणि तो तुझा तिरस्कार करू लागला. तुझ्यामाझ्यामध्ये विषयलोलुप आदानप्रदान नाही. नजरेत काम, मस्तकात काम यानंच तू उत्कंठित होतेस. तुला ते आवडतं. ही गोष्ट इव्हिल आणि विनाशक आहे.

आपला अवमान करण्यात आला आहे, आपल्याला अव्हेरण्यात आलं आहे याची टोचणी ब्रेट्टच्या मनाला सलत राहिली. तिच्याशी लैंगिक संबंध जुळविण्यास तिच्याकडे पाहून कुणाही पुरुषाची इच्छा होणार नाही हा लॉरेन्सचा आरोप तिच्या वर्मी झोंबला. त्याच्या आरोपात तथ्य नाही हे त्याला दाखवून देण्यासाठी तिनं त्रिनिदाद या विवाहित इंडियनासंगे संधान जुळवलं. लॉरेन्सच्या या नोकरासंगे कामप्रेरणेची तृप्ती करून घेतली. हे प्रकरण लॉरेन्सच्या कानी पडलं. हा स्वैराचार त्याच्या 'प्युरिटन' मनाला रुचला नाही. त्यानं

त्रिनिदादला कामावरून काढून टाकलं.

याच वर्षी या प्रकरणाशी संबंधित असलेली 'द प्रिन्सेस' ही कथा लॉरेन्सनं लिहिली. डॉली वनून व्रेट्ट या कथेत अवतरली आहे. ती उच्च कुळीची प्रौढ कुमारिका आहे. जीवनाशी तिला परिचय आहे तो मोपासा, झोला यांच्या साहित्यकृतींमधून. रोमेशे या उसळत्या रक्ताच्या मेक्सिकन वरोबर ती घोड्यावर बसून जंगलात जाते. त्याच्यासंगे तिला संभोगाचा अनुभव घ्यायचा आहे. ती त्याच्याशी समागम करते. पण हा अनुभव तिला सुखद वाटत नाही. रोमेशे तिला बंदिस्त करून ठेवतो आणि तिला अतिशय वाईट तऱ्हेने वागवतो. शेवटी गोरे लोक तिची सुटका करतात आणि रोमेशेला गोळी घालतात. त्याचा गुन्हा – एका गोऱ्या बाईसंगे तो झोपला.

•

ओआस्कामध्ये लॉरेन्सनं 'मॉर्निंग्ज इन मेक्सिको'चं प्रारंभीचं सुरेख प्रकरण लिहिलं, 'द प्लूम्ड सर्पंट'चा दुसरा खर्डा पूर्ण केला.

'द प्लूम्ड सर्पंट' ही केट लेस्लीची कहाणी आहे. केट चाळीस वर्षांची विधवा आहे मुक्ती शोधण्यासाठी ती मेक्सिकोला येते आणि तिच्यामध्ये आमूलाग्र बदल घडून येतो. सिप्रिआनोचं 'प्राचीन लिंगविधीचं गूढ' आणि क्वेट्झाल्कोटलचा जिताजागता अवतार रेमाँ यांचा तिच्यावर विलक्षण प्रभाव पडतो. कादंबरीची सुरुवात होते बैलांच्या झुंजीच्या प्रसंगानं. या झुंजीमधलं क्रौर्य आणि रक्तपात पाहून केटच्या व्यक्तिमत्त्वामध्ये उलथापालथ होते पण ती नाऊमेद होत नाही. ती नदीकाठानं पुढं जाते तेव्हा तिला आढळून येतं, इथली भूमी, इथलं जग रक्तानं चिंब झालेलं आहे.

पुस्तकामधील पुरुषी क्रौर्याचं हिडीस कृत्य म्हणजे रेमाँवर हल्ला करणाऱ्या टोळीची करण्यात आलेली विधीयुक्त हत्या. सिप्रिआनो लुटारूंचा वेगानं पाठलाग करतो, त्यांना कब्जात घेतो. कैद्यांच्या अंगावरील वस्त्रं तो उतरवतो, त्यांना बांधून ठेवतो. या कैद्यांमध्ये एखादा शूरवीर आढळला तर त्याला शपथ घ्यायला लावून आपल्यात सामील करून घेतो एखादा लफंगा,दगाबाज, डरपोक आढळला तर 'मी सुऱ्याचा रुधिरलालं हुईट्झिलोपोश्ट्ली आहे' असं म्हणत तो त्याच्या छाताडात सुरा खुपसतो. सिप्रिआनोनं देवतेचं नाव घेतलं एथवर ठीक पण देवाप्रमाणं जीवनमरणाचा निकाल देण्याचा अधिकार त्याला कोणी दिला होता? फॅसिझमला साजेसं हे अघोरी कृत्य आटोपल्यानंतर मृतांचे देह पुढील विधी–समारंभासाठी चर्चमध्ये नेण्यात येतात. याठिकाणी जायची स्त्रियांना मनाई असते.

इथली संस्कृती सर्वार्थानं पुरुषप्रधान संस्कृती आहे. इथं मैथुन हे स्वतःच्या आनंदासाठी नसून प्रियकराच्या आनंदासाठी असतं ही शिकवण केटला अंगी बाणवावी लागते; स्वतःच्या कामासक्तीचा त्याग करणं आणि जे जे होईल ते ते शरणगती पत्करल्यागत निमूट पाहाणं याचे पाठ गिरवण्याची सवय तिला जडवून घ्यावी लागते. सिप्रिआनोला जेव्हा जाणवतं की ती संभोगाच्या अत्युच्च क्षणापाशी पोचणार आहे, तत्क्षणी तो तिच्यापासून दूर



अनुक्रमणिका

होतो. मैथुनाच्या परमानंदाच्या प्रक्षुब्ध सुखापासून तिला वंचित राहावं लागतं. तरीही या देहसंगास तिची मान्यता असते. या फँटसीमधील लॉरेन्सची मनोधारणा नजरेत भरल्यावाचून राहात नाही. फ्रीडा कधी नव्हे एवढी ठामपणे त्याच्या अधीनं व्हायला आता नकार देत होती. मैथुन प्रसंगीचं तिचं वर्चस्व त्याला सहन होईनास झालं होतं. त्याबद्दलची चीड एव्हाना शिगेला पोचली होती. तिच्याबद्दलच्या तक्रारीचा सूरही चढा लागू लागला होता. स्त्रीला सुख देण्याच्या कामी एखाद्या चाकरागत पुरुषाचा जो वापर केला जातो त्याबद्दलच त्याची नाराजी तीव्र बनली होती.

लॉरेन्सची धारणा बनली होती की मैथुन चालू ठेवण्यास पुरुषानं दिलेला नकार अंतिमत: पुरुषापेक्षा स्त्रीलाच अधिक सुखदायी ठरणारा असतो. स्त्रीपुरुषाच्या लैंगिक संबंधाचं सांगोपांग विश्लेषण १९२८ मध्ये त्यानं लिहिलेल्या 'लेडी चॅटर्लीज लव्हर'मध्ये आढळून येतं. इथं नायिकेला सांगण्यात येतं की देहसंगाच्या समयी तिनं स्वस्थ पडून राहावं आणि स्वसुखाचा विचार करू नये. त्यासाठी असा युक्तिवाद केला आहे की पुरुषाची तृप्ती आदीम आणि सुज्ञ जगाशी निगडित असते.

'वूमेन इन लव्ह'मध्ये शक्तिशाली मातासदृश स्त्रियांचं वर्चस्व आहे. तिचा प्रतिकार करता करता तो 'ॲरनस रॉड' पर्यंत पोचला. त्यात लिलिचा अट्टाहास असतो की स्त्रीनं पूर्णपणे अधीन व्हायला हवं. 'कांगारु'मध्ये पुरुषांच्या जगात पुरुषी वर्चस्व प्रस्थापित करण्याची असफल धडपड आहे. आता 'द प्लूम्ड सर्पंट'मध्ये त्यानं फँटसी रंगवली, मेक्सिको आणि इंडियन, अत्याधुनिक स्त्रियांच्या वरचढपणाला खीळ घालू शकतील.

लॉरेन्सनं कादंबरी लिहून पूर्ण केली, आणि त्याचं त्राण संपुष्टात आलं. तो गंभीर आजारी झाला. २ फेब्रुवारी १९२५ला त्याला मलेरियानं गाठलं. दुखणं टायफॉईडवर गेलं. ७ फेब्रुवारीला त्यानं विल्यम हॉकला कळवलं की, या ट्रीपमध्ये नशिबानं त्याच्याकडे पाठ फिरवलेली दिसते. जिवंत असेतोवर मेक्सिकोला येणं त्याला जमेलसं वाटत नाही. त्याला समजत नाही, इथं त्याला बरं का वाटू नये. वाटलं अंगातल्या फ्लूनं आता डोकं वर काढलं असावं, मलेरिया झाला आहे. डॉक्टर येतो. क्विनाईनच्या इंजेक्शनांचा मारा चालू आहे. एखाद्या लक्तरागत अवस्था झाली आहे, पण तसा बरा आहे.

पण त्याचं समाधान क्षणिक ठरलं. कधी नव्हे एवढा त्याचा आजार गंभीर झाला. क्षयाची व्याधी बळावली. रक्ताच्या उलट्या झाल्या. तोंडावाटे रक्त पडत असताना श्वास घेणंही मुष्किल झालं. त्या काळात क्षयाची दुर्धर व्याधी म्हणजे मृत्यूचे पाश. त्यानं फ्रीडाला सांगितलं की स्थानिक दफनभूमीतच त्याला मूठमाती देण्यात यावी. फ्रीडानं त्याचं म्हणणं वळेबळे हसण्यावारी नेलं, म्हणाली की ती जागा भयंकर गलिच्छ आहे. त्या रात्री त्यानं तिला सांगितलं, "मी मेलो तर मला चिंता वाटते ती तुझी, अन्य कशाचीही नाही."

फ्रीडा उत्कृष्ट नर्स होती. क्षयाच्या संसर्गाची भीती तिला नव्हती. तिनं डोळ्यात तेल घालून लॉरेन्सची सेवाशुश्रुषा केली. लॉरेन्सच्या छातीतील वेदना कमी व्हाव्यात म्हणून

वाळूच्या गरम बॅगा त्याच्या छातीखाली ठेवल्या. लॉरेन्स मृत्यूच्या दारातून माघारी वळला. प्रकृती सुधारू लागली. तेवढ्यात भूकंप झाला. त्यांचं घर मोडकळीला आलं. ते हॉटेलात राहायला गेले आणि फ्रीडा आजारी पडली.

इथल्या गंभीर आजारात लॉरेन्सनं 'द फ्लाईंग फिश' ही कथा लिहायला घेतली होती. सुरुवातीचा मजकूर त्यानं फ्रीडाला तोंडी सांगून तिच्याकडून उतरवून घेतला होता. ही कथा तो पूर्ण करू शकला नाही. १९२८ मध्ये स्वित्झर्लंडला त्यानं ही अपूर्ण कथा ब्रुस्टर पतीपत्नींना वाचून दाखविली तेव्हा लॉरेन्सनं कथा पूर्ण करावी असा त्यांनी आग्रह धरला. त्यावर लॉरेन्स म्हणाला की ती 'मरणाच्या उंबरठ्यावर असताना लिहिली गेली आहे, दिवसाच्या थंडगार प्रकाशात तिचं लेखन पुढं चालू ठेवणं मला कधीच जमलं नाही.' आयुष्यभरात त्याला ते जमलं नाही.

फेब्रुवारी अखेरीस प्रवास करण्याइतपत अंगी त्राण येताच लॉरेन्स आणि फ्रीडा मेक्सिको शहरात येऊन दाखल झाले. तीन आठवडे त्याला बिछान्यावरून उठू दिलं नाही. डॉ. सिडनी यांनी त्याला तपासलं आणि त्याच्या समोरच त्यांनी फ्रीडाला सांगितलं,"मिस्टर लॉरेन्सला क्षय आहे. . . . त्याला रांचवर घेऊन जा; तेवढाच एक उपाय आहे. त्याचा क्षय अंतिम टप्प्यात आहे. फार फार तर एखादं दुसरं वर्ष." लॉरेन्सनं आपल्या पत्रामधून आजाराचा उल्लेख केलेला असला तरी पूर्वीप्रमाणंच आपल्याला क्षय असल्याचं त्यानं कुणालाही कळवलं नव्हतं. इंग्लंडला जायचा त्यांचा बेत होता पण त्यानं समुद्राचा प्रवास करू नये असा डॉक्टरनं सल्ला दिल्यामुळं त्यांनी तो विचार सोडून दिला.

तो कायओवाला जायला निघाले, पण एल पासो या अमेरिकन सीमेशी त्यांना अडवण्यात आलं. कारण अमेरिकन क्षयाला घाबरत. अमेरिकेत प्रवेश करणाऱ्याला क्षय नसल्याचं सर्टिफिकेट सादर करावं लागत असे. क्षयाची लक्षणं दिसू नयेत, त्याचा चेहरा तजेलदार दिसावा म्हणून 'रुझ'चा हलकासा हात त्याच्या चेहऱ्यावरून फिरवण्यात आला. तांबड्या पावडरनं त्याचा चेहरा काहीसा तजेलदार दिसला पण ही खबरदारी वाया गेली. सीमेवरील अमेरिकन अधिकाऱ्यांनी युद्ध काळातील त्याचे वैद्यकीय रिपोर्ट बघायला मागितले, त्याच्याशी उर्मटपणे वागले. अखेर मेक्सिको शहरातील अमेरिकन वकिलातीच्या सेक्रेटरीनं मध्यस्थी केली. लॉरेन्सच्या बाबतीत नियमाचं काटेकोरपणे पालन करण्यात येऊ नये, त्याला जाऊ द्यावं म्हणून सेक्रेटरीनं संबंधित अधिकाऱ्याचं मन वळवलं.

एप्रिलच्या पहिल्या आठवड्यात लॉरेन्स फ्रीडासंगे कायओवा रांचला पोचला तेव्हा त्याच्या अंगात फारसं त्राण नव्हतं. पण मे उजाडला. हवा उबदार झाली. आणि लॉरेन्सची तब्येत सुधारू लागली. बायबलमधील कथानकावर आधारित 'डेव्हिड' हे अपुरं राहिलेलं नाटक त्यानं पूर्ण केलं. 'द प्लूम्ड सर्पंट'चं हस्तलिखित त्यानं नजरेखालून घालावं म्हणून प्रकाशकानं त्यांच्याकडे पाठवून दिलं. पण त्याकडे नजर फिरवण्याची देखील त्याला इच्छा होत नव्हती. 'त्या हस्तलिखिताला' अद्याप ओआक्साकाचा खरपूस वास येत आहे, तो

माझ्या मस्तकात गेला आहे कारण तिथं मी खूप आजारी पडलो होतो, मेक्सिकोच्या विचारानंच मला शिसारी येते. मित्रांची नव्हे, तर त्या प्रदेशाचीच. त्या प्रदेशानं तेव्हा मला एका वेगळ्या वळणावर नेलं होतं. तिथं पुन्हा मी कधी काळी जाईन का शंका आहे.' तशी त्याची प्रकृती बरी होती पण देह लटपटत होता. त्रिनिदादला त्यानं पुन्हा कामावर ठेवलं होतं. त्रिनिदाद आणि त्याची बायको रुफिना त्यांच्या दिमतीला होती.

ब्रेट्ट अद्याप त्यांच्याच रांचवर राहात होती. तिथून फ्रीडानं तिला हुसकावून लावल्यानंतर ती शेजारीच हॉकच्या मालकीच्या केबिनमध्ये राहायला गेली. तिथलं तिचं वास्तव्यही लॉरेन्सांना खपवून घेणं जड जाऊ लागलं. ओआक्साकामधून लॉरेन्सनं तिला एक खरमरीत पत्र पाठवलं होतं. त्या पत्राचं स्मरण करून देणारं आणखी एक पत्र त्यानं आता ब्रेट्टला लिहिलं सांगितलं की, 'तिनं आणि त्यानं एकत्र येण्याचा प्रयत्न करण्यात काही हशील नाही. लोकाशी जवळीक साधण्याची त्याला अजिबात इच्छा उरलेली नाही. परिचय पुरेसा आहे. व्यक्तीव्यक्तीमध्ये फूट पाडणं, त्यांना विभक्त करणं आणि त्यांना एकमेकांच्या उरावर बसायला लावणं हीच प्रवृत्ती जिथं नेहमी असते तिथं सहजीवन केवळ भ्रम.' रानानिमच्या स्वप्नाची अखेर झाली.

शरदाची चाहूल लागली तेव्हा युरोपमध्ये जाण्याचा निर्णय लॉरेन्सांनी घेतला.

**(क्रमश:)**

---

कादंबरीकाराने, आपल्या कादंबऱ्यात असलेली पात्रे ही एकेकाळी चालत्या बोलत्या जिवंत व्यक्ती होत्या. यावद्दल आपल्या वाचकांची खात्री पटविणे याला तसा अर्थच नाही. या व्यक्ती आपल्या आईच्या उदरातून आलेल्या नसतात. एखादा शब्दसमूह अथवा एखादी मूलभूत अशी परिस्थिती यांनी त्यांचा जन्म प्रोत्साहित केलेला असतो. – **मिलान कुंडेरा**

कोणत्याही ललितनिबंधात साहित्यातील अशुद्ध गोष्टींना, भेसळीला थारा नसतो. कधी मेहनतीच्या बळावर, कधी निसर्गाने उदारहस्ते दिलेल्या प्रतिभेच्या बळावर,तर कधी दोन्हीच्या मिश्रणातून हा ललितनिबंध निर्माण व्हावा. तो पाण्यासारखा निर्मळ, शुद्ध असावा. कंटाळवाणेपणापासून, थिजलेपणापासून, असंबद्ध, विसंगत गोष्टींपासून तो निबंध मुक्त असावा. **–व्हर्जिनिया वुल्फ**

कलाकृतीचे परीक्षण ही एक कलाच असते. एखादी कलानिर्मिती होत असताना विश्लेषणात्मक, समीक्षणात्मक वृत्ती नकळत कार्यरत असतातच. त्याशिवाय कलाकाराकडून कलाकृती निर्माण होऊच शकणार नाही. त्याचप्रमाणे समीक्षण वा परीक्षण हीही खरोखरी कला असते. एखादा परीक्षणपर लेख,समीक्षा निर्माण करण्यासाठी समीक्षक हा कलाकारच असावा लागतो. समीक्षा ही स्वतंत्र निर्मितीच मानावी असं मला वाटतं. **–ऑस्कर वाईल्ड**

# लेखमाला

## असा हा वाचनछंद – गीता मेहता

डॉ. मीना वैशंपायन

"साहेब, प्लेटोचे ताजे लिखाण – प्रजासत्ताक. शिवाय जेम्स हॅडली चेस आणि पी. जी. वुडहाऊस. तुम्हाला 'कॅचर इन द राय' हवी का साहेब? का 'मॅड' मासिक हवं? साहेब घ्या ना. आताच गठ्ठा खोललाय. निदान चार्ल्स डिकन्सच्या 'लिटल डोरिट'ची नमुना प्रत तरी घ्या."

माझ्या मते, भारतात वाचायला शिकणं हे असं, वर म्हटल्याप्रमाणे असतं. वाचनाचा आनंद कसा घ्यावा ते अशा फूटपाथवरच्या विक्रेत्यांकडून ओरडून सांगितलं जात त्यावेळी बरेचदा तुम्ही वाचायला शिकलेलेही नसता. रस्त्याच्या कडेला एखाद्या सुती चादरीवर पसरलेली ती पुस्तकं ओणव्याने पाहताना काहींच्या चेहऱ्यावर जो उत्साह असतो त्याचा आपण मनोमन हेवा करतो. तेवढ्यात येणाऱ्याजाणाऱ्यांच्या पायांनी पुस्तकांवर उडवलेली धूळ झटकत तो पुस्तक-विक्रेता आपल्या तोंडावर आणखी दोन पुस्तकं आदळतो. "मॅडम, ॲना कॅरेनिना पाहिजे की मादाम बोवारी? हा पाहा आता आलेला गरमागरम माल आहे. तुम्ही विश्वास ठेवा किंवा नका ठेवू, पण उद्या एकही प्रत मिळायची नाही."

मला वाटतं, जगात असा दुसरा कोणताच देश नसेल जिथे पुस्तकविक्रेते चालत्या आगगाड्यांच्या पायऱ्यावर उभं राहून एका हाताने दरवाजाचे, खिडक्यांचे लोखंडी गज पकडत, दुसऱ्या हाताने पुस्तकांचा गठ्ठा पुढे सरकवतात. तुम्ही पुस्तकं घ्यावीत म्हणून ते तुमची खुशामत करतात. तुमची विनवणी करतात. अगदी अक्षरश: तुमच्यापुढे पदर पसरून पुस्तकं वाचावीत असा आग्रह करतात. जगात असाही देश नसेल की जिथे वाचायला येणं म्हणजे वाचनाची इच्छा आहेच असं गृहीत धरलं जातं.

भारतातील निरक्षरतेचं प्रमाण एवढं मोठं आहे की, एखाद्याला वाचायला येणं ही गोष्ट दुसऱ्याच्या मनात त्याच्याबद्दल आदरच निर्माण करते. तो आदरही जरासा भीतियुक्तच असतो. लिहिता वाचता न येणाऱ्या घरातल्या मोलकरणीदेखील मालकाची मुलं वाचताहेत की नाही याकडे डोळ्यात तेल घालून लक्ष ठेवतात. इंग्लंडमधल्या शाळकरी मुलांच्या खेळांची कंटाळवाणी वर्णनं असणारी ती इंग्लिश प्रायमर्स आम्ही वाचावीत यासाठी या मोलकरणी दक्ष असत. आम्ही चांगलं वाचू लागलो की त्या मोलकरणींना जो आनंद होई त्यामुळे त्या पुस्तकांच्या





अनुक्रमणिका

कंटाळवाणेपणाची तीव्रता जरा कमी होत असे. आम्ही त्यांच्या मांडीवर बसून गोष्टी ऐकत असू आणि ज्यावेळी आम्ही वाचलेल्या गोष्टी या मोलकरणींना सांगत असू त्यावेळी त्यांचा आनंद अधिकच वाढे. त्यांच्या गोष्टी देवदेवतांच्या, राजांच्या, मोक्षप्राप्तीसाठी भलेबुरे मार्ग अवलंबिणाऱ्या साधूंच्या असत. कधीकधी निद्रिस्त सुंदरी आणि टॉम थंबसारख्या साहसी वीरांच्यादेखील कथा असत. या नोकराणींमुळेच काल्पनिक जगाबरोबर वास्तव जगाचीदेखील जाणीव आम्हाला झाली. रात्री झोपायला गेल्यावर अंधाऱ्या खोलीत विजेरीच्या प्रकाशात वाचलेल्या पुस्तकाएवढं ते जग आम्हाला आमच्या आवाक्यातलं वाटे, निकट आहे असे भासे. मग वाचण्याची इतकी जबरदस्त ओढ निर्माण झाली की तो दुर्गुणच ठरू लागला. खरोखर काही वेळा आम्ही वाचनात इतके बुडलेले असू की आम्हाला जेवण्याझोपण्याची देखील शुद्ध नसे. अशावेळी तर आमचं वाचन हा नक्कीच दुर्गुण ठरत असे. आमच्या वाचनाच्या सवयींबद्दल मोठी माणसं कितीही रागावत असली तरी पुस्तकांचा आदर केलाच पाहिजे असा त्यांचा आग्रह असे. त्याबाबतीत ती मंडळी हट्टीच होती म्हणा ना! एखादं पुस्तक वेडंवाकडं हाताळणं किंवा त्यावर पाय देणं हा मोठा अपराध समजला जाई. आमच्या हातून जर असं काही घडलंच तर सारं घरदार आमच्याशी तुच्छतेनं आणि रागावल्यासारखं वागत असे. आमच्या दृष्टीने आमचं वाचन म्हणजे लहानपणीच्या सुखद आठवणींचा एक हवासा लक्षणीय घटक होता. किशोरवयात आम्ही वसतिगृहात राहायला गेल्यावर तर आमच्या चिमुकल्या आयुष्याचा तो आवश्यक घटक बनला. आमच्या वसतिगृहाच्या बराकीसारख्या खोल्यांना पत्र्याची छपरं होती. पावसाळ्यात या पत्र्यांवर पाऊस अक्षरश: आदळत असे. तो पावसाचा आवाज त्या अंधाऱ्या रात्रींची भयानकता वाढवी. घराच्या आठवणींचे आमच्या गळ्यातून येणारे कढ, हुंदके त्या पावसाच्या आवाजात इतरांना ऐकू येत नसत. एकटेपणाच्या अशा त्या रात्री आमच्या बाई आम्हाला सोबत करीत. ती सोबत बोलकी असे. बाई वेगवेगळ्या गोष्टी मोठ्याने वाचून दाखवीत. कधी हॅरी नावाच्या घोड्याची गोष्ट, कधी श्रीमती बेनेटच्या मुलींची गोष्ट, तर कधी जोरजोराने ओरडून झुरळाला हाकलणाऱ्या मेहितावेलची गोष्ट!

शाळेला सुट्टी लागली की आम्ही घरी येत असू त्यावेळी अनेक पुस्तकं आमची वाट पाहात असत. आमच्यासाठीच खरीदलेल्या त्या पुस्तकांना एक प्रकारचा कर्तव्यगंध असे– जसा शाळेच्या क्रमिक पुस्तकांना असतो तसा. एक गोष्ट मात्र आम्हाला फार आवडे. रोज सकाळी आईवडिलांना भेटायला जे लोक, नातेवाईक येत असत ते आमच्यावरून पैसे ओवाळून टाकीत– नजर लागू नये म्हणून! ते पैसे आमच्या हाती दिले जात. त्यातून आम्हाला हवी ती पुस्तकं आम्ही आणू शकत होतो. शिवाय दोन पुस्तकं विकत घेतली की वाचायला अगणित पुस्तकं मिळत. त्या छोट्याशा ग्रंथालयाचे आभारच मानायला हवेत.

अर्थात ही ग्रंथालये काही उत्तम दर्जाची नव्हती. भडक रंगाने रंगवलेल्या ट्रंकांमधून

इकडेतिकडे फिरणारी ती फिरती वाचनालये होती. मालकाच्या सायकलीवर मावतील तशा लहानमोठ्या २-३ ट्रंका पुस्तकांनी भरून ते लोक हिंडत.त्यांची जाहिरात वगैरे नसेच.एकमेकांनी एकमेकांना सांगायचं फक्त! माझ्या आवडीचं असं एक ग्रंथालय कलकत्यात ओ. एन् मुखर्जी एम्पोरियमच्या मागच्या बाजूला होतं. त्या एम्पोरियमला संकटकाळी बाहेर पडण्यासाठी एक जिना होता. मागच्या बाजूच्या त्या जिन्याच्या दोनतीन पायऱ्यांवर हे आमचं ग्रंथालय होतं. माझ्या मोठ्या भावानं अगदी ठामपणे मला सांगितलं होतं की, 'जगात असा वेस्टर्न पुस्तकांचा साठा तुला दुसरीकडे मिळणारच नाही.' त्या ग्रंथालयात काही आणे देऊन आणि आपलं एखादं जुनं पुस्तक देऊन अनेक पुस्तकं वाचता येत. लुई ल मार, झेन ग्रे यांची हवी तेवढी पुस्तक वाचायला मिळण्याची तिथे सोय होती. कधी एका पुस्तकातून दुहेरी लाभ होई. एका बाजूला 'अपाची' चे चित्र आणि उलट केल्यावर एखाद्या बंदूकधारी काऊबॉयचे चित्र! म्हणजेच एका पुस्तकाबदल्यात दोन मिळत. अशा त्या वाचनालयाच्या व्यवस्थापकाचे आभारच मानायला हवेत.कारण Western वेस्टर्न या शब्दाची त्याची व्याख्या फार व्यापक होती. त्याच्या मते 'वेस्टर्न' या सदरात मोडणाऱ्या पुस्तकांमध्ये कधी कधी आम्हाला जॅक लंडन, स्टीफन क्रेन, जोसेफ कॉनरॉड, अलेक्झांडर ड्यूमा किंवा लियो टॉलस्टॉयदेखील वाचायला मिळत, आणि आम्ही अगदी वेगळ्याच विश्वात वावरत असू. एका चिनी बूटविक्रेत्याच्या समोर एक असंच वाचनालय होतं. त्यात कधीकधी आश्चर्यकारक रीतीने आम्हाला डेनिस व्हीटले, एडगर ॲलन पो आणि ब्रॉन्टे भगिनींची पुस्तकं वाचायला मिळालेली आहेत.

आणखी एक वाचनालय होतं. त्यात आम्हाला रशियन अभिजात कलाकृतींचा ठेवा मिळाला. सोव्हियत युनियनने भारतीय बाजारपेठेसाठी खास तयार केलेल्या त्या स्वस्त आवृत्त्या असत. त्याचबरोबर तिथे रहस्यकथांचंही भांडार होतं. त्यामुळे स्वाभाविकपणेच आम्ही ॲगाथा ख्रिस्ती, जॉर्ज सायमन, रेक्स स्टाऊट यांच्या कथा वाचल्या तशाच चेकॉव्ह, गॉर्की आणि दोस्तोएव्स्की देखील वाचले.

शासकीय कार्यालयांच्या मिणमिणत्या प्रकाशात काम करणारे, जुनी वापरलेली पुस्तकं विकत घेणारे हे कारकून अशी वाचनालये चालवीत. या लोकांनीच आमची अभिरुची घडवली असं मानलं तर हेही तेवढंच खरं आहे की, त्यांच्यामुळे नकळत का होईना पण दिखाऊपणा, वाचनाच्या बाबतीतला उच्चभ्रूपणा आम्हाला स्पर्श करू शकला नाही. कोणतंही पुस्तक वाचायला, समजायला कठीण नसतं असा अढळ विश्वास आमच्या मनात होता. प्रत्येक पुस्तकात वाचकाला आनंद देणारा एक छोटासा झरा झुळझुळत असतो.

या सर्व वाचनालयांमध्ये एक मोठी उणीव होती. कॉमिक्स- चित्रकथा वाचण्याची आमची भूक मात्र त्यांना शमवता आली नाही. चित्रकथा विकणारे, वाचायला देणारे दुकानदार आपल्या धूर्त, बेरक्या डोळ्यांनी आमच्याकडे पाहात आणि पुस्तकाच्या संपूर्ण किंमतीएवढे पैसे मागत.



अनुक्रमणिका

खरंच किती कठोर असे त्यांचं वागणं! पणा अशा निष्ठुर वागण्यानेच त्यांची वाचनालये स्थायी स्वरूपात उभी राहू शकत. आपल्या ओबडधोबड लाकडी झोपडीवजा घरांमध्ये जमिनीवर चादरी पसरून आपल्यावरच खूष होत, मंद स्मित करीत ते दुकानदार आपल्याभोवती आम्हाला अलभ्य असा खजिना मांडून बसलेले असत. आमच्या चपला, बूट रस्त्यावर काढून ठेवून, अनवाणी पायांनी आम्ही त्या दुकानाच्या दोन-तीन लाकडी पायऱ्या चढून वर जात असू आणि मग आर्ची, व्हेरोनिका, सुपरमॅन, कॅप्टन मार्वेल, जंगलकन्या, न्यायोका अशा लोकांमध्ये हरवून जात असू. याशिवाय या चित्रकथांमधून अभिजात पुस्तकेदेखील चित्रित केलेली असत. मला तर वाटतं, यांच्याच मदतीने आम्ही पुढे केंब्रिज विद्यापीठात आमच्या साहित्यविषयक पदव्या मिळवल्या. या चित्रकथांनी त्या त्या अभिजात पुस्तकांमधील मूळ कथावस्तू- पात्रे यांचा पक्का ठसा आमच्या मनावर, डोक्यात उमटवलेला होता.

थोडे मोठे झाल्यावर आम्ही पुस्तकांच्या मोठमोठ्या दुकानांमध्ये जाऊ लागलो. कलकत्याच्या पार्क स्ट्रीटवर असणाऱ्या 'ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस'च्या दुकानात मी जाई. एखाद्या चर्चप्रमाणे भव्य अशा त्या दुकानाचा दर्शनी भाग काचांनी मढवलेला असे. त्यातून आतल्या 'महागनी' लाकडाच्या मांडण्यांवर लावून ठेवलेली पुस्तकं दिसत. दुकानातील कर्मचाऱ्यांचे कुजबुजते आवाज तिथल्या एअरकंडिशनरच्या आवाजामुळे स्पष्टपणे ऐकूही येत नसत. नवी दिल्लीमधील Lutyens लूट्येनच्या मोठमोठ्या खांबामागे लपलेलं 'रामकृष्ण ॲन्ड सन्स' दुकानही वैशिष्ट्यपूर्ण होतं. तिथे पुस्तकांचे ढीग अक्षरशः छतापर्यंत असत. त्यांच्या वर्गीकरणाची पद्धत इतकी विचित्र होती की पुस्तकं नेमकी शोधून काढणं त्या म्हाताऱ्या थकलेल्या व्यवस्थापकालाच जमत असे. 'फकीर चाँद' या दुकानाचा, पाठीतून वाकलेला मालक इतका प्रेमळ होता की तुम्ही पुस्तकं घ्या किंवा नका घेऊ, दुकानाची आद्याक्षरे कोरलेलं पेन किंवा पत्र उघडण्याची छोटी सुरी तुम्हाला दिल्याशिवाय तो तुम्हाला जाऊच देत नसे. मुंबईला फोर्टमधील मुंबई विद्यापीठाजवळचा स्ट्रँड बुक डेपो कायम जाहिरात क्षेत्रातील अधिकाऱ्यांनी भरलेला असे. Catch 22 या नियतकालिकाची आपली प्रत घेण्यासाठी त्यांची तेथे गर्दी असे.

या पुस्तकांच्या दुकानात आम्ही पेंग्विनच्या नव्या पुस्तकांची वाट पाहात असू. त्यावेळी दर महिन्याला भारतात पेंग्विनची नवी चार पुस्तकं येत. आधीची पेंग्विन पुस्तकं वाचत असतानाच आमची कॅथरीन ॲन पोर्टर, नाबोकोव्ह, नॅन्सी मिटफोर्ड, एव्हलिन वॉ अशांशी भेट झाली होती. कधीकधी शेंदरी रंगाची मुखपृष्ठं असणारी ती पेंग्विन पुस्तकं आम्ही तिथंच टाकून देत असू आणि मोठ्या ऐटीत Feber आणि Faber च्या पिवळ्या मुखपृष्ठांच्या पुस्तकांकडे वळत असू. The Daring Young Man On The Flying Trapeze यासारखी विल्यम सारोयनची पुस्तकं त्यापैकीच होती. कधीकधी सॅम्युअल बेकेट वा हेरॉल्ड पिंटरची निळ्या बांधणीतील

मेथ्युइन प्रत आम्ही घेत असू. कधी गर्ट्र्यूड स्टेइन, नथानियल वेस्ट, केराऊस, कॅपोटे, जे. डी. सालिंगर यांच्या अमेरिकन पेपरबॅक प्रती घेत असू. ही पुस्तकं रंगीबेरंगी कपड्यांप्रमाणे चमकदार, विविधरंगी असत. पण अशा सगळ्या वातावरणात वाढत गेलेली आमची वाचनाची अनावर आवड आमची प्रगती करण्यास मदत करीत आहे असं मात्र लक्षात येत नव्हतं. त्या छोट्याशा गल्लीबोळातल्या पायऱ्यांवर मांडलेल्या दुकानांनी आणि वाचनालयांनी आमची वाचनभूक चाळवली हे खरंच! सर्व प्रकारच्या वाचनसुखाची जाणीव मनात उत्पन्न करण्याचं कार्य त्यांनी चिकाटीनं केलं.

एखाद्या उपहारगृहाच्या बाहेर, सिनेमा थिएटरच्या आसपास, क्रिकेटचा सामना पाहायला गेल्यावर अशा छोट्या छोट्या दुकानदारांची दुकानं असतात. त्यातील पुस्तकं पाहून कमीतकमी ती चाळून पाहाण्याची इच्छा तुम्हाला होतेच. दुकानं लावण्यातील, दुकानासाठी नेमक्या जागा हेरण्याचं या दुकानदारांचं कौशल्य अजोड असतं. त्यांच्या या चिकाटीनेच खरं म्हणजे पुस्तकांबाबतीत आम्ही खादाड बनलो. आजही वाचनाच्या बाबतीला माझा तो तेव्हाचा खादाडपणा कायम आहे आणि पुस्तकांच्या निवडीबाबतही मी तेव्हाप्रमाणे आताही चोखंदळ नाही. एखादे इतिहासाचे पुस्तक असो वा एखादे चरित्र हाती येवो मला सारखाच आनंद होतो. मानवी वर्तनासंबंधी विचार करण्यात, वाचण्यात माझे तासन्‌तास अगदी आनंदाने जातात. चालू काळाशी संबंध ठेवण्यापुरती एखादी कादंबरीही मी कधीतरी वाचते. कधी जुनी पुस्तकं वाचावीशी वाटतात. मग Vanity Fair, War & Peace, Candide अशा पुस्तकांकडे वळते. यातील प्रत्येक पुस्तकाचं पुनर्वाचन मला सतत निराळाच आनंद देत असतं. कधीकधी एखादा दुसरा काव्यसंग्रह चाळते. तेवढाच जरा पोटाला व्यायाम. एमिली डिकन्सन म्हणत असे– "वाचनाचा गुलाम असणाऱ्यांसाठी काव्यसंग्रह म्हणजे आपल्या गारठलेल्या हातापायांना मिळणारा झटका असतो. तो आवश्यकच असतो. एखादं विज्ञानावरचं किंवा तत्त्वज्ञानावरचं पुस्तक कधी वाचते. कोण जाणे कधी एकदम या विश्वाच्या कोलाहलासंबंधीची उपपत्ती वाचायला मिळेल नाहीतर एकदम किर्केगार्डच हाती येईल. मात्र तुम्हाला एक विनंती– माझं विमान ज्यावेळी उशिरा येणार असतं, तेव्हा मात्र मला काही रहस्यकथाच वाचायला द्या."

मला वाचनाचं व्यसन आहे व त्याबाबतीत मी व्यसनाधीन आहे. हे व्यसन मला कुणी लावलं माहीत आहे? दुकानांच्या अरुंद फळ्यांवर मांडलेल्या, आपला पुस्तकांचा ठेवा सारखा खालीवर करीत नीट लावत राहाणाऱ्या त्या जादूगारांनी! याच जादूगारांनी आमच्या चिमुकल्या विश्वातून आम्हाला मोहवून दूर नेलं आणि अफाट कल्पनाशक्तीचं एक तारांगण आमच्यापुढे खुलं केलं. फ्रेंचमध्ये असं म्हणतात "जेव्हा बाकीची सर्व सुखं आभासात्मक वाटतात तेव्हा फक्त पोटाचं सुख शिल्लक राहातं." त्या तिथल्या जादूगाराच्या बाबतीत हेच खरं असावं. सर्कशीची जाहिरात करणाऱ्यांप्रमाणे, पुस्तकांची नावं घेत ते जेव्हा आम्हाला भुरळ पाडत, आम्हाला मोहात पाडत तेव्हा त्यांच्या बाबतीत ते फ्रेंच वाक्यच बहुधा खरं असावं!



अनुक्रमणिका

गीता मेहता या जन्माने भारतीय. त्याचं शिक्षण आरंभी भारतात व नंतर केंब्रिज- इंग्लंड येथे झालं. दूरचित्रवाणीसाठी अनेक चित्रपटाच्या पटकथा त्यांनी लिहिल्या. 'राज' आणि 'कर्माकोला' या त्यांच्या गाजलेल्या कादंबऱ्या. ओरिसाचे मुख्यमंत्री बिजू पटनाईक यांच्या त्या कन्या. सध्या त्यांचे वास्तव्य भारत, लंडन, न्यूयार्क येथे असते.

---

तपशीलच्या दुसऱ्या अंकात कॅथरीन कुकसन या लेखिकेबद्दल आपण वाचले असेलच. ब्रिटिश सरकारने त्याना पदवी देऊन त्यांचा बहुमान केल्याकारणाने त्या आता (DAME) डेम कॅथरीन कुकसन झाल्या आहेत. ऑक्सफर्डमधील सेंट हिल्डा कॉलेजने पुरुषाना त्या कॉलेजमध्ये प्रवेश द्यावयाचा नाही असा ठराव नुकताच केला. या कॉलेजला डेम कॅथरीन कुकसन यानी एक लाख पौंड रकमेची देणगी दिली आहे. (१ पौंड - सुमारे रुपये साठ) आज त्यांचे वय एक्याण्णव (जन्म १९०६) वर्षाचे आहे. त्यांच्या आजवर चौऱ्याऐशी कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या आहेत. (कादंबरी लेखनास वयाची ४१ वर्षे उलटून गेल्यानंतर त्यानी सुरुवात केली, हे या ठिकाणी लक्षात ठेवावयाचे) त्यांच्या कादंबऱ्यांपैकी दोन किंवा तीन कादंबऱ्यांना 'बेस्ट सेलर' यादीत कायम पहिल्या दहा क्रमांकात स्थान असते. उदा. १९९७ साली त्यांची 'दि अपस्टार्ट' आणि 'बॉन्डेज ऑफ लव्ह' या दोन्ही कादंबऱ्यांना 'बेस्ट सेलर' यादीत कायम पहिल्या दहात स्थान होते.

त्यानी ही देणगी-दिल्यानंतर काढलेल्या पत्रकात म्हटले आहे, "शिक्षण क्षेत्रात स्त्रियांना माझा पाठिंबा आहे हे दर्शविण्यासाठी मी ही देणगी दिली आहे. शिक्षण मिळविणे हा आपला हक्क आहे हे प्रस्थापित करण्यासाठी स्त्रियांना किती प्रखर संघर्ष करावा लागला याची जाणीव मला आहे. तसेच अगदी आजकालच्या दिवसातही विशेषत: या स्त्रिया तळागाळातून आलेल्या आहेत. त्याना शिक्षण प्राप्त करून घेण्यासाठी किती कष्ट करावे लागतात हेही मला चांगले ठाऊक आहे. . . . . याच संविधानाच्या (Theme) अवतीभोवती आजवर अनेक गोष्टी मी लिहिल्या आहेत. . . ." या देणगीचा रास्तप्रकारे कसा उपयोग करावयाचा हे सेंट हिल्डा कॉलेजचे व्यवस्थापक येत्या सत्रात ठरविणार आहेत.

डेम कॅथरीन कुकसन यांनी सदरलँड विद्यापिठाला २ लाख पौंडाची आणखी एक देणगी दिली. या विद्यापिठाच्या वाचनालयाचा सध्या विस्तार होत आहे. त्यातील एक विभाग डेम कॅथरीन कुकसन विभाग म्हणून ओळखला जाईल. व्हिक्टोरीयन काळात अनेक लेखक दानशूर होते. चांगल्या कामासाठी ते नेहमीच देणगी देत. मिसेस हम्फ्रे वॉर्ड या त्यापैकी एक. डेम कॅथरीन कुकसन यांचे हे दानशूरत्व बघून कोणासही त्या लेखकांची आठवण होईल. खरे म्हणजे असे आहे त्यांच्या एका कादंबरीतील एका नायिकेला आपणास कोणती व कशा प्रकारची महान प्रतिष्ठा प्राप्त व्हावी याची स्वप्ने पडत असत. त्याच प्रकारची महान प्रतिष्ठा डेम कॅथरीन कुकसन याना प्राप्त झाली आहे हे नक्की. **- डॉ. मीना वैशंपायन**



**फ्रांझ काफ्का**

(१८८३-१९२४)

**जागतिक वाङ्मयात स्वतःचे घराणे निर्माण करणारा**
**जर्मन कथा-कादंबरीकार,**

**विसाव्या शतकातील**
**या महान साहित्यिकाचा परिचय करून देणारा**
**मराठीमधील पहिला ग्रंथ**

# थोडाबहुत काफ्का

**शकु नी. कनयाळकर**

**१८८३-१९१८ या कालखंडातील काफ्काचा जीवनवृत्तांत.**
**'द ट्रायल' या कादंबरीचा संक्षिप्त अनुवाद.**

चरित्रपट, वाङ्‌यसूची इ. आर्टपेपरवरील ५२ छायाचित्रे
एकूण पृष्ठे २६० + ४ + १६

**मूळ किंमत रु. २००**
**'तपशील' च्या वर्गणीदारांना**
**सवलतीची किंमत रु. १२०**

त्वरित संपर्क साधा

**नाना जोशी**

४ अ, सोमणनगर, क्रांतीवीर भाई बालमुकुंद मार्ग, मुंबई ४०००१२

अनुक्रमणिका

